ज्ञा ने श्व री

# अध्याय पंधरावा

## पुरुषोत्तमयोग

मूळ संहिता, पाठभेद, प्रस्तावना, टीपा स्पष्टीकरण, शद्बकोश, व भाषाशास्त्रविषयक परिशिष्टासह.

: संपादक :

दत्तात्रय सीताराम पंगु

राजाराम कॉलेज, कोल्हापूर.



कार्तिक शु॥ द्वितीया १८७३

१ नोव्हेम्बर, १९५१

किंमत ४॥ रुपये

स्कूल व कॉलेज बुकस्टॉल, कोल्हापूर.

# प्रो. पंगु यांचे ग्रंथ

## संशोधन

(१) सामराज

(२) प्राचीन मराठी कविपंचक

## संपादित

(३) वच्छहरण—पंडित दामोदर

(४) सीतास्वयंवर—नागेश.

(५) लवकुशोपाख्यान—मोरोपंत

(६) वनपर्व—मुक्तेश्वर

(७) ज्ञानेश्वरी अध्याय १२

(८) ज्ञानेश्वरी अध्याय १६

(९) सभापर्व—मुक्तेश्वर

(१०) सीतास्वयंवर—विठ्ठल बीडकर

(११) ज्ञानेश्वरी अध्याय १

(१२) ज्ञानेश्वरी—अध्याय १५.

## टीकाप्रबंध

(१३) आस्वाद

(१४) तुषार

(१५) पुष्पांजलि.

# अध्याय पंधरावा

## गीताध्यायसंगति

श्रीमद्भगवद्गीतेच्या आठरा अध्यायांची संगति निरनिराळ्या विद्वानांनीं निरनिराळ्या प्रकारें लाविली आहे. या आठरा अध्यायाचे प्रत्येकीं सहासहा अध्यायांचे विभाग कल्पून त्यांत अनुक्रमे कर्म, भक्ति व ज्ञान या विषयांचें विवेचन करण्यांत आलें आहे असें कांहीं मानतात, तर कांहीं 'तत्त्वमसि' या महावाक्याच्या अनुक्रमें तत्, त्वम् व असि, या तीन पदांचें विवरण वरील प्रत्येकीं षडध्यायींत आल्याचें गृहीत धरून, या महावाक्याचें विवरण हाच श्रीमद्भगवद्गीतेचा प्रधान हेतु आहे असें समजतात. लो. टिळकांचें मत मात्र याहून अगदीं भिन्न असून, गीतेच्या उपक्रमोपसंहारावरून गीतेचा मुख्य प्रतिपाद्य विषय जो कर्मयोग, त्याच्याच परिपुष्ट्यर्थ ज्ञानयोगाचा तेथे उहापोह झाला असल्यानें, एकाच विषयाला वाहिलेल्या गीताग्रंथांत अशा सुट्या व स्वतंत्र विषयांची मांडणी कल्पिणें योग्य नाहीं, असें त्यांचें म्हणणें आहे. पण लो. टिळकांचें हें मत तर्कशास्त्रदृष्ट्या कितीही बरोबर वाटलें, तरी भगवद्गीतेवरील इतर प्राकृत टीकाकारांची प्रवृत्ति, तिच्या अध्यायांची अशी स्वतंत्र विषयवार संगति लावण्याकडेच असल्याचें दिसून येतें. महानुभाव पंडित शार्ङ्गधर, यानें आपल्या "कैवल्यदीपिका" नामक गीतेवरील मराठी टीकेंत, गीताध्यायांचें असेंच विषयवार वर्गीकरण केलें असून, पहिल्या पांच अध्यायांना उपासनाकांड, सातव्यापासून पंधराव्या अध्याया-पर्यंत ज्ञानकांड, व सोळाव्यापासून १८ अध्यायाच्या ४९ श्लोकापर्यंत कर्म-कांड अशी त्यानें त्रिकांडात्मक आखणी करून दाखविली आहे. खुद्द ज्ञानेश्वरांनींही गीतेची अशीच त्रिकांडात्मक विभागणी केली असून, अध्या-

यांची विभागणी करतांना मात्र त्यांनीं इतर ग्रंथकाराहून वेगळा क्रम स्वीकारला आहे. पहिले दोन अध्याय अनुक्रमें प्रवृत्तिशास्त्र व गीताशास्त्राचें मोक्षदायित्व यांसंबंधींच विवेचन करणारे म्हणून प्रास्ताविक स्वरूपाचे मानले, तरी तिसऱ्या अध्यायास कर्मकांड चौथ्याच्या शेवटापासून तों अकराव्या अध्यायाच्या शेवटापर्यंत उपासनाकांड, व बाराव्या अध्यायाच्या तेराव्या श्लोकापासून पंधराव्या अध्यायाच्या अखेर ज्ञानकांड, अशीच अध्यायांची विषयवार वर्गवारी त्यांनीं केलेली असून, सोळाव्यांत अज्ञानवर्ग, सतराव्यात त्यास शास्त्रानें कसें जिकावें याचें विवेचन व अठरावा अध्याय सर्व गीतेचें तात्पर्य सांगणारा म्हणून कळशाध्याय, अशी मांडणी ज्ञानेश्वरांनीं एकंदरीनें केलेली आढळून येते.

## पंधराव्या अध्यायाचें प्रतिपाद्य

तथापि भगवद्गीतेच्या बाराव्या अध्यायाच्या शेवटीं ज्ञानी भक्ताच्या साम्यावस्थेचें जें वर्णन करण्यात आलें आहे, त्यावरून परमेश्वराच्या सर्वव्यापी स्वरूपाचें ज्ञान हाच या ज्ञानकांडाचा मुख्य विषय असून, परमेश्वर सर्व ब्रह्मांडांत व्यापून राहिला आहे, याचें प्रत्यंतर आकराव्या अध्यायांतील विश्वरूपदर्शनानें दिल्यानंतर तोच परमेश्वर पिंडांत म्हणजे मनुष्याच्या शरीरांत आत्मा या नात्यानें राहतो हें सांगण्यासाठीं, शरीराचें म्हणजे क्षेत्राचें व आत्म्याचें म्हणजे क्षेत्रज्ञाचे स्वरूपवर्णन, तेराव्या अध्यायांत ओघानेच येणें अपरिहार्य होतें. यांपैकीं पहिल्या १८ श्लोकांत प्रथम परमात्म्याचें अथवा परब्रह्माचें स्वरूप उपनिषदांच्या किंवा वेदांताच्या आधारें केल्यावर, हाच क्षेत्रक्षेत्रज्ञविचार, यापुढें सांख्यांच्या प्रकृतिपुरुषपरिभाषेंत करून दाखविला असून, अखेर प्रकृति व पुरुष यांतील भेद व सर्व भूतांच्या मूलप्रकृतीचा मोक्ष, ज्यांनीं ज्ञानचक्षूंनीं जाणला, तेच परब्रह्माप्रत पोंचतात, अशा फलश्रुतीनें वेदांत व सांख्य या दोन शास्त्रांचा येथे समन्वयच घडवून आणला आहे. पण प्रकृतीचें हें कर्तृत्व पुढें अबाधितपणें कसें चालू राहतें, हें दाखविण्या·

साठींच ज्ञानाचें हें विवेचन चवदाव्या अध्यायांतही चालू ठेवलें असून, सर्वत्र एकच आत्मा अगर परमेश्वर व्यापून राहिला असला, तरी सत्व, रज, व तम या प्रकृतीच्या त्रिगुणात्मक भेदामुळे, एकाच प्रकृतीपासून नानाविध सजीवसृष्टि कशी उत्पन्न होते, याचें सांख्यशास्त्राप्रमाणें वर्णन करतांना, यथेही शेवटीं "जो एकनिष्ठ भक्तियोगानें माझी सेवा करतो, तो या तीन गुणांच्या पलीकडे जाऊन ब्रह्मभूतावस्था प्राप्त करून घेतो," अशा त्रिगुणातीताच्या वर्णनानें, दुसऱ्या अध्यायांतील स्थितप्रज्ञ व बाराव्या अध्यायांतील भक्तिमान् पुरुष, यांच्या स्थितीशींच या त्रिगुणातीताच्या स्थितीचें साम्य दाखवून सर्वोपासनाचें ऐक्यच येथे प्रामुख्यानें स्पष्ट केलें आहे.

यानंतर प्रस्तुत पंधराव्या अध्यायांत, वर मूळ व खालीं शाखा असणाऱ्या अश्वत्थरूपी संसारवृक्षाचें वर्णन, प्रथम उपनिषदांच्या आधारें व नंतर सांख्यशास्त्राधारें करतांना देखील दृश्यसृष्टिरूप वृक्ष या नात्यानें परमेश्वराचें औपनिषदिक वर्णन व सांख्यांच्या प्रकृतीच्या पसाऱ्याचें वर्णन, यांची येथे सांगड घातली असून, या वृक्षाच्या त्रिगुणात्मक शाखा खालीं तशाच वरही पसरलेल्या आहेत असें सांगून, पुनः कर्मविपाकाचा संबंधही अखेर जोडून देण्याचा प्रयत्न केला आहे पण शेवटीं मोक्ष मिळण्यास या त्रिगुणात्मक उर्ध्वमूल अश्वत्थवृक्षाच्या पसाऱ्यांतून अथवा संसारांतून सुटण्यासाठीं, या अत्रादृढ्य वृक्षाच्या नाशाचा, असंग किंवा अनासक्ति हा उपाय सांगतांना, "त्याच आद्य पुरुषाला मी शरण जतो" या भावनेनें, "जेथे गेलेले पुनः परत येत नाहींत" तें शाश्वत पद शोधून काढण्याचा आदेशही देण्यांत आला आहे. तरी पण याही पुढे पुनः त्या पदाचें स्वतंत्र व एकमेव स्वरूप वर्णन करतांना, तें मिळण्यास लागणाऱ्या कांहीं निष्काम गुणांचें संकीर्तनही ओघानेच आलें असून, "जेथे गेलेले पुनः परत येत नाहींत," यावरून सूचित झालेल्या लिंग व स्थूल शरीरात्मक जीवाच्या उत्क्रांतीचें, व जीवाच्या स्वरूपाचें वर्णनही थोड्या

अधिक विस्तारानें देतांना, ज्ञानचक्षूंनाच हें आत्मज्ञान होतें, असा या जीवोत्क्रांतिवादाचा समारोप करण्यांत आला आहे. आत्म्याच्या सर्वव्यापित्वाचें वर्णन गीतेंत याहीपूर्वी सातव्या अध्यायांत आलें असलें, तरी येथे देखील तशा वर्णनाचा प्रस्तावनेदाखल अंतर्भाव करूनच प्रस्तुत अध्यायाचा प्रतिपाद्य विषय जो 'पुरुषोत्तमयोग' अथवा 'पुरुषोत्तम लक्षण,' त्याचा येथे उपन्यास झाला आहे. शिवाय क्षराच्या पलीकडचा व अक्षराहूनही उत्तम, असें जे या पुरुषोत्तमाचें लक्षण सांगण्यांत आलें आहे, त्यांतही 'अक्षर' या शब्दानें सांख्यांची प्रकृति असाच अर्थ घ्यावयाचा असून, क्षर ( व्यक्त सृष्टि ) व अक्षर ( प्रकृति ) यांच्या पलीकडचें परब्रह्म व हा पुरुषोत्तम, यांचे ऐक्यच येथें स्पष्ट करण्यांत आलें आहे. शेवटीं फलश्रुति देण्याच्या सर्वच ग्रंथाच्या परिपाटाप्रमाणें, "मी पुरुषोत्तम हें विचक्षणपणानें जो जाणतो, तो सर्वज्ञ होऊन मलाच भजतो," अशी या पुरुषोत्तमयोगाची फलश्रुति सांगून, प्रस्तुत अध्यायाचा उपसंहार करण्यांत आला आहे.

## ज्ञानेश्वरांच्या टीकेची पद्धति

अशा या श्रीमद्भगवद्गीतेच्या मूळ श्लोकबद्ध विषयाचें विवेचन करतांना, श्लोकांतील प्रत्येक पदाचा अर्थच केवळ विशद करण्याकडे ज्ञानेश्वरांची प्रवृत्ति नसून, आपल्या विशिष्ट तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें मूळ संहितेंतील शब्दांना अनुकूल अशा अर्थाची योग्य ती मुरड घालण्याचें व कित्येक स्थळीं मुळापेक्षाही अधिक आशय अथवा भावार्थ ग्रंथविस्तारानें, अथवा नवीन प्रसंगनिर्मितीनें व्यक्त करण्याची व्यापक पद्धति त्यांनी स्वीकारल्यामुळें, त्यांच्या या 'भावार्थदीपिके'ला एका स्वतंत्र काव्यग्रंथाचें स्वरूप प्राप्त झालें आहे. प्रस्तुत आध्यायात देखील, मागील चवदाव्या अध्यायाचें पूर्वानुसंधान सांगून या अध्यायांतील विषयाचा उपन्यास करतांना, ज्ञानेश्वरांनीं (१) ज्ञानी तोच मोक्षाधिकारी (२) ज्ञान होण्यास चित्तशुद्धीची आवश्यकता ( ३ ) चित्तशुद्धीला वैराग्याची आवश्यकता ( ४ ) वैराग्याला

पुनः संसाराच्या अनित्यत्वाची आवश्यकता. व म्हणून (५) संसाराची अनित्यता सिद्ध करण्यास त्यावर वृक्षाच्या रूपकाची योजना, अशा शृंखलान्यायात्मक कोटिक्रमाच[1] जो अवलंब केला आहे, त्यामुळेंच प्रस्तुत अध्यांतील अश्वत्थवृक्षाच्या प्रदीर्घ रूपकाचें प्रयोजन लक्षांत येऊन, वाचकही एकंदरीनें या भववृक्षाचें स्वारस्य ग्रहण करण्यास विशेष समुत्सुक होतो.

यानंतर पुनः अश्वत्थरूप संसाराचें ऊर्ध्व म्हणजे परब्रह्म व त्याचें मूळ म्हणजे स्वस्वरूपाचें विस्मरणरूप माया कशी आहे, व तिच्यापासूनच पुढें महत्तत्त्व, अहंकार, गुणत्रय, मन व पंचमहाभूतें निर्माण होऊन, त्रैलोक्य व त्यांतील चार खाणींचे जीव कसे निर्माण होतात, शिवाय या वृक्षाला त्याच्या क्षणभंगुरत्वामुळें 'अश्वत्थ' असें नांव कसें पडलें, व 'मोडतु मांडतु' असें त्यांचे स्वरूप असूनही, सातत्यामुळें तो 'अव्यय' अशा नामाभिधानाला कसा पात्र झाला आहे, याचें मूळ श्लोकातील एकदोन पदांच्याच आधारें ज्ञानेश्वरांनीं निसर्गातील, सूर्य-मृगजळ, दीप-प्रभा, सागर-मेघ—नदी यांच्या अचूक दृष्टांतांची जोड देऊन जें विस्तृत वर्णन केलें आहे, त्यावरुन सांख्यांच्या २४ तत्त्वांवर उभारलेल्या या स्थावरजंगमात्मक सृष्टीचें, परब्रह्मापासून तों ब्रह्मेशांत पदापर्यंतचे विस्तृत स्वरूप वाचकांच्या दृष्टीसमोर कसें आरशासारखें उभें राहतें !

पुढें या ग्रंथविस्ताराप्रमाणेंच पुनः या भववृक्षाचें छेदन वैराग्याच्या अभंगबलानें व आत्मज्ञानाच्या तरवारीनें करण्यास सांगून, "जेथे गेलेले परत येत नाहींत" त्या परमं पदाला जाणाऱ्या निष्काम कर्मयोगी ज्ञान्यांचें थोडें बहुत वर्णन केल्यावर, त्या पदाला जाणारे जे ज्ञानी जीव, ते मूळचे परमेश्वराहून भिन्न कां अभिन्न, अशी शृंगापत्तीच्या स्वरूपाची शंका,[2] अर्जुनाच्या तोंडून प्रदर्शित करून तिचें श्रीभगवंताकडून जें उपनिषदांच्या पद्धतीनें निरसन घडविलें

१ ज्ञाने-१५।३४-४५. २ ज्ञाने-१५।२८८-३१०.

आहे, त्यामुळें या ज्ञानी जीवांचें परमेश्वराशीं असणारें अभिन्न स्वरूप विशेषच स्पष्ट होऊन, मूळ विषयप्रतिपादनाला श्रीभगवंतांच्या अधिकारवाणीची पुष्टि मिळाल्याचें दृश्यही त्यांनीं वाचकांना दाखविलें आहे. अशाच प्रकारचें पूर्वपक्ष-उत्तरपक्ष स्वरूपाचे हे श्रीकृष्णार्जुनसंवादाचे अभिनव प्रसंग, विवेचनाच्या भरांत मध्यंतरीच निर्माण करून एकंदर विषयाला विशेषच चालना व उठाव देण्याची ज्ञानेश्वरांची नेहमीचीच पद्धति असून, प्रस्तुत अध्यायांत पुनः अर्जुनाच्या तोंडून प्राणिमात्रांच्या सुखदुःखात्मक वैषम्याबद्दल[1] व पुढें परमेश्वराच्या निरुपाधिक स्वरूपाबद्दल अशीच शंका[2] उपस्थित करून श्रीकृष्णाकडून त्याचा परिहार केलेला त्यांनीं दाखविला आहे. मूळ भगवद्गीता ही श्रीकृष्णार्जुनसंवादरूप असली, तरी ज्ञानेश्वरानीं ज्या स्थलीं व ज्या विषयानुरोधानें हे श्रीकृष्णार्जुन-संवादाचे प्रसंग कल्पिले आहेत, तेथे व त्या संदर्भात मूळ भगवद्गीतेत हे प्रसंग ज्या अर्थी आलेले दिसत नाहीत, त्या अर्थी श्रीज्ञानेश्वरांनीं आपल्या विषयप्रतिपादनाला, जणु भगवंताच्या वाणीनें पाठबळ मिळालेंच आहे असे दाखविण्यासाठीं, ही अभिनव प्रसंगनिर्मिति केली आहे, हे स्पष्ट दिसतें.

वास्तविक निरुपाधिकाबद्दलचा अर्जुनाचा प्रश्न म्हणजे क्षराक्षरपुरुषविवेचनाची ज्ञानेश्वरांनीं केलेली प्रस्तावनाच होय, असें म्हणावयास हरकत नाहीं. कारण अर्जुनानें परमेश्वराच्या निरुपाधिक स्वरूपाबद्दल विचारलें असतां, आपण उलट उपाधीचेंच प्रथम वर्णन कां करतों, याचें श्रीकृष्णानीं दिलेलें उत्तर म्हणजे ज्ञानेश्वरांच्या विवेचनांत उत्तमपुरुषवर्णनापूर्वी क्षराक्षरपुरुषाचें वर्णन कां आलें, याचें सकारण समर्थनच होय. तेराव्या अध्यायांत ज्याला ' ज्ञेय ' म्हटलें, त्यालाच वास्तविक क्षर व अक्षर पुरुषांच्या अपेक्षेनें येथे पुरुषोत्तम असें म्हटलें असून, पंधराव्या अध्यायाच्या विवेचनाचा हा गाभाच होय. ज्ञानेश्वरांनीं येथेही ग्रंथविस्ताराच्या

१ ज्ञाने—१५।३८०–३८८ २ ज्ञाने–१५।४३०–४३७.

रूपानें क्षर व अक्षर पुरुषांचें वर्णन[1] करतांना, क्षर पुरुष म्हणजे जीवचैतन्य असें थोडक्यांत सांगून, महदहंकारापासून तृणाग्रापर्यंत दिसणाऱ्या यच्चावत् चराचर सृष्टीला सत्य मानून तिच्यांत अहंकारानें वावरणारा व ' मी माझें ' करीत भवस्वर्गाच्या रानांत शिरणारा जो जीव, त्यालाच क्षर पुरुष असें म्हटलें आहे, तर दृश्याभास जग व केवळ परब्रह्म यांच्या, किंवा विपरीत ज्ञान व शुद्धज्ञान यांच्या मध्यंतरीची जी अज्ञानावस्था अथवा मायासंगी चैतन्य, त्याला येथे अक्षर पुरुष अशी संज्ञा दिली आहे. तथापि ज्ञानेश्वरांनीं याच क्षराक्षराहून अगदीं वेगळा असलेल्या पुरुषोत्तमाचें, प्रकाशेंविण प्रकाश, ईशितव्येंवीण ईश, नादाचा नाद, व विश्रांतीची विश्रांति, असें जें उपनिषदांच्या धर्तीवर निराकार व निर्गुण असें वर्णन केलें आहे, त्यावरून वरवर पाहणाऱ्याला पुरुषोत्तमाच्या स्पष्ट अस्तित्वाची शंका थोडा वेळ आली, तरी ज्ञानेश्वरांनींच येथे मोठ्या मार्मिकतेनें योजलेल्या घ्राण व पुष्प यांमधील परिमलाच्या अचूक व युक्तिवादात्मक दृष्टांतानें[2], परिमला-प्रमाणेंच अभावरूपानें अस्तित्वांत असणाऱ्या परमात्म्याचें असेंच अस्तित्व कोणाही सामान्य बुद्धीच्या माणसाला पटल्याशिवाय राहणार नाहीं. शेवटीं "या ज्ञेयाचें किंवा पुरुषोत्तमाचें स्वरूप आकळल्यानेंच माझी खरी भक्ति होते, ज्ञानानें मोहमुक्त झालेला जो पुरुष माझें स्वरूप जाणतो, तो सर्व जाणणारा होत्साता मला सर्वभावानें भजतो, " इत्यादि ज्ञान व भक्ति यांचा समन्वय करणाऱ्या भगवंतांच्या उद्गारांचा अनुवादही, " क्षीरसागरानेंच क्षीरसागराचा पाहुणचार करावा " अथवा " गगनानेंच गगनाला आलिंगन द्यावें," अशा उचित व व्यापक दृष्टांतांनीं करतांना, ज्ञानेश्वरांनी ज्ञानस्वरूप पुरुषोत्तमाची भक्ति करण्यास तसाच तद्रूप झालेला ज्ञानीभक्त पाहिजे, असें सुचवून ज्ञानोत्तर भक्तीची आपली भूमिका येथेही विशद करून ठेवली आहे.

---

१ ज्ञाने-१५।४५५-४९१. २ ज्ञाने-१५।५०९-५१०.

# ज्ञानेश्वरांचें तत्त्वज्ञान

आणि या भूमिकेमागील त्यांचें विशिष्ट तत्वज्ञान त्यांच्या ग्रंथांत जसें इतस्ततः विखुरलेलें आहे, तसेंच तें त्यांनीं योजलेल्या विविध दृष्टांतांनीं तर अधिकच स्पष्ट झालें आहे. श्रीज्ञानेश्वरांनीं परमात्म्याचें स्वरूप, " आपणचि आपणेयातें । पाहिजे जें अद्वैतें । तें ऐसें होये निरुतें । बोलिजतु असे[1] ॥ " याप्रमाणें किंवा " तो पूर्णतेचा परिणामु । पुरुषु गा सर्वोत्तमु । विश्रांतिचा विश्रामु । जिराला जेथ[2] ॥ " असें निरपेक्ष पूर्णस्वसंवेद्य वर्णिल्यामुळें, विश्वाचा निरास केल्यानंतरच मागें अद्वैत स्वरूपांत उरणाऱ्या श्रीशंकराचार्यांच्या केवल परब्रह्माहून त्यांचा परमात्मा स्वयंपूर्ण अतएव थोडा भिन्न भासतो. वास्तविक ज्ञानेश्वरांची अद्वैतकल्पना इतकी एकजिनशी आहे कीं, तिला ' अद्वैत ' अशा संबोधण्यानेंही द्वैतपणा येण्याचा संभव असल्यानें, श्रीशंकराचार्यांच्या केवलाद्वैताच्या अपेक्षेनें त्यांना आजकाल ' पूर्णाद्वैती ' म्हणण्याचा परिपाठ[3] पडला आहे, हें लक्षांत ठेवलें पाहिजे. ज्ञानेश्वरांना याप्रमाणें स्वयंपूर्ण अशा परमात्म्याची स्थापना करून श्रीशंकराचार्याहून थोडें स्वतंत्र व प्रतीतिसंपन्न तत्त्वज्ञान मांडावयाचें असल्यानें, श्रीशंकराचार्यांनीं आपल्या अद्वैत सिद्धांतासाठीं मानलेला मायावादही त्यांना अमान्य करावा लागला आहे. ज्ञानेश्वरांचें विशिष्ट तत्त्वज्ञान आचार्यांच्या अद्वैत तत्त्वज्ञानावर उभारलें असलें, तरी त्यांनीं मायेचा केवळ निरासच करून न राहतां, " तऱ्ही माया ऐसी ख्याति । नसतीच यया आथी । कां वांझेची संतती । वानो ए जैसी ॥[4] ' अशा साभिप्राय व सूचक दृष्टांतांच्या द्वारां अजातवादाचाच पुरस्कार करून आपल्या स्वयंपूर्णवादाची प्रतिष्ठापना केली आहे.

---

१ ज्ञाने—१५।२४४. २ ज्ञाने—१५।५१५. ३ ज्ञानेश्वरदर्शन–खंड २—पान १०. ४ ज्ञाने—१५।७९.

पण आपल्या अद्वैत सिद्धांताच्या आड येणाऱ्या व नानारूपानें दृश्यमान होणाऱ्या नामरूपात्मक जगाचा निरास श्रीशंकराचार्यांनीं जसा आपल्या मायावादानें अथवा अध्यासवादानें केला आहे, तसाच जरी ज्ञानेश्वरांनींही केव्हां, " यऱ्हवीं दोरिएचेया उरगा । डांगा मेळावितां पैं गा । तो वाऊंचि फार गा । केला होए ॥ तरावेया मृगजळाचि गंगा । डोणीलागि धांवत दांगा । माजि वाहले बुडिजे पैं गा । सांचें जेविं[1] ॥ " याप्रमाणें त्याच वादाचा आधार घेऊन केला असला, तरी त्यावरून ज्ञानेश्वर हे मायावादी किंवा अज्ञानवादी ठरत नसून, ही मायावादाची युक्ति केवळ जिज्ञासूंना या विश्वाचें मिथ्यात्व पटवून देण्यासाठींच आपण योजल्याचें त्यांनीं " पाडिवेयाची चंद्ररेखा । निरुता दावावया शाखा । दाविजे तेविं औपाधिका । बोलीं इया[2] ॥ " अशा युक्तिवादात्मक दृष्टांतानें स्पष्ट केलें आहे. ज्ञानेश्वर हे जगत् सत्य किंवा मिथ्या मानीत नाहींत, व तें परमात्म्या-हून भिन्न आहे, असें तर ते केव्हांच समजत नाहींत, जग म्हणजे परमात्माच असें त्यांचें ठाम मत असून, परमात्माच जगद्रूपानें स्फुरण पावला आहे असें, " ते माया वस्तूचां ठाइं । असे जैसेनि नाहिं । मग वस्तुप्रभा चि पाहिं । प्रकट होये[3] ॥ " या व अशाच प्रकारच्या ओव्यांतून सांगतांना, त्यांनीं आपल्या स्वयंपूर्ण सिद्धांताला पोषक अशा स्फूर्तिवादाचाच पुरस्कार येथे केला आहे.

ज्ञानेश्वरांनीं परमात्मा व जगत् यांच्या याप्रमाणें एकत्वाचा जो संबंध दाखवून दिला आहे, तसाच परमात्मा व जीव यांचाही संबंध दर्शिवण्या-साठीं त्यांना आणखी कांहीं युक्त्यांचा आधार घ्यावा लागला आहे. वास्तविक येथे " जीवो ब्रह्मैव नापरः । " अशीच स्थिति असतांना, अन-धिकारी लोकांची तशी समजूत पटवून देण्यासाठीं कांहीं ठिकाणीं, " एवं विधि जीवलोकिं । तूं मातें ऐसेया अवलोकिं । जैसा चांदु कां उदकिं ।

---

१ ज्ञाने—१५।२२८-२२९. २ ज्ञाने—१५।४३७. ३ ज्ञाने—१५।८३.

उदकातीतु[1] ॥ पैं काश्मिरींचा रवा । कुंकुमावरि पांडवा । आणिकां गोमे लोहिवां । तो तरि नव्हे[2] ॥ " अशा बिंबप्रतिबिंबवादाची, तर कांहीं ठिकाणीं " घटमठ वडले । ते चि पाठिं मोडले । परि आकाश तें संचलें । असत चि असे[3] ॥ " अशा अवच्छेदवादाचीही योजना करून, जीव व परमात्म्याचें एकत्व त्यांनीं सिद्ध केलें आहे. शिवाय प्रस्तुत अध्यायांत (१) परमात्मा जर सर्वत्र एकच आहे, तर कांहीं लोक सुखी व कांहीं दुःखी कां ?[4] अथवा ( २ ) जीव व परमात्मा जर नेहमीं एकच आहेत, तर, 'यद्गत्वा न निवर्तंते ' या म्हणण्यांत काय अर्थ[5] ? ' या अद्वैतसिद्धांतावर नेहमींच घेण्यांत येणाऱ्या शंकांना श्रीकृष्णांच्या तोंडून अनुक्रमें ( १ ) " पै आघवाचि मी असे । एथ नाहि किं अनारिसें । परि प्राणियांचां ठाइं उल्हसे । बुद्धि ऐसी[6] ॥ " हें व (२) " जे विवेकें खोलें पाहिजे । तरि मीं चि ते साहाजे । ना आहाचवाहाच दूजें । ऐसे गमति[7] ॥ तैसें ज्ञानाचिये दीठी । माझि अभिन्न चि ते किरीटी । एर भिन्नपणें ते उठी । अज्ञाना तव[8] ॥ " असें जें उत्तर देण्यांत आलें आहे, त्यावरून ज्ञानेश्वरांना परमात्मा एकच असून जीव म्हणजे त्यावेगळा कोणी नाहीं, असेंच एकंदरीनें दाखवावयाचें आहे.

तात्पर्य ज्ञानेश्वरांना पूर्णाद्वैती म्हणण्यापेक्षां स्वयंपूर्णवादी म्हणणेंच अधिक शोभेल. परमात्मा, जीव व जगत् यांपैकीं शेवटच्या दोघांचा निरास करतांना त्यांनीं बिंबप्रतिबिंबवाद[9], आभासवाद[10], अवच्छेदवाद[11] व कल्पनावाद[12] यांसारख्या कमी अधिक अधिकाराच्या साधकांना प्रतीत होण्यासारख्या दृष्टांतांनीं आपल्या श्रोत्यांची जीवजगन्मिथ्यात्वाची कल्पना हळू हळू

१ ज्ञाने-१५।३१६. २ ज्ञाने—१५।३१७. ३ ज्ञाने—१५।३५६. ४ ज्ञाने—१५।३८०. ५ ज्ञाने-१५।२९०—२९६. ६ ज्ञाने—१५।३८३. ७ ज्ञाने—१५।२९९. ८ ज्ञाने—१५।३०२. ९ ज्ञाने-१५।३५३. १० ज्ञाने-१५।३४५-३४६. ११ ज्ञाने - १५।३१२-३१३. १२ ज्ञाने--१५।४५६-४५७.

घालविली असून, शेवटीं स्फूर्तिवादानें[1] व अजातवादानें[2], जगजीवांचा संपूर्ण निरास व परमात्म्याचें स्वयंपूर्ण स्वतंत्र अस्तित्व त्यांनीं पटवून दिलें आहे. ज्ञानेश्वरांनीं याप्रमाणें श्रीशंकराचार्यांच्या मायाधिष्ठित अद्वैतवादाला आपल्या अध्यात्मिक अधिकारानें, स्वयंप्रतीतीनें व स्वचारित्र्यानें जो नवीन उजाळा दिला, त्यांतच त्यांच्या विचारप्रणालीचें वैशिष्ठ्य सांठविलेलें असून, साक्षात्कारी स्वानुभवसंपन्न साधु पुरुष, वेळोवेळीं तत्त्वज्ञानाची प्रगति त्यांत अशी नवीन भर घालून कशी करतात, हेंच तत्त्व यावरून आपणास शिकण्यासारखें आहे.

## ज्ञानेश्वरांचें व्यक्तित्व व काव्यगुण

तरी देखील अशा तत्त्वज्ञानाच्या गहन अरण्यांतूनही ज्ञानेश्वरांच्या अनुपम व्यक्तित्वाचे प्रकाशकिरण बाहेर पडून आपलें अस्तित्व सिद्ध केल्याशिवाय राहत नाहींत. ज्ञानेश्वर हे पहिल्या प्रतीचे गुरुभक्त असल्यामुळें, ज्ञानेश्वरींतील बहुतेक अध्यायांच्या आरंभीं सद्गुरूंना नमन करून त्यांनीं आपला आदरभाव व्यक्त केला आहे. प्रस्तुत पंधराव्या अध्यायांत सुद्धां अगदीं पहिल्याच २८ ओव्यांत, ज्ञानेश्वरांनीं आपलें परमप्रिय दैवत जें सद्गुरु निवृत्तिनाथ, त्यांच्या पादुकांची मोठ्या प्रेमळ भावानें मानसपूजा बांधून आपल्या हातून गीतार्थ प्रगट व्हावा असें पसायदान मागतांना, जें प्रदीर्घ रूपक कल्पिलें आहे, त्यावरून त्यांच्या कृतज्ञ व विनम्र स्वभावाची कोणालाही कल्पना आल्यावांचून राहणार नाहीं. तशांतून पुनः या अध्याच्या शेवटीं देखील आपली वाक्यपूजा ऐकण्याची आपल्या गुरूंना विनंति करतांना, व आपल्याकडे नेणत्या लहान बालकाची भूमिका घेऊन, नित्याप्रमाणेंच आपल्या ग्रंथांतील उत्तम प्रमेय तेवढें ग्रहण करून, न्यून असेल त्याची जबाबदारी आपल्यावर टाकण्याचें आवाहन आपल्या रसिक संत

---

१ ज्ञाने–१५।३५४, ३५६. २ ज्ञाने–१५।२१२-२१३.

श्रोत्यांना करतांना, ज्ञानेश्वरांनीं जो विनय दर्शिविला आहे, तो त्यांच्यासारख्या ज्ञानी व अधिकारी पुरुषाला विशेषच शोभण्यासारखा आहे. श्रोत्यांचें अवधान वक्त्याला किती स्फूर्तिदायक होतें, याचा नेहमीच अनुभव असल्यामुळें, ज्ञानेश्वरांना आपले श्रोते माहेरघराप्रमाणें जिव्हाळ्याचे वाटावें, व त्यांच्या सहानुभूतीच्या प्रेमळ सहकार्याची त्यांनीं अपेक्षा करावी हें साहजिक असलें, तरी आपल्या ग्रंथांत आपल्या श्रोत्यांच्या अवधनाचा त्यांनीं जो गौरव केला आहे, त्यावरूनही त्यांच्या निरहंकारी व दुसऱ्याचे परमाणुतुल्य गुण देखील पर्वताप्रमाणें मानणाऱ्या विशाल हृदयाची साक्ष पटते.

प्रस्तुत पंधराव्या अध्यायाचा मुख्य विषय पुरुषोत्तमस्वरूपाच्या ज्ञानाचा असल्यामुळें, ज्ञानेश्वरींत इतरत्र प्रत्ययास येणाऱ्या भावनोत्कट प्रसंगांचा येथे अभाव असल्यास नवल नाहीं. तथापि वर सांगितल्याप्रमाणें, श्रोत्यांचें अवधान हा ज्ञानेश्वरांचा जिव्हाळ्याचा विषय असल्यामुळें, येथे देखील ऊर्ध्वमूल व अधःशाख अशा त्या अश्वत्थवृक्षाचें वर्णन, भगवान् श्रीकृष्णांच्या तोंडून ऐकणाऱ्या अर्जुनाची उत्कट तन्मयता वर्णन करतांना, ज्ञानेश्वरांनीं श्रीकृष्णांच्या निरूपणाला दाही दिशांची व अर्जुनाच्या श्रोतेपणाला त्या दाहीदिशाही आलिंगनाला कमीच मानणाऱ्या अनंत आकाशाची जी भव्य उपमा[1] योजिली आहे, किंवा अर्जुनावर श्रीकृष्णांच्या सूक्तिसागराला एका घोटांतच पिऊन टाकणाऱ्या अगस्तीची जी सामर्थ्यशाली रूपकोत्प्रेक्षा[2] कल्पिली आहे, त्यामुळें या कृष्णार्जुनसंवादाची भावनोत्कटता पराकोटीला जाऊन, शेवटीं श्रीकृष्णानें अर्जुनाच्या त्या अमर्याद श्रोतेपणावरून आपलें सर्व समाधान ओवाळून टाकल्याच्या शांतरसांतच तिचें कसें स्वाभाविक पर्यवसान झालें आहे !

---

१ ज्ञाने-१५।६९.   २ ज्ञाने-१५।७०

पुढें पुनः आपल्या निरुपाधिक स्वरूपाचें वर्णन पुनः एकदा करण्याची अर्जुनाची विनंति ऐकूनच आपणास अर्जुनासारखा योग्य व आरशासारखा सर्वस्वी संवादी श्रोता लाभल्याचें श्रीकृष्णांचें परम समाधान, श्रीकृष्णांच्या गाढालिंगनांत पर्यवसित होतें न होतें तोंच, श्रीकृष्ण अशा 'सांबल्या पूसल्यांच्या' अद्वैताला भ्यालयाचा जो अद्भुत व रोमांचकारी असा प्रसंग[1] ज्ञानेश्वरांनीं स्वप्रतिभेनें निर्माण केला आहे, त्यावरून अद्वैतापेक्षां द्वैतांतच मीनलसुख खरें कसें अनुभवितां येतें हें उमगून, रसिक अधिकारी श्रोत्यांना शांतरसाबरोबरच विनोदाचाही भरपूर आस्वाद घेण्याची संधि कशी अनायासेंच प्राप्त झाली आहे. ज्ञानेश्वरांसारख्या साक्षात्कारी ज्ञानी-भक्तानें भक्तभगवंतमीलनाचा हा सुरसप्रसंग[2] वर्णन करतांना, एकीकडून आत्मापरमात्मैक्य अशा अद्वैतानंदाचा तर दुसरीकडून द्वैतानेंच उपभोगण्यास मिळणाऱ्या भक्तिसुखाचा गौरव येथे अतीव कौशल्यानें साधल्याचें पाहून ज्ञानेश्वरांच्या प्रसंगनिर्माणक्षमतेचें कौतुक वाटल्यावांचून राहत नाहीं.

अशा कांहीं भावमंथर प्रसंगाप्रमाणें आपल्या विवेचनाला सौकर्य येण्या-साठीं ज्ञानेश्वरांनीं ज्या अर्थालंकारांची या अध्यायांत योजना केली आहे, त्यांत उपमा-दृष्टांतांचें आधिक्य असलें, तरी त्यांत देखील त्यांच्या कांहीं आत्मिक व काव्यात्मक गुणांचा प्रत्यय वाचकांना आपाततः येतोच. उदाहरणार्थ मायेचें आभासात्मक स्वरूप वर्णन करतांना त्यांनीं खरें आलिंगन न देतांच आलिंगन देऊन जाणाऱ्या तरुणीचा[3], अथवा आत्म्याला स्वस्वरूपाची विस्मृति कशी पडते तें सांगतांना, स्वप्नांत आपणच आपली पत्नी होऊन तिच्यामागें धावणाऱ्या संन्याशाचा,[4] किंवा आत्मा देहांतून जातांना प्रकृतिगत षड्इंद्रियांना आपल्याबरोबर घेऊन कसा जातो,

---

१ ज्ञाने--१५।४२३. २ ज्ञाने--१५।४१५--४२२. ३ ज्ञाने—१५।८१. ४ ज्ञाने-१५।३२१.

हें पटवितांना एकाद्या गृहस्थाच्या घरांतून त्याच्या सर्व पुण्यसंचयासह बाहेर पडणाऱ्या अपमानित आतिथीचा,[1] असे त्या त्या विषयाची उत्तम परिस्फुटता घडाविणाऱ्या कौटुंबिक व सामाजिक दृष्टांतांची त्यांनीं जी जागजागीं पेरणी केली आहे, त्यावरून त्यांच्या समाजपरिज्ञानाचें, सूक्ष्मावलोकनाचें व त्याहीपेक्षां त्यांच्या विनोदी स्वभावाचें कसें पुरेपूर निदर्शन घडतें! ज्ञानेश्वरांची सृष्टीकडे पाहण्याची दृष्टि अध्यात्मिक असूनही कशी सौन्दर्यसमीक्षक होती, हें प्रस्तुत अध्यायांत अगदीं मोजक्याच सौंदर्यस्थलांवरून कळून येतें. येथे जीव व परमेश्वर मूळचेच भिन्न असल्यास मग 'त्या परमं पदाला गेलेले जीव परत येत नाहींत,' हें म्हणणें कसें असंबद्ध आहे, हा पूर्वपक्ष मांडतानां, त्यांनीं फुलाशीं लगट करणाऱ्या भ्रमरांचा जो काव्यमय पण अनुरूप दृष्टांत[2] दिला आहे, किंवा अर्जुनानें श्रीकृष्णांना आपल्या अंतःकरणांत गीतेसह कसें सामावून घेतलें आहे याचें प्रात्यक्षिक घडवितांना, त्यांनीं श्रीकृष्णांच्याच तोंडून चंद्रतारागणासह अखिल आकाश आपल्यांत प्रतिबिंबित करून घेणाऱ्या सागराचा जो प्रशांत व उदात्त दृष्टांत[3] दिला आहे, त्यावरुन ज्ञानेश्वर निसर्गाकडे कशा रसिकतेनें व तन्मयतेनें पाहतात, तेंच समजतें. पुनः अज्ञानाला खाऊन टाकून, स्वतःही नाहींसें होणाऱ्या ज्ञानाचें अस्तिनास्ति स्वरूप विशद करतांना देखील त्यांनी स्वतःलाही न उरविणाऱ्या निरंजन अशा जळत्या कापुराचा[4] व शेवटीं तर क्षराक्षर पुरुषांहून सर्वतोपरी भिन्न अशा दृश्यद्रष्टत्वातींत पुरुषोत्तमाचें सूक्ष्म अस्तित्व सूचित करतांना दिलेल्या घ्राण-फुलांच्या मध्यंतरीं न दिसणाऱ्या पण निश्चितपणें जाणवणाऱ्या सवासाचा जो अचूक दृष्टांत[5] दिला आहे, त्यावरून ज्ञानेश्वर महाराजांच्या मार्मिकतेनें व योजकतेनें वाचक कसा अगदीं थक्क होऊन जातो! ज्ञानेश्वरांचे उपमानभूत विषय नेहमींच,

---

१ ज्ञाने—१५।३३३. २ ज्ञाने—१५।२९१. ३ ज्ञाने – १५।५४७. ४ ज्ञाने—१५।४०६. ५ ज्ञाने—१५।५१०.

सूर्य, चंद्र, सागर, मेघ, आकाश, गंगा, मृगजल, तारागण, असे विशाल, व्यापक व प्रसन्न असल्यामुळें, त्यांच्या उपमादृष्टांतरूपकांनीं अलंकृत झालेलीं स्थलें व प्रसंग, वाचकांच्या मनांत कायमचें घरच करून राहतात! ज्ञानेश्वरांच्या काव्यांगाचा हा एक उल्लेखनीय विशेष असल्यानें, त्यांनींच इतरत्र योजलेल्या शुक्ति–रजत, रज्जु–सर्प, तंतु–पट, सुवर्ण–अलंकार, अशा थोड्या रूक्ष तार्किक दृष्टांताकडे मग वाचकांचें लक्षच जात नाहीं. शिवाय सुष्ट वस्तूंच्या वर्णनांत सुष्ट, व दुष्ट वस्तूंच्या वर्णनांत दुष्ट उपमेयोपमानांची अचूक योजना करतांना, ज्ञानेश्वर आपल्या वाचकांचीं मनें विवक्षित विषयासंबंधीं अनुकूल अगर प्रतिकूल करून घेतातच, पण तत्संबंधीं आपला अभिप्रायही पर्यायानें सूचित करून ठेवतात. नाहींतर "हें असो स्वातिचें उदक। शुक्ति मोतिएं विआलीं विख। तैसें सज्ञानासि मी सुख। दुःख तें अज्ञानासि[1] ॥" अशा सुखदुःखविवेकप्रसंगीं एकाच स्वातीच्या पाण्याची त्यांनीं अनुक्रमें सुष्ट–दुष्टस्थळीं विभागणी झालेली कां दाखविली असती!

या कांहीं अर्थालंकाराप्रमाणेंच ज्ञानेश्वरींत आढळणारे शब्दालंकारही ज्ञानेश्वरांनीं कांहीं बुध्द्या योजलेले नसून, ते त्यांच्या मुखांतून व्याख्यानाच्या भरांत सहजगत्या साधले गेले आहेत. त्यांच्या रचनेंत "अगा पैं पांडुकुंवरा। एतां स्वरूपाचया घरा। करीतुसे आडवारा। विश्वाभासु जो ॥४६॥ तो हा जगडंबरु। न्हवे एथ संवसारु। हा जाणे महातरु। थांवला असे ॥ ४७ ॥" अशा यमकानुप्रासांची जी थोडी सजावट आपणास जागजागीं दृष्टीस पडते, ती विषयानुरोधानेंच झाली आहे, हें लक्षांत ठेवलें पाहिजे. तथापि ज्ञानेश्वरांची खरी प्रवृत्तीच नादमधुर व अर्थानुकूल अक्षररचनेकडे असून, वाचकांच्या चित्ताला द्रवविणारी व वर्ण्यविषयाला खुलविणारीं मृदु व सानुस्वार अक्षरें त्यांच्या मुखांतून कशीं विनाश्रम बाहेर पडतात. उदा-

१ ज्ञाने ·१५।३८८

हरणार्थ " तरि्ह महानंदसमुद्रु । जो पूर्णु पूर्णिमाचंद्रु । तो द्वारकेचा नरेंद्रु । ऐसे म्हणे " ॥ ४५ ॥ किंवा " आनंदमोदबहल । सात्विकाचें मुकुल । तें उमळलें अष्टदल । ठेऊं वरि ॥ ६ ॥ " अशा कित्येक ओंव्यांत ज्ञानेश्वरीच्या मधुर व प्रसन्न भाषाशैलीची माधुरी अनुभवितां येण्यासारखी आहे. याच माधुर्याला पोषक असे शब्दांतींचे उकार, एकार व ओकार अथवा वर्णागम करण्याची तत्कालीन भाषेची लकब, त्यांना आपल्या भाषेंत गेयता आणण्यास बरीच उपकारक झाली आहे. तथापि माधुर्याप्रमाणेंच प्रसाद हा ज्ञानेश्वरीचा एक अनन्यसाधारण असा गुण असून, त्याचा अनुभव प्रस्तुत पंधराव्या अध्यायासारख्या तत्वज्ञानविषयक भागांतही थोडाफार चाखावयास सांपडतो. शिवाय आपला टीकाग्रंथ संस्कृतानभिज्ञ बहुजनसमाजाला सुबोध व्हावा, याभाठींच ज्ञानेश्वरांनीं त्यांत स्वकालीन व्यवहारांतल्या शब्दांचा व म्हणी–संप्रदायांचा भरपूर समावेश केला आहे. पण म्हणून ओज या तिसऱ्या काव्यगुणाचा प्रस्तुत अध्यायांतही अगदीं अभावच आहे असें मात्र समजण्याचें कारण नाहीं. कारण जेथे जेथे म्हणून एकाद्या सोसाट्याच्या वाऱ्याच्या प्रचंड झडझडाटासारखें वर्णन ज्ञानेश्वरांना करावयाचें असतें, तेथे तेथे त्यांची भाषाशैली स्वभावतःच ओजस्वी स्वरूप धारण करते. येथे " माजि वेदांचा पाला दाट । तो करी विद्यांचा झडझडाट । जंव वाजे अचाट । सत्वानिलु तो " ॥ १९० ॥ अशा ओंव्यांतून कठोर व्यंजनांतील विशिष्ट नादयुक्त रचनेमुळें, मूळ वर्ण्य-विषयांतील सत्वानिलाचा जोराचा आवेग कोणाला ध्वनित होणार नाहीं ?

यावरून प्रस्तुत अध्यायापुरतेंच बोलावयाचें झाल्यास, विषयप्रतिपादनाची प्रसन्नता, स्पष्टता व उपमादृष्टांतांची अचूक योजना करतांना ठिकठिकाणीं व्यक्त झालेली सूक्ष्मता, हेच ज्ञानेश्वरांच्या लेखनशैलीचे -मुख गुण, त्यांनींच आपल्या ग्रंथांत ( १५।५९४ ) म्हटल्याप्रमाणें सांगतां येतील. ज्ञानेश्वरांनीं मेळविलेलीं नादमधुर, रसिक व अर्थानुकूल अक्षरें, त्यांनीं

योजलेले समर्पक व मार्मिक अर्थालंकार, वर्ण्यविषय वाचकांपुढें मूर्तिमंत उभा करून जो साक्षात्काराचा अनुभव घडवितात, त्यामुळेंच ज्ञानेश्वरी हा ग्रंथ सामान्य जिज्ञासूलाही जिव्हाळ्याचा होऊन बसला आहे. निसर्गांतील विविध वस्तूंच्या भिन्नभिन्न गुणधर्मांचें निदर्शन हा तर ज्ञानेश्वरीचा आणखी एक उल्लेखनीय विशेष असून, त्यामुळेंच ती इतर गीताटीकांहून लोकप्रिय झाली आहे.

## ज्ञानेश्वरीची भाषा

आतापर्यंत केलेल्या विवेचनाबरोबरच ज्ञानेश्वरीच्या भाषेचा व तत्कालीन समाजाचा विचार होणें अपरिहार्य आहे. ज्ञानेश्वरीच्या भाषेंत 'कउतिके' (कौतुकें), 'वरिखा' (वर्षा), 'आरिसा' (आरसा) असा **वर्णागम**; 'संडिलें' (सांडिलें), 'पवता' (पावतां), 'उर्ध' (ऊर्ध्व) 'नीद' (निद्रा), 'अलगी' (आलिंगीं) असा **वर्णनाश**; दिठी (दृष्टि), 'गोठि' (गोष्टी) अशी **वर्णविकृति**, झालेली आढळते. 'साच' (सत्य), 'नीच' (नित्य), 'चांद' (चंद्र), अशा शब्दांत शेवटच्या जोडाक्षरांतील एक अक्षर गळून उपांत्य स्वर दीर्घ झालेला असतो. 'मेहु' (मेघु), 'लक्ष्मीनाहो' (लक्ष्मीनाथ) अशा शब्दांत, **घ, थ** बद्दल **ह** घालण्याचा प्रघात दिसतो. कीजे (क्रियते), काज (कार्य) अशा शब्दांत **य** बद्दल **ज** येतो, तर 'खोभला' (क्षोभला), खेव (क्षेम), रुख (वृक्ष), विख (विष) अशा शब्दांत **क्ष** व **ष** बद्दल **ख** आलेला आहे. ज्ञानेश्वर व महानुभाव यांच्या भाषेंतील, लक्षांत राहण्यासारखा विशेष म्हणजे, तिच्यांतील सांघिजैल (सांगिजैल), तेव्हडी (तेवढी), दोन्ही (दोनी) अशा शब्दांतील मूळ अक्षरांत **ह** कार मिसळलेला दिसतो.

**नामांचें** अनेक प्रकार ज्ञानेश्वरींत पाहिले म्हणजे आपले जुने प्राकृत, संस्कृतोत्पन्न व कानडी, गुजराथी, हिंदीसारख्या शेजारच्या भाषांतून

आलेले कितीतरी शब्द, आमच्या मराठी भाषेच्या प्रचारांतून नाहींसे झाले आहेत, याची कांहीशी कल्पना येते. अबोट, एकलौतें, एकहातें, मारितें, कुसरी, आडवारा, लेखा, रिगावा, सोहपा, कांवरुखें, वल्व-पेन, मांदोडे, ओपासिरा, मांदुस, आरवसें, उजगरा, बळिया, रसोये, आणियाळे, ( गुजराथी ); मिसें, पैठ, वाव, षांषा ( हिंदी ); कुहां ( सिंधी ) डोणी, तुकणें, बाबुळी, तूष, वास ( मलबारी ); चांग, तांडी, निदसुरा, पाट, पालव, पेणें, मांगार (कोंकणी); दांग ( वऱ्हाडी ); बाहाळ, आडवंकी, मेचु, मातु ( कानडी ); कुरौंडी, नव्हाळी, दिठीवा, दूसरे, मांदुस, बंबालि, उन्मेष, बहुवस, राणिव ( महानुभावी ); टवाळ अनगटें, खनुवाले, तलबुडे, उजरि, पांगोरा, थेकुलें, अशीं याच अध्यां-यात अनेक उदाहरणें सहजीं सांपडतात. याशिवाय खोकरपण, अधोमुख-पण, श्रोतेपण, असिलेपण, सिंपीपण, व दूजेपण अशीं 'पण' लावून **भाववाचकनामें** करण्याकडेही प्रवृत्ति दिसते ती निराळीच. त्यांतूनही पुनः फार नाहीं तरी, केतुला, अनारिसें, आन, कवण, सरिस अशीं **सार्व-नामिक विशेषणें**, आज थोडीं अपरिचितच भासतात. साध्या विशे-षणांतही सुरफुरें, थेकुलें, साचोकारा, चोखटु, भले, तेव्हडी, वरिचिल, सान अशा आज जुन्या वाटणऱ्यांचाच भरणा फार.

**विभक्तिप्रत्ययांकडे** पाहिल्यास अर्घ्यु, देॐ, निर्णो, विस्मो, अशीं **प्रथमेचीं, एकवचनी** व ज्ञानिये, आंधळे, देखणे, अशीं **अनेकवचनी** रूपें आढळतात. आत्मयातें, भुली, कापुरा, अशीं **द्वितीयेची**, तर वायसा, गुरुचरणसेवा, भरोवरी, गोसावी, ज्ञाकासिं, पमायें, अशीं **तृती-येचीं** रूपें रूढ होतीं. अज्ञानदशे, मनबुद्धिसि, आत्मयासि, त्राये अशीं **चतुर्थीचीं** व तप्तलोहौनि, जेथौनि, देहौनु अशीं **पंचमीचीं** रूपें तत्का-लीन भाषेची कल्पना देतात. स्वरूपाचया, गीतेचेनि, अध्यायाचां, ब्रह्मिचें, ज्ञानाची अशीं आजच्या सारखीं **षष्ठीचीं**, व आत्मा, आघाणें, मांडविं,

अशीं **सप्तमीचीं** रूपें नित्याचींच आहेत. पण विभक्तीच्या या प्रत्यया-बरोबरच कांहीं ठराविक अव्ययांनींही विभक्तिप्रत्ययांचें काम भागविलें जाई. मातें**वाचुनि**, मजचि**तव**, आपण**पें**, आत्मभ्रांति**साटि**, मनुष्या**लागौनि**, उन्मलावया**दोखें**, परमात्मशब्द**वेन्हि**, जाणेन**विण**, क्षराक्षरा**पासौनि**, प्रकृति**भासें** अशीं कित्येक उदाहरणें आज चमत्कारिक वाटण्यासारखीं आहेत.

**शब्दयोगीअव्ययांत** चि, ही, यांचा व **उभयान्वयीअव्ययांत** जे ( कारण ), म्हणौनि ( म्हणून ), वरि ( शिवाय, आणखी ), कीं ( जसा--तसा ), कां ( अथवा ), नातरि ( किंवा ), इत्यादिकांचा समावेश झाला असून, पां, गा, अगा ! बापु ! अशीं **केवलप्रयोगीअव्ययेंही** या यादवकालीन भाषेंत सांपडतात. या शिवाय ' काष्टिच्या काष्टाहूनि ' ' क्षराक्षरापासौनि आनचि ' असा विशेषणांचा **तारतम्यभावही** या काळीं दर्शविला जात असे तो वेगळाच.

**क्रियापदांचा** पसारा सुद्धां कांहीं लहान नाहीं. आथि, कीजे, असिजे, देइजे, भोगिजती, निवालिजे, रचिविजे. रुलणे, उलंडणे, तुरंबिणे, खंवळणें, संचणें, कौंभेजणें, चोजवणें, फावणें, पाल्हेजणें, थोरावणें, उंचावणें अशा क्रियापदाबरोबरच भरौनि ठाके, मानु लाभे, देउनि घालि, आइकों धावला, सांघणें कीजो, देखों पविजें, जाणों गेला, पुसों आलासि, बोलों आदरिलें, वाजावे पडे, सूदली साती अशीं **धातुसाधितें** व **सहाय्य-क्रियापदें**ही योजलेलीं दिसतात. नांगवे, नुघवी, नुरोंधि, नेघपिजति, नोमोडे, नाडलतां, नेदेखौनि, नुघडे, असे **अकरणरूपी एकशब्दात्मक धातु,** मुक्तेश्वराच्या कालापर्यंतसुद्धां चालत आलेले असले, तरी नैए, तैसे नका हो ! तो तरि नव्हे; अशा प्रकारानींही नकार दर्शविला जाई. चौफलौनि, कौंभेजे, आडफाटति, थोरावति, उंचावति, मूकावलें अशा

**नामधातूंनीं** तर थोडक्यांत पुष्कळ अर्थव्यक्त करण्याची पद्धति स्वीकारलेली असून, **अनुकरणात्मक धातूंत**, झडाडितां, खाखैरजति, घुमघुमिति, लाहातलाहात, अशांचा समावेश झालेला आहे. ज्ञानेश्वरींत सहाय्य क्रियापदांचा उपयोग काल, प्रयोग, रूप, दर्शिवण्याकडे असा केला जातो, तसाच तो जोरदारपणा व परिणामकारकता साधण्यासाठींही केलेला आहे. वर दिलेल्या सहाय्यक्रियापदांचा या दृष्टीनें विचार करण्यासारखा आहे.

**काळ व अर्थ** यांकडे वळल्यास, **बोलति**, वाटे, तुटे, आभासतसे, देखति, असतचि असे, अशों **वर्तमानकाळचीं रूपें रीतिवर्तमाना** सारखीं वाटतात. जागिजे, पाल्हैजति, खाखैरजति, उजाळिजे, अशा **कर्मकर्तरी** रूपांपुढेंच 'एल' जोडून सांधिजैल, उमसिजैल, वानिजैल अशीं **भविष्यकाळचीं** रूपें सिद्ध केलीं जात. ठेविजे, देखिजे, मानिजे, यांत **आज्ञार्थ**, तर करावा, मानावा, देखावा, यांत **शक्यार्थ** स्फुट होई. जाइजे, आरोपिजे, किजे, लाविजति, सूचिजे, धापे, अशीं **कर्मणिरूपें** तर ज्ञानेश्वरींत असंख्य असून, **कृदंतांत** वसुवितु, आइकिजता, पांतु हीं **वर्तमानकालवाचकें**, बुडाला, जाला, पडिलें, भरलें, बिंबलें, गंवासिला हीं **भूतकालवाचकें**, घनावलि, थांवला, खवळली, भरला, घाला हीं **भूतभूतकालवाचकें**, व फेडौनि, देखौनि, तूटौनि अशीं **पूर्वकालवाचकें** पुष्कळच आढळतात. **हेत्वर्थक रूपांत** पूसों आलासि, आइकों धावला, करूं सरलें, जाणों गेला, भरूं पाहे, धाडूं पांत, अशीं तर कित्येक आहेत.

आतां ज्ञानेश्वरींत कांहीं **सामासिक शब्द** पाहिल्यावर ते सकृद्दर्शनीं तरीं कानाला कसेसेच लागतात. उखिविखी, उदावादा, संसारगुंती आडवस्त्र आडशाखा, मनोमळ, खोकरपण, विवेकुसाहाण, दिवेलावणी, जोडभाता, ठसेठोमसे, अशा समासात कांहीं ठिकाणीं दोन्ही शब्द प्राकृत तर

कांहींत एक संस्कृत व प्राकृत अशी दोन भिन्न भाषिक शब्दांचा संयोग झालेला आहे. **निश्चयात्मक** अव्ययांत 'कीर' 'हान' व **क्रियाविशेषणांत** सारोक, निर्के, कीरु, ढालेढालें, आहाचवाहाच, संमोहर, ही उल्लेखनीय आहेत.

**वाक्प्रचार व सांप्रदाय** यांसंबंधानें एवढें तरी खास म्हणतां येईल कीं; देशांतील चालीरीतींत, आचारविचारांत, संस्कृतींत जसजसा फरक पडत जातो, तसतसे वाक्प्रचारही बदलत जातात. निरनिराळे वाक्प्रचार रूढ होणें, हें भिन्न भिन्न संस्कृतींच्या संगमावर अवलंबून आहे. ज्ञानेश्वरांचा काळ स्वराज्याचाच काय, पण परकीय आक्रमणाचा वारा देखील न लागलेला असा असल्यामुळें, त्याकाळीं भाषेचें किंवा वाक्प्रचारांचें स्वरूप निर्भेळ मराठी असल्यास त्यांत नवल नाहीं. ( १ ) निंबलोण करणें, ( २ ) पाटु बांधणें, ( ३ ) राणिव देणें, ( ४ ) दिवालि करणें, ( ५ ) आंग वळघणें, ( ६ ) आर घेणें, ( ७ ) डिरु फुटणें, ( ८ ) वृत्ति करणें, ( ९ ) डाल घरणें, ( १० ) सरले होणें, ( ११ ) तलु घेणें, ( १२ ) थाऊ बांधणें, ( १३ ) कांडें घालणें, ( १४ ) फुली नुघडणें, ( १५ ) वेलि जाए, ( १६ ) वाटु पेलणें, ( १७ ) रूप करणें, ( १८ ) देव्हडा वाहणें, ( १९ ) झाडा देणें, ( २० ) पत्र घेणें, ( २१ ) फारा होणें, ( २२ ) कीर्तिमुखत्व करणें. अशा वाक्प्रचारांत यादवकालीन जीवनाचा ठसा उमटलेला आहे. मात्र, वाहतें पाणी, जालेन सुखें, यांत नामाप्रमाणेंच विशेषणाचें लिंग ठेवण्याची पद्धति; आनंदमोदबहल, गुरुपदपद्मपरागविपरातिज्ञानदीपिका; निरूपणभाषाप्रतीति, अशीं संस्कृत शब्दांची जागजागी केलेली योजना, सांघतें, पूसतें, अशा शब्दांत संस्कृतांतील 'तृ' प्रत्ययांत नामाप्रमाणें झालेलीं रूपें, व सूदली साती, आजि मनोरथासि तूं फल जोडिलासि, भागीन होती ( भागिनः संति ) इत्यादि वाक्यप्रयोगावरून मराठीनें अजून संस्कृत भाषेचें वळण सोडलेलें नव्हतें, असें दिसून येतें. जातांजातां

विचारूनि=विचार करून व निवडे=वाटे, असा केलेला उपयोगही सूक्ष्म वाचकांच्या लक्षांत येतोच.

## ज्ञानेश्वरकालीन समाज

ज्ञानेश्वरींतील उपरिनिर्दिष्ट भाषासांप्रदायावरून व ठिकठिकाणीं योजलेल्या अनेक उपमादृष्टांतावरून तत्कालीन राजकीय, सामाजिक व आर्थिक परिस्थितीचें कांहींसें आकलन होतें. महाराष्ट्रावर त्या कालीं यादवाची राजवट चालू असल्यानें, पट्टाभिषेक करण्याचें ( ९ ) किंवा राज्यावर बसविण्याचे ( १२ ) प्रसंग लोकांच्या विशेष परिचयाचे असावे. सर्वसाधारण बहुजनसमाज चांगला सुखी असून, आताप्रमाणेंच दिवाळी साजरी करण्याची ( १२ ), निंबलोण उतरून टाकण्याची ( ८ ), व प्रतिपदेला चंद्रदर्शन शुभ मानण्याची ( ४३७ ), त्या काळीं चाल होती. स्त्रिया पतीचें न'व जशा घेत नसत ( ४३५ ), तसाच अपमानित अतिथि घरमालकाचा पुण्यसंचय आपल्याबरोबर घेऊन जातो. ( ३३३ ), अशीही समजूत रूढ होती. पण अशा प्रकारची अंधश्रद्धा बोकाळत असूनही आपल्या गांवांतील रस्त्यावर दिवे लावणें (३८१), गूळ रांधतांना आधणांत क्षार टाकणें (४२४), द्राक्षाच्या वेलीला दुधाचें खत घालून तिला बहार आणणें (५५८), टांकसाळींत नाणीं पाडणें व जुगार खेळणें (४४८) अथवा समुद्राच्या पाण्याची वाफ होऊन मेघ बनत असल्याची प्रक्रिया माहित असणें (८६), अशा नागरीकनीतींत तत्कालीन लोक बरेच पुढारलेले होतें असें स्पष्ट दिसतें. ज्ञानेश्वरकालीन महाराष्ट्र बहुतांशीं कृषिप्रधान होता, हें याच अध्यायांतील, आर घेणें, डिरु फुटणें, डाल धरणें, सरले होणें, तलु घेणें, कांटे घालणें, अशा प्रकारच्या शेतकीविषयक परिभाषेनें सूचित होत असून, सोन्याचा दर साडे पंधरा ते सोळा रुपये असणें, ( ५३३ ) ( ३०९ ), व लोक नीलमण्याचा दुपदरी सर वापरीत ( ३८७ ), यावरून तत्कालीन लोकांची संपन्नताच अधिक डोळ्यांत भरते. एकंदरीनें यादवकालीन लोक

कृषिप्रधान, संपन्न व आत्मसंतुष्ट असून सश्रद्ध, भाविक व परंपरागत रूढीवर किंवा आप्तवाक्यावर विश्वास ठेवणारे होते, असें दिसून येतें.

श्रीमद्भगवद्गीता हा ग्रंथ प्राकृत जनांना सुगम व्हावा यासाठीं जन-बोलींतील शद्बांचा, लोकप्रचारांतील म्हणींचा, बहुजनसमाजांतील आचार-पद्धतींचा, समजुतींचा व निरनिराळ्या धंद्यांतील परिभाषेचा, ज्ञानेश्वरांनीं उपमादृष्टांतांच्या रूपानें भरपूर उपयोग करून घेतल्यामुळें, त्यांचा ग्रंथ म्हणजे तत्कालीन समाजस्थितीचा आरसाच म्हणावयास प्रत्यवाय नाहीं. आपल्या सभोंवतींच्या समाजाचें सहानुभूतिपूर्वक सूक्ष्म निरीक्षण करून लिहिणारा लेखक, स्वकालीन समाजेतिहासाच्या व भाषाशास्त्राच्या दृष्टीनें पुढील पिढ्यांना कसा उपकारक होतो, हें ज्ञानेश्वरमहाराजांच्या उदाहरणावरून कळून येतें. ज्ञानेश्वरांच्या ग्रंथांत त्यांच्या अलौकिक व्यक्तित्वाचें व तत्कालीन समाजस्थितीचें पडलेलें प्रतिबिंब, प्रस्तुत पंधराव्या अध्यायासारख्या तत्त्व-ज्ञानात्मक अध्यायांतही अंशतः दिसून आल्याशिवाय राहत नाहीं. ज्ञाने-श्वरीचा अभ्यास यासाठींच आधुनिक चिकित्सक दृष्टीनें होणें अत्यवश्यक आहे.

## प्रस्तुत प्रतीची संपादणी

प्रस्तुत प्रत तयार करतांना कै. रामचंद्र विष्णु माडगांवकर, कै. इति-हासाचार्य राजवाडे, व ब्रह्मीभूत नानामहाराज साखरे यांनीं संपादित केलेल्या तिन्ही प्रतींचा उपयोग केला असून, मूळ संहिता यादवकालीन भाषेच्या अनुषंगानें निश्चित करण्याचें धोरण स्वीकारल्यामुळें, मुख्यतः त्या भाषेला जवळची अशी राजवाडेप्रतच प्रमाणभूत मानली आहे. तथापि ज्या एक दोन स्थलीं राजवाड्यांचे पाठ अग्राह्य वाटले, तेथे माडगांवकर अगर साखरे यांचे पाठ वर स्वीकारून, राजवाड्यांचे पाठ खालीं तळ-टीपांत दिले आहेत. या शिवाय राजवाड्यांच्या संहितेंत कोठेच बदल केलेला नाहीं.

पण या तीन प्रतींतील ओवीसंख्या व ओव्यांचा क्रम लक्षांत घेतां, कांहीं ओव्यांचें न्यूनाधिक्य तर कांहींचें नवीनत्वही दिसून आलें. राजवाडेप्रतींत या अध्यायाची ओवीसंख्या ५६५ आहे, माडगांवकरप्रतींत ती ५९८ तर साखरेप्रतींत ती ५९९ आहे. या ३३ अगर ३४ अधिक ओव्यांच्या स्थानाचा विचार, त्या त्या स्थलीं टीपांत केला आहे, त्यावरून त्यांचें क्षेपकत्व ध्यानीं येण्यासारखें आहे. शिवाय गीतेच्या प्रत्येक श्लोकाखालीं ज्ञानेश्वरीटीका देतांना राजवाडेप्रतींतसुद्धां मूळ श्लोकाला अर्थाच्या व पदस्पष्टीकरणाच्या दृष्टीनें थोड्या विसंगत अशा ओव्या छापलेल्या आढळल्या. प्रस्तुत प्रतींत श्लोकाचा अर्थ व संदर्भ पाहून त्या खालील ओव्यांची ग्राह्याग्राह्यता ठरविली असून, पुनः कोणत्या श्लोकाखालीं कोणत्या ओव्या येणें इष्ट व युक्त हेंही राजवाडे, माडगांवकर व साखरे, यांच्या प्रतींच्या तुलनेनें ठरविलें आहे. यामुळें राजवाडेप्रतीची संहिता स्वीकारूनही त्या त्या श्लोकाखालीं येणाऱ्या ओव्यांच्या क्रमांत फक्त बदल केलेला येथे आढळून येईल. या अध्यायांत पदपाठ निश्चित करण्याचें काम फारसें पडलें नाहीं, तरी ओव्यांचे अर्थ देतांना सरळ व बुद्धिगम्य अर्थ करण्याकडेच लक्ष पुरविलें आहे, असें दिसून येईल. प्रस्तुत प्रतींत मी संपादिलेल्या बाराव्या, सोळाव्या, व पहिल्या अध्यायांप्रमाणेंच पंधराव्या अध्यायाच्या बहुविध व सांगोपांग अभ्यासाची दिशा दाखविण्याचा उपक्रम केला असल्यामुळें, विद्यार्थ्यांना व सर्वसाधारण अभ्यासकांना तो उद्बोधक व मार्गदर्शक होईल अशी आशा आहे.

कोल्हापूर.
१–११–५१

दत्तात्रय सीताराम पंगु



# प्रस्तुत अध्यायांतील ठळक विषय

# ज्ञानेश्वरी

## अध्याय पंधरावा

॥ श्रीगणेशायनमः ॥

आतां हृदय हें आपुलें । चौफलौनि[1] मलें । वरि[2] बैसउं[3] पाउलें । श्रीगुरुंचीं[4] ॥ १ ॥ ऐक्यभावाची आंजुलि । सर्वेंद्रिय-कुड्मलिं[5] । भरौनि[6] पुंण्यांजलि[7] । अर्घ्यु[8] देऊं[9] ॥ २ ॥ अनन्योदक-धुंवट[10] । वासना जें तन्निष्ठ । तें लागलेंसे अवोट । चंदनाचें ॥३॥ प्रेमाचनि भांगारें । निवाळूनि[11] नेपुरें[12] । लेवउं[13] सुकुमारें । पदें तियें ॥ ४ ॥ घेंनावालि[14] आवडी । अव्यभिचारें चोखडीं । तियें घालूं जोडीं । आंगुलिया[15] ॥ ५ ॥ आंनंदमोदबहल[16] । सात्विकाचें मुंकुल[17] । तें उंमललें[18] अंष्टदल[19] । ठेउं[20] वरि[21] ॥ ६ ॥ तेथें[22] अहं-

---

१ चौफळूनि-मा; चौफाळूनियां-सा. २ वरी-मा. सा. ३ बसैऊं-मा. सा. ४ श्रीगुरूचीं-मा, सा. ५ सर्वेंद्रिय कुड्मळीं-मा; सर्वेंद्रियकुड्मुळीं—सा. ६ भरूनियां-मा; सा. ७ पुष्पांजुळी-मा; सा. ८ अर्घ्य-मा. ९ देवों-मा; सा. १० अनन्योदकें धुवट-सा. ११ निवाळूनि-मा; सा. १२ नूपुरें-सा. १३ लेववूं-मा; लेवऊं-सा. १४ घणावली--मा; सा. १५ आंगुळियां--मा; आंगोळिया--सा. १६ आनंदामोद बहळ—मा; आनंदामोदबहुळ—सा. १७ मुकुळ--मा, सा. १८ उमळलें-मा. १९ अष्टदळ—मा, सा. २० ठेऊं--मा, सा. २१ वरी-मा; सा. २२ तेथे-मा; सा.

धूपुं[1] जाळूं[2]। सोहंतेजें ओंवाळूं[4]। सामरस्य[5] पोटाळूं[6]। निरंतर ॥७॥
माँझि[7] तनु आणि प्राण। ईया[8] दोन्ही पाउवां लेवउं[9] श्रीचरण।
करूं भोग[10]मोक्षीं निंबलोण। पायां तेयां[11] ॥ ८ ॥ ईया[12] गुरुचरण-
सेवा। हों पात्र तेयां[13] दैवा। जें सकळा[14]र्थाचा मेळावा[15]। पाडु
[16]बांधो ॥ ९ ॥ ब्रह्मीचें[17] विसंवणें[18] वेन्हीं। उन्मेखु[19] लाहे उंजरि[20]।
जें वाचेतें [21]इये करि[22]। सुधासिंधु ॥ १० ॥ पूर्णचंद्राचां[23] [24]कोडि।
वक्तृत्वा घापे कुरोंडी[25]। तैसी आणी गोडी। अक्षरांतें ॥ ११ ॥
सूर्यें अधिष्ठिली प्राची। जगा राणिवं[26] दे प्रकाशाची[27]। तैसी[28]
वाचा श्रोतेयां[29] ज्ञानाची। दिवाळि[30] करी ॥ १२ ॥ नादब्रह्म
खुजें। कैवल्य[31] हिं तैसें न सजे। ऐसा बोलु देखिजे। जणें
देवें ॥ १३ ॥ श्रवणसुखाचां[32] मांडवि[33]। विश्व भोगवी[34]
माधवी। तैसी सासिनली[35] बरवी। वाचावेली[36] ॥ १४ ॥

---

१ अहं हा धूपु—मा; अहं हा धूप-सा. २ जाळूं--मा; सा. ३ नाहंतेजें-मा; सा. ४ वोवाळूं—मा; सा. ५ सामरस्यें—मा; सा. ६ पोटाळूं—मा; सा. ७ माझी—मा, सा. ८ या – मा. ९ लेववूं-मा; लेऊं-सा. १० भोगमोक्ष-सा. ११ तया-मा, सा. १२ या-मा. १३ तया- मा, सा. १४ सकळार्थाचा--मा; सकळार्थमेळावा—सा. १५ मेळावां-मा. १६ बांधे-मा, सा. १७ ब्रह्मींचें-मा, सा. १८ विसवणें वरी—मा; सा. १९ उन्मेष—मा; उन्मेख-सा. २० उजरी – मा, सा. २१ ये – मा. २२ करी—मा, सा. २३ पूर्ण चंद्राचिया-सा. २४ कोडी-सा, मा. २५ करोंडी-सा. २६ राणीव-मा, सा. २७ प्रकाशींची—मा. २८ तेशी—मा, सा. २९ श्रोतयां—सा, मा. ३० दिवाळी-सा, मा. ३१ ही—मा, सा. ३२ श्रवणसुखाच्या--सा. ३३ मांडवीं—मा, सा. ३४ भोगी--मा, सा. ३५ सासने--मा; सासिन्नली—सा. ३६ वाचावल्ली-सा, मा.

ठाउ[1] न पवतां जेयाचा[2] । मनेंसि[3] मुरडली वाचा । तो देउ[4] होये[5] शब्दाचा । चमत्कारु ॥ १५ ॥ जें ज्ञानासि न चोजवे । ध्यानासि हिं[6] [7]नागवे । तें अगोचर फांवे । वोवी [8]माझि ॥ १६ ॥ [9]ऐव्हडें एक सौभग । वळघे वाचेचें आंग । [10]गुरुपदपद्मपराग । लाहे जें कां ॥१७॥ तरि बहू बोलों[11] काइ । आजि तें [12]अना ठाइं । मातें वांचूनि [13]नाहिं । ज्ञानदेउ ह्मणे ॥१८॥ जें तान्हेनि मियां अपत्यें । आणि माझें गुरु एकलौतें । ह्मणौनि [14]कृपेसिं एकहातें । जालें तिये ॥ १९ ॥ पाहा पां भरोवरी आघवी । मेहु[15] चातकासि रिचवी । मज [16]लागि गोसांवीं । तैसें केलें ॥ २० ॥ [17]ह्मणौनि रिकामें तोंड । करुं गेलें बडबड । किं[18] गीता ऐसें गोड । आंतुडलें ॥ २१ ॥ होएं[19] अदृष्ट आपैतें । तैं [20]वाळूंचि रत्नें [21]परौतें । उजू [22]आउंख तैं मारितें । लोभु करी ॥ २२ ॥ [23]आधांणि [24]घातले हरल । होंति[25] अमृताचे तादुळ[26] । [27]जेरि भुकेची राखे [28]वेळ । [29]जगन्नाथु ॥ २३ ॥ तियां[30] परी

१ ठावो–मा, सा. २ जयाचा–मा, सा. ३ मनेंसीं–मा, सा. ४ देवो–सा, दे वो–मा. ५ होय—मा, सा. ६ ही—मा, सा. ७ जें नागवे—मा, सा. ८ गोठीमाजी—मा. सा. ९ येवढें–मा, सा. १० श्रीगुरुपादपद्मपराग—सा. ११ बोलूं—सा. १२ आनीं—मा. १३ नाही—मा, सा. १४ कृपेसीं—मा. १५ मेघु—मा; मेघ—सा. १६ लागीं—मा, सा. १७ म्हणोनि—सा. १८ कीं—सा, मा. १९ होय—सा, मा. २० वाळूंचि—सा, मा. २१ परते–सा, मा. २२ आयुष्य–मा, सा. २३ आधणीं–सा, मा. २४ घातलिया–मा, सा. २५ होती–मा, सा. २६ तांदुळ—मा, सा. २७ जरी–मा, सा. २८ वेळ–मा, सा. २९ श्रीजगन्नाथु–सा. ३० तयापरी—सा, मा.

गुरु[1]। करिति[2] जैं अंगीकारु। तैं होउनि[3] ठाके सवंसारु[4]। मोक्षमयु[5] ॥२४॥ पाहा पां काइ[6] नारायणें। तेयां पांडवांचें ऊणें। कीजे चि ना पुराणें। विश्ववंद्यें ॥२५॥ तैसें श्रीनिवृत्तिराजें। अज्ञानपण हें माझें। आणिलें वोजे। ज्ञानाचिये[7] ॥२६॥ परि असो[8] हें[9] आतां। प्रेम रुळतसे[10] बोलतां। कें गुरुगौरवु[11] वर्णितां। उन्मेखु[12] आथि ॥२७॥ आतां तेणें चि पसायें। तुह्मां संतांचे[13] पांये[14]। वोलगैनें[15] मीं अभिप्रायें। गीतेचेनि[16] ॥२८॥ तरि तो चि प्रस्तुतिं। चौदावेया अध्यायाचां अंतीं। निर्णयो[17] कैवल्यपती। ऐसा केला ॥२९॥ जें ज्ञान जेयाचा[18] हातिं। तो चि समर्थु मुक्ती। जैसा शतमखु[19] संपत्ती। स्वर्गींचिये ॥ ३० ॥ कां शतें[20] एकें जन्मां। जो जन्मौन[21] ब्रह्मकर्मा[22]। करी तो चि ब्रह्मा। आनु[23] नोहे ॥ ३१ ॥ नाना सूर्याचा प्रकाशु। लाहे जेविं डोळसु[24]। तैं[25] ज्ञानें[26] चि सौरसु। मोक्षा .ा तो ॥ ३२ ॥ तरि[27] यथा[28] चि ज्ञानां लागि[29]। कव्हणी[30]

---

१ श्रीगुरु--मा, सा. २ करिती--मा, सा. ३ होऊनि-मा, सा. ४ संसारु-मा, सा. ५ मोक्षमय आघवा-सा. ६ काई-मा, सा. ७ ज्ञानाचिया-सा. ८ हे—सा. ९ असो—सा. १० रुळतसे-मा, सा. ११ गुरुगौरव—सा. मा. १२ उन्मेष-मा; उन्मेख—मा. १३ संतांचें--मा, सा. १४ मी पाये-मा, सा. १५ वोळगैन अभिप्रायें-मा; वोळगेन अभिप्रायें-सा. १६ गीतेचेन-मा; गीतेचेनी—सा. १७ निर्णो-मा. १८ जयाचां—मा; जयाच्या-सा. १९ शतमख—मा, सा. २० एक शत-सा. २१ जन्मोनि—मा, सा. २२ ब्रह्मकर्मी-मा, सा. २३ आन-मा. २४ डोळसु-मा, सा. २५ तेवीं--मा; तेविं--सा. २६ ज्ञानियां--सा. २७ तरी-मा. २८ या चि--मा; तया-सा. २९ ज्ञानालागीं-सा; मा. ३० कवणा-मा; सा.

पां योग्यता आंगि[1] । हें पांतां[2] जगिं[3] । देखिला एकुं[4] ॥ ३३ ॥
जेविं[5] पातालिंचें धन । दांवी[6] किर अंजन । परि होआवे लोचन ।
पांयलाचे[7] ॥३४॥ तैसें मोक्षु[8] देईल ज्ञान । एंथ किरं[9] नाहिं आन ।
परि तें चि थारे ऐसें मन । शुद्ध होआवें ॥ ३५ ॥ तांरि[10] विरंक्तु[11]
वांचूनि कें[12] हीं[12] । ज्ञानासि तगणें[13] नाहिं । हें विचांरूनि[14] ठांइं[15] ।
ठेविलें देवें ॥३६॥ आतां विरंक्तिची[16] कव्हणी परी । जें एउंनि[17]
मनातें वरी । हें[18] इं सर्वज्ञें श्रीहरी । देखिलें असे ॥ ३७ ॥
जैं[19] विषें रांधिली रसोये[20] । जेवणांरा[21] ठांउवें[22] होएं[23] । तैं तांट[24]
सांडूंनि[25] जाए । जियां[26] परी ॥ ३८ ॥ तैसी संसारा एयां[27]
समस्ता । जांणवे[28] जैं अनित्यता । तैं वैराग्य दवाडतां । पांठीं[29]
लागे ॥ ३९ ॥ आतां अनित्यत्व कैसें[30] । तें चि रुखांकारें[31]
मिसें । साधिजंत[32] अंसे[32] विश्वेशें । पंचदर्शी ॥ ४० ॥

---

१ आंगीं-मा; सा. २ पाहतां–सा; मा. ३ जगीं–मा; सा. ४ एक–मा. ५, जे पाताळींचेही निधान–सा; मा. ६ दावील--सा; मा. ७ पायाळाचे--मा, सा. ८ मोक्ष- मा, सा, येथ--मा, सा. ९ कीर--सा. १० तरी--मा, सा. ११ विरक्ती सा. १२ कहीं--सा. १३ तगणोंचि--सा. १४ विचारूनि--मा; सा. १५ ठाईं–मा, सा. १६ विरक्तीची--मा. सा. १७ येऊनी--मा; येऊनि- सा. १८ हें ही--मा, सा. १९ जे--मा, सा. २० रससोये--मा. सा. २१ जैं जेवणारा--मा, सा. २२ ठाउवी सा. २३ होये–मा; सा. २४ तो ताट–मा, सा. २५ सांडुनी–मा, सा. २६ जया--मा. सा. २७ या--मा. २८ जाणिंजे- सा. २९ पाठीं- मा. सा. ३० या कैसें--मा, सा. ३१ वृक्षाकार मिषें -मा, वृक्षाकारमिषें--सा. ३२ सांधिजतसे--मा; सांगिजत असे–सा.

उपाडिलें कवतिकें । झाड येरी मोहरा ठाके । तें वेगें जैसें सूंके[1] । तैसें हें न्हेवे[2] ॥४१॥ इयैं[3] एकी[4] पैरी । रूपकाचिया कुसरी सारितसे[5] वारी संसाराची ॥ ४२ ॥ करुनु[6] संसारु[7] वाऊ[8] । स्वरूपिं अहंते[9] ठाऊ[10] । होआवेआ[11] अध्यायो[12] । पंधरावा हा ॥ ४३ ॥ आतां हेंचि आघवें । ग्रंथगर्भिचें[13] सांघावें[14] । उपलविलें[15] जीवें । आकर्णिजो[16] ॥ ४४ ॥

॥ श्रीभगवानुवाच ॥

ऊर्ध्वमूलमधः शाखमश्वत्थं प्राहुरव्ययम् ।

छंदांसि यस्य पर्णानि यस्तं वेद स सर्ववित् ॥ १ ॥

तन्हिं[17] महानंदसमुद्रु[18] । जो पूर्णु[19] पूर्णिमाचंद्रु[20] । तो द्वारकेचा नरेंद्रु[21] । ऐसें म्हणे ॥ ४५ ॥ आंगा[22] पैं पांडुकुवंरा[23] । एंता[24] स्वरूपाचया[25] घरा । करीतुसे[26] आडवारा[27] । विश्वाभासु जो ॥ ४६ ॥ तो हा जगडंबरु । न्हवे[28] एथ[29] सवंसारु[30] । हा जाणे[31] महातरु । थांवला* असे ॥ ४७ ॥ परि एरां[32] रुखां[33] सारिखा ।

---

१ सुके–मा, सा. २ नव्हे–मा, नोहे–सा. ३ या--मा; याते—सा. ४ एके परी- सा. ५ सारीतसे--सा. ६ करूनि--मा. ७ संसार--सा. ८ वावो--मा, सा. ९ अहंतेचा--सा. १० ठावो--मा. सा. ११ होआवया--मा, सा. १२ अध्यावो मा, सा. १३ ग्रंथगर्भीचें-- सा. मा. १४ चांगावें -मा, सा. १५ उपलविजैल-- मा. सा. १६ आकर्णिजे--सा. १७ तरी- मा, तरि--सा. १८ महानंदु--सा. १९ पूर्ण--सा. २० पुर्णतेचा चंद्र--सा. २१ नरेंद्र--सा, २२ अगा-- मा, सा. २३ पांडुकुमरा--मा. सा. २४ येतां--मा. सा. २५ स्वरूपाचिया--सा. २६ करीतसे मा. सा. २७ विश्वाभास--मा. २८ नव्हे--मा; नोहे--सा. २९ येथ--सा, मा. ३० संसारु--मा, सा. ३१ जाणिजे--सा, * थांबला —सा. ३२ येरां--मा, सा. ३३ रुखां--राज.

तालि[1] मूलें[2] वरि[3] शाखा । तैसा न्हवे[4] म्हणौनि[5] लेखा । नेए[6] कव्हणा[7] ॥ ४८ ॥ आगी कां कुन्हाडी । होए[8] रिगावा जेरि[9] बुडिं[10] । तरि[11] हो कां भले[12] तेव्हडी । वरिचिली[13] वाढि[14] ॥ ४९ ॥ जे तूटलेया[15] मूला पासि[16] । उलंडैल[17] शाकासि[18] । तरि[19] तैसी गोठि[20] काइसी[21] । हा सोहपा[22] नोहे[23] ॥ ५० ॥ अर्जुना हें कवतिक । सांघतां[24] असे अलौकिक । जें[25] वाढि[26] अधोमुख । रुखा[27] एयां[28] ॥ ५१ ॥ जैसा भानु उंची[29] नेणों कें । रश्मिजाल तालिं[30] फांके । संवसारु[31] हें कावरुखें । झाड तैसें ॥ ५२ ॥ आणि आथिनाथि[32] तेतुकें[33] । रुंधलें एणों[34] चि एकें । कल्पान्तिचेन[35] उदकें । व्योम जैसें ॥ ५३ ॥ कां रविचां[36] अस्तमानीं । अंधारेन[37] कोंदे रजनी । तैसा[38] हा चि गगनीं । मांडला असे ॥ ५४ ॥ एया[39] फल ना चुंबितां । फुल[40]

---

१ तळीं-सा, मा. २ मुळें—मा, सा. ३ वरी—सा, मा. ४ नाहे—मा. सा. ५ म्हणौनि—मा, म्हणोनि—सा. ६ नयेचि—सा; नये-मा. ७ कवणा-सा. ८ होय सा, मा. ९ जरी-मा, सा. १० बुढीं-मा; बुडीं-सा. ११ तरी—सा, मा. १२ भलतेवढी-मा, सा. १३ वरिचील—मा, सा. १४ वाढी-मा, सा. १५ तुटलयां-मा; तुटलिया-सा. १६ मुळापासीं—मा, सा. १७ उलंडेल—सा. १८ कां शाखांसीं-मा; कीं शाखांसीं—सा. १९ परि—मा; परी-सा. २० गोष्टी—मा. २१ कायसी- मा. सा. २२ सोपा—मा, सा. २३ नव्हे—मा, सा. २४ सांगतां-मा, सा. २५ जे—मा. सा. २६ वाढी-मा; सा. २७ रुंखा— मा. २८ यया—सा; या—मा. २९ उंचीं—मा. ३० तळीं—मा, सा. ३१ संसारु—मा; संसार—सा. ३२ आर्थीनाथी—मा, सा. ३३ तितुकें—सा, मा. ३४ असें येणेंचि—मा, सा. ३५ कल्पान्तींचेन—मा; कल्पांतींचेनि—सा. ३६ रवीचां—सा, मा. ३७ अंधारेनि—सा. ३८ तैसाचि हा गगनीं—सा. ३९ यया—सा; या—मा. ४० फूल—मा, सा.

ना [1]तुरुंबितां । जें [2]कांहिं [3]पांडुसुता । तें [4]रुंख चि हा ॥ ५५ ॥ हा [5]ऊर्ध्वमूल आहे । परि [6]उन्मलला [7]नोहे । [8]एणें चि हा होये । [9]शाड्वलु गा ॥ ५६ ॥ आणि [10]ऊर्ध्वमूल ऐसें । निगदिलें [11]कीरु असे । [12]पारि [13]अधिं हीं असोसे । [14]मूल यया ॥५७॥ पैं [15]बल्बचेन महामारी । [16]पिंपलावडाचिया परी । [17]जेविं पारांबियां माझारि । [18]डाहालिया ॥ ५८ ॥ [19]तेविं गा धनंजया । संसारतरू [20]येया । आर्धी चि आथि खादियां । हें [21]इं नाहिं ॥ ५९ ॥ [22]तरि उर्ध्वा हि [23]कडे । शाखांचे मांदोडे । [24]दीसताति अपाडें । [25]सासिनले ॥६०॥ जालें गगन चि [26]पां बेलिये । कां वारा मांडला [27]रुंखाचेनि आयें । नाना [28]अवस्थे त्रीये । [29]उदैलों असे ॥६१॥ ऐसा हा एकु । [30]विश्वाकारु विटंकु । [31]उदैलो जाणें [32]रूखु ।

१ तुरंबितां—सा. २ कांहीं—सा. ३ पंडुसुता—सा. ४ रुंख–मा; रुखु--सा. ५ ऊर्ध्वमूळ—मा, सा. ६ उन्मूळला–मा, सा. ७ नव्हे--मा. ८ येणें--मा, सा. ९ शाड्वळू,-मा. सा. १० ऊर्ध्वमूळ--मा, सा. ११ कीर--सा; किर--मा. १२ परी-सा. १३ अर्धी—मा. सा. १४ मूळे—सा. मा. १५ प्रबळला चौमेरी— सा, मा. १६ पिंपळा कीं वडाचिया—मा; पिंपळा कां वडाचिया— सा; १७ जे—सा. १८ डाहाळिया असती—मा, सा. १९ तेवीं— मा. २० या—मा. २१ ही—मा, मा. २२ तरी—मा, सा. २३ ही—मा, सा. २४ दिसताति–सा, मा. २५ सांसिन्नले—मा; सासिन्नले-सा. २६ पाल्वीये–मा; पावेतिये-सा. २७ रुंखा-मा. २८ अवस्थात्रायें–मा; अवस्थात्रयें-सा. २९ उदयला--सा. ३० विश्वाकार-मा, सा. ३१ उदयला-सा. ३२ रुंखु—मा; रुखु--सा.

पासौनु[1] बहू[2] अर्जुना । जागणें जैसें आना । बोधाचें चि ॥ ४९६ ॥ कां रश्मि[3] हान[4] मृगजळा[5] । पासौनि[6] अर्कमंडळा[7] । अफांटु[8] तैसा[9] वेगळा[10] । उत्तमु[11] गा ॥ ४९७ ॥ नातरि[12] काष्टिच्या[13] काष्टाहूनि[14] । अनारिसा जैसा वन्हि[15] । तैसा क्षराक्षरा पासौनि[16] । आनु चि तो ॥ ४९८ ॥ पैं ग्रसौनि[17] आपुलियां[18] मर्यादा । एक करीतु[19] नदीनदां । उठिला[20] कल्पांतिचा[21] उदावादा । एकार्णवाचा ॥४९९॥ तैसें स्वप्न ना सुषुप्ति[22] । जागराची[23] गोठि चि[24] नाथि[25] । जैसी गिळिली[26] दिवोराती[27] । प्रलयतेजें[28] ॥ ५०० ॥ मग आपण[29] ना दुजें । असे नसे[30] हें नेणिजे । अनुभौ[31] निर्बुजें । बुडाला जेथ ॥५०१॥ ऐससें[32] आथि काहि[33] । तें तो उत्तमु[34] पुरुषु[34] पाहि[35] । जें परमात्मा इहिं[36] । बोलिजे नामीं ॥ ५०२ ॥ तें हिं[37] ऐथ[38] न

---

१ पासूनि-मा, सा. २ बहु ये-मा; बहुवे-सा. ३ रश्मी-मा, सा. ४ हन-मा, सा. ५ मृगजळा-मा, सा. ६ पासूनि-मा, मा. ७ अर्कमंडळा-मा, सा. ८ अफांट-मा. ९ तेवी-मा; तेविं-सा. १० वेगळा-मा, सा. ११ उत्तम--मा. सा. १२ हे ना--मा, सा. १३ काष्ठींच्या-सा; काष्ठांचा--मा. १४ काष्ठांहुनी--मा; काष्ठींहुनी--सा. १५ वन्ही--सा. १६ पासौनि--मा; पासुनी--सा. १७ ग्रसूनि--मा; ग्रासूनि--सा. १८ आपुली--मा; आपली-सा. १९ करीत--मा, सा. २० उठी--मा, सा. २१ कल्पांतीं -मा, सा. २२ सुषुप्ती-- २३ ना जागराची--मा, सा. २४ गोष्टी-मा; गोठी--सा. २५ आथि--मा; आथी--सा. २६ गिळिली--मा, २७ देवोराती—मा. २८ प्रळयतेजें--मा, सा. २९ एकपण--मा; सा. ३० नाहीं--मा, सा. ३१ अनुभवु-मा; अनुभव--सा. ३२ ऐसें--सा. ३३ कांहीं--मा; जें काहीं--सा. ३४ उत्तम पुरुष--मा; उत्तम पुरुषु--सा. ३५ पाहीं--मा, सा. ३७ इहीं--मा, सा. ३८ ही--मा, सा. ३९ येथ—मा, सा.

मिसलतां[1] । बोलिलें[2] जीवत्वें पांडुसुता[3] । जैसी बुडणेयांची[4] वार्ता । थडिएं[5] किजे[6] ॥ ५०३ ॥ तैसें विवेकाचिये कांठिं[7] । उभें केलेयां[8] किरीटी । पारावाराचिया गोठि[9] । करणें वेदां ॥ ५०४ ॥

यस्मात्क्षरमतीतोहमक्षरादपि चोत्तमः ॥
अतोस्मि लोके वेदेच प्रथितः पुरुषोत्तमः ॥१८॥

ह्मणौनि पुरुष क्षराक्षर । दोन्हि[10] देखौनि[11] अनावरें[12] । येयातें[13] ह्मणति[14] पर । आत्मरूप ॥ ५०५ ॥ अर्जुना ऐसियें[15] परी । परमात्माशब्द वेन्हि[16] । सूचिजे गा अवधारि[17] । पुरुषोत्तमु[18] ॥ ५०६ ॥ येन्हवि[19] नबोलणेनं[20] बोलणें । जेथिचें सर्व नेणिवां जाणणें । कांहिं[21] चि नहोउनि[22] होणें । जे वस्तु गा ॥ ५०७॥ सोहं तें हिं[23] अस्तवलें । जेथ[24] सांघणें चि मूकावलें । द्रष्टत्वेंसिं[25] विरालें[26] । दृश्य जेथ ॥ ५०८ ॥ आतां बिंबा

---

१ मिसळतां—मा, सा. २ बोलणें—मा, सा. ३ पंडुसुता—सा. ४ बुडणयाची—मा. ५ थडियेचां—मा, सा. ६ कीजे—मा, सा. ७ कांठीं—मा, सा, ८ ठेलेयां—मा; ठाकलिया—सा. ९ गोठी—मा. सा. १० दोन्ही—मा, सा. ११ देखोनि—मा, सा. १२ अवर—मा, सा. १३ यातें मा, सा. १४ म्हणती—मा, सा. १५ ऐसिया—मा, सा. १६ वरी—मा. सा. १७ अवधारीं—मा, सा. १८ पुरुषोत्तम—मा. १९ येन्हवीं—मा. सा. २० न बोलणेनि–सा. २१ कांही चि–मा; कांहींच—सा. २२ न हूनि—मा; न होनि—सा, २३ ही—मा, सा. २४ जेथ सांगतेंचि सांगणें जालें—मा, सा. २५ द्रष्टत्वेंसीं—मा. सा. २६ गेलें—मा. सा.

आणि प्रतिबिंबा । माजि कैंची[1] ही ह्मणों नैए[2] प्रभा । जर्‍हिं[3] कैसेन हिं[4] लाभा । जाएं[5] चि ना ॥ ५०९ ॥ कां घ्राणा[6] आणि फुला दोहिं[8] । वृत्ति[9] असे मांझारिलां[10] ठांइं[11] । न[12] दीसे[13] तर्‍हिं[14] नाहिं[15] । बोलों[16] नैए ॥ ५१० ॥ तैसें द्रष्टा दृश्य हें जाएं[17] । मग कोणुं[18] ह्मणे कांइ[19] आहे । हें[20] अनुभवें चि[21] पाहे । रूप जेयां[22] ॥ ५११ ॥ जो प्रकाश्यें विणें[23] प्रकाशुं[24] । जो ईशितव्यें ईशुं[25] । आपणेनें[26] चि अवकाशुं[27] । वेंसावितु[28] असे[29] ॥ ५१२ ॥ जो नादें आइकिजतां[30] नादु । स्वादें चाखाविजतां[31] स्वादु । जो भोगिजतु[32] असे आनंदु । आनंदें चि ॥ ५१३ ॥ सुखासि[33] सुख जोडलें[34] । जें तेज तेजासि[35] सांपडलें । शून्य हिं[36] बुडालें । शून्यिं[37] जियें ॥ ५१४ ॥ तो[38] पूर्णतेचा परिणामुं[39] । पुरुषु[40] गा

---

१ हे–सा. २ नये--मा, सा. ३ जर्‍हीं—मा, सा. ४ ही–मा; हे--सा. ५ जाये--मा, सा. ६ प्राण--सा. हा शब्द माडगांवकर व साखरेप्रतींत नाहीं. ८ दोहीं--मा, सा. ९ द्रुति–मा, सा. १० जे माझारिलिये–मा; जे माझारिला-- सा. ११ ठायीं–मा, सा. १२ ते न–मा, सा. १३ दिसे–मा, सा. १४ तरी--सा. तर्‍हीं--मा. १५ नाहीं--मा, सा. १६ ऐसें बोलों नये--मा, सा. १७ जाये--मा, सा. १८ कोण–मा, सा. १९ काय--मा, सा. २० हें चि—मा, सा. २१ तेचि--मा, सा. २२ तया–मा, सा. २३ वीण--मा, सा. २४ प्रकाश--मा, सा. २५ ईश-मा. २६ आपणेनि--मा; आपणेनी—सा. २७ अवकाश--मा. २८ वसवीत–मा, सा. २९ असे जो--मा, सा. ३० ऐकिजता-- सा. ३१ चाखिजे जो--मा; चाखिजता--सा. ३२ भोगीजतुसे--मा; भोगिज-तसे–सा. ३३ सुखासी--मा, ३४ जोडिलें--सा. ३५ तेजासी–मा, ३६ ही--मा, सा. ३७ महाशून्यीं--मा, सा. ३८ जो--सा. ३९ परिणाम--मा. ४० पुरुष--मा.

सर्वोत्तमु[1] । विश्रांतिचा[2] विश्रामु[3] । विराला जेथें[4] ॥ ५१५ ॥ जो आकाशा[5] हि वरि[6] उरता । ग्रासातें हिं[7] ग्रंसुनि[8] पुरता । जो बहुतें पाडें[9] बहुता । पांसौनि[10] बहू[11] ॥ ५१६ ॥ पैं नेणतेयां[12] प्रती । रूपे-पणाचीं[13] प्रतीती[14] । रूपें[15] नोहौनि[16] शुक्ति[17] । दावी [18]जेविं ॥५१७॥ कां नाना अलंकारदसे[19] । सोनें न लंपतां[20] आलें असे । विश्व नोहौनि[21] तैसें । विश्व जो धरी ॥५१८॥ हें असो जल तरंगा । [22]नाहिं सिनानेपणें[23] जेविं[24] गा । तेविं[25] सत्ताप्रकाशुं[26] जगा । आपण चि जो ॥ ५१९ ॥ [27]आपुलेयां संकोचविकासां[28] । आपण चि रूप वीरेशा । हा जळिं[29] चांदु[30] हीन[31] जैसा । [32]समूठ गा ॥५२०॥ तैसा विश्वपणें कांहिं[33] होए[34] । ना विश्वलोपिं[35] के[36] हि [37]जाए । जैसा[38] रातीदिहो नोहे । द्विधा रवि ॥ ५२१ ॥ तैसा कांहिं[39] चि

---

१ सर्वोत्तम--मा, पुरुषोत्तमु--सा, २ विश्रांतीचाही--मा, सा. ३ विश्राम--मा; ४ जेथे--सा. ५ विकासाही- मा, सा. ६ वरी--मा, सा. ७ ही- मा, सा. ८ ग्रंसूनि--मा, ग्रासूनि--सा. ९ बहुतां--मा, सा; १० पासूनि--सा. ११ बहु--मा, सा; १२ नेणतयाप्रती--मा, सा. १३ रुपेंपणाची--वा, सा. १४ प्रतीति--मा; १५ रुपें--मा, सा. १६ नहूनि--मा, न होनि- सा. १७ शुक्ती--मा, सा; १८ जेवी--मा, सा, १९ अलंकारदशे--मा. सा. २० लपत लपालें-- मा, सा. २१ न हूनि--मा, न होनियां--सा, २२ नाहीं--मा, सा; २३ सिनान पण--सा. २४ जेवीं--मा; २५ तेवीं--मा. २६ सत्ताप्रकाश--मा; दिसता प्रकाशु -सा. २७ आपुलिया--मा, आपलिया--सा. २८ विकाशा--मा; २९ जळीं--मा, सा; ३० चंद्र -मा; चंद्रु--सा. ३१ हन--मा, सा; ३२ समग्र -मा. समग्रु--सा. ३३ कांहीं--मा, सा; ३४ होय--मा; होये--सा. ३५ विश्वलोपीं--मा; सा. ३६ केंही--मा; कंहीं--सा. ३७ जाये- मा. सा, ३८ रात्रिदिवसें--मा. सा; ३९ कहीं--मा; कांहीं--सा.

कोण[1]ही कडे । काइसेनें[2] हि वेचिं[3] न पडे । जेयाचें[4] सांकडें[5] । जेयासि[6] चि ॥५२२॥ जो आपणपें चि आपणेयां[7] । प्रकाशितुसे[8] धनंजया । काइ[9] बोलों[10] जेयां[11] । नाहिं[12] दूजें[13] ॥ ५२३ ॥ तो गा मीं निरुपाधिकु । क्षराक्षरोत्तमु एकु । ह्मणौनु[14] ह्मणे वेदलोकु[15] । पुरुषोत्तमु ॥ ५२४ ॥

यो मामेवमसंमूढो जानाति पुरुषोत्तमम् ।
स सर्वविद्भजति मां सर्वभावेन भारत ॥ १९ ॥

परि असो ऐसेयां[16] । मज पुरुषोत्तमातें धनंजया । जाणे जो पोहालेयां[17] । ज्ञानामित्रें ॥ ५२५ ॥ चेइलेयां[18] आपुलें ज्ञान । जैसें नाहिं[19] चि होएं[20] स्वप्न । तैसें फुरतें[21] जेयां[22] त्रिभुवन । वांऊ[23] जालें ॥ ५२६ ॥ कां हातिं[24] घेतली[25] मालें[26] । फीटे[27] सर्पाभासाचा कांटालें[28] । तैसें[29] माझेन बोधें टवाला[30] ।

१ कोणी– मा, सा. २ कायिसेन-मा; कायिसेनि-सा. ३ वेंचीं– मा, सा. ४ जयाचें–मा, सा. ५ सांगडे-मा, सा. ६ जयासी-मा, सा. ७ आपणया–सा. आपणयां-मा. ८ प्रकाशितसे– मा; प्रकाशीतसें-सा. ९ काय–सा; कायि-- मा. १० बहुबोलों--मा, सा. ११ जया-मा. मा, १२नाहीं--मा, सा. १४दुजे--मा; सा. १४ म्हणोनि– सा. १५ मेद लोकु- सा. १६ ऐसिया - सा. १७ पाहलयां--मा; पाहलेया- सा. १८ चेइलयां– मा; चेइलिया-सा. १९ नाहीं-- मा, सा. २० होये– मा; होय– सा. २१ स्फुरतें-- मा, सा. २२ जया– मा; हा शब्द साखरे-प्रतींत नाहीं. २३ वावों – गा; सा. २४ हातीं - मा; सा. २५ घेतलिया-- सा. २६ माळा-- मा, सा. २७ फिटे-- मा, सा. २८ कांटाळा-- मा, सा. २९ तैसा-मा, सा. ३० टवाळा-- मा, सा.

नांगवे[1] जो ॥ ५२७ ॥ लेणें सोनें चि जो जाणे । तो लेणेंपण[2] तें वाॅऊ[3] ह्मणे । तेविं[4] जाणौनि[5] जेणें । वालिला[6] भेदु[7] ॥५२८॥ मर्ग[8] सर्वत्र सच्चिदानंदु । मीं चि एकु स्वतःसिध्दु । जो आपणेनासि[9] भेदु । नेणौनि[10] जाणे ॥ ५२९ ॥ तैसें[11] चि सर्व जाणितलें । हें[12] इं ह्मणणें थेकुलें । जें तेयाँ[13] सर्वे[14] उरलें । द्वैत नाहिं[15] ॥ ५३० ॥ ह्मणौनि[16] माझेयाँ[17] भजना । उचितं[18] तो चि अर्जुना । गगन जैसें आलंगना[19] । गगनाचेया[20] ॥५३१॥ क्षीर-सागरा परगुणें । किजे[21] क्षीरसागरपणें । कीं[22] अमृत चि होउनि मिलणें[23] । अमृतिं[24] जेविं[25] ॥ ५३२ ॥ साडपन्हरा[26] मिस-लावें[27] । तैरि[28] पन्हरें[29] चि जेविं होआवें । तेविं[30] मी जालेयां[31] संभवे । भाक्ति माझी ॥५३३॥ हां गा सिंधुसि[32] आनी होंति ।

---

१ मागवे-सा. २ तो-सा. ३ वावो—मा, सा. ४ तेवीं-मा. ५ मी जाणौनि-मा; मी जाणोनि-सा. ६ वाळिला—मा, सा. ७ भेद—मा ८ मग म्हणे-मा, सा. ९आपणेनसीं-मा,सा. १०नेणोनियां-सा. ११तेणें-मा, सा.१२ हेंहीं-मा, सा. १३ तया-मा,सा. १४सर्वत्र मा,सा. १५नाहीं-मा,सा.१६म्हणोनि-सा. १७माझिया-सा. १८ उचितु-सा. १९ आलिंगना—मा, सा. २० गगनाचिया-सा. २१ कीजे—मा, सा. २२ हा शब्द साखरेप्रतीत नाहीं. २३ मिळणें—मा, सा. २४ अमृतीं—सा, मा. २५ जेवीं-मा. २६ साडपंधरा-मा; साडेपंधरा —सा. २७ मिसळावें—मा, सा. २८ तरी—मा; तैं—सा. २९ पंधरें- मा; साडे-पंधरें सा ३० तेवीं-मा. ३१ जालिया-सा. ३२ सिंधूसि—मा, सा.

तरि[1] गंगा कैसेनें[2] फिरे माघौती[3] । ह्मणोनि मी नोहेंता[4] भक्ति[5] । अन्वयो[6] आहे ॥ ५३४ ॥ ऐसेया लागि[7] सर्वीं[8] प्रकारिं[9] । जैसा कल्लोळु[10] अनन्यु[11] सागरिं[12] । तैसा मातें अवधारीं । भजिनेला[13] तो[14] ॥५३५॥ सूर्या आणि प्रभे । एकवंकी[15] जेणें लोभें । तो पाडु मानु[16] लाभे । भजना तेया[17] ॥ ५३६ ॥

इति गुह्यतमं शास्त्रमिदमुक्तं मयानघ ॥
एतद्बुध्द्वा बुद्धिमान्स्यात्कृतकृत्यश्च भारत ॥२०॥

एवं कथिलेयादारंभ्य[18] । जें हें सर्वशास्त्रैकलभ्य । उपनिषदां सौरभ्य[19] । दशदळांचें[20] ॥५३७॥ हें जें[21] ब्रह्माचेनि[22] नवनीतें[23] । व्यासुप्रज्ञेचेनि[24] हातें । मथुनि[25] काढिलें आइतें[26] । सार आह्मीं[27] ॥ ५३८ ॥ जे ज्ञानामृताची जान्हवी । जे आनंद-

१ तरी—मा. २ कैसेनि--मा, कैसेन—सा. ३ मिळती-- मा, सा. ४ नव्हतां—मा; न होतां-- सा. ५ भक्ती-- मा, सा. ६ अन्वो-- मा. ७ ऐसया लागीं-- मा; ऐसिया-लागीं-- सा. ८ सर्वे-- मा, सा. ९ प्रकारीं-- मा. सा. १० कल्लोळु-- सा. कल्लोळ-- मा. ११ अनन्य- मा. १२ सागरीं-- सा, मा. १३ भजीनला-- मा; भजिन्नला— सा. १४ जो-- मा, सा. १५ एकवंकी-- सा. १६ मानूं-- सा. १७ तया— मा, सा १८ कथिलयादारभ्य-- मा, सा. १९ सौरभ्य- मा, सा. २० कमळदळां जेवीं— मा; कमळदळां जेविं--सा. २१ हा शब्द साखरेप्रतींत नाहीं. २२ शब्द-ब्रह्माचें— मा, सा. २१ निवावितें— मा; मथितें— सा. २४ व्यास प्रज्ञेचेन— मा; श्रीव्यासप्रज्ञेचेनि— सा. २५ मथूनि-- मा, सा. २६ आयितें-- मा, सा. २७ आह्मीं— मा, सा.

चंद्रिंची[1] सतरावी । विचारक्षीरार्णविंची[2] नवी । लक्ष्मी जे हे
॥५३९॥ ह्मणौनि[3] आपलेनि[4] पदें वर्णें । अर्थाचेनि[5] जीवें प्राणें ।
मीं वांचौनि[6] होउँ[7] नेणें । आन कांहिं[8] ॥ ५४० ॥ क्षराक्षरत्वें
समोहिर[9] जालें । तें[10] पुरुषत्वें[11] वोलिलें[12] । मग मज सर्वस्वें[13]
दीधलें[14] । पुरुषोत्तोमिं[15] ॥ ५४१ ॥ ह्मणौनि जागिं[16] गीता ।
मियां आत्मेन[17] पतिव्रता । जे हे प्रस्तुतिं[18] आतां । तुवां[19]
आकार्णिली ॥ ५४२ ॥ साच चि बोलाचें नोहे[20] शास्त्र । पैं
संसारु जीणतें[21] हें शस्त्र । आत्मा अवतरविते[22] मंत्र । अक्षरें इयें[23]
॥ ५४३ ॥ परि तुज पुढां सांघितलें[24] । तें अर्जुना ऐसें जालें ।
गोप्य धन काढिलें । माझें आजि[25] ॥ ५४४ ॥ मज चैतन्य-
शंभुचां[26] माथां । जो निक्षेपु होता पार्था । तयाँ[27] गौतमु

---

१ चंद्रींची—मा, सा. २ विचारक्षीरार्णवींची मा, सा. ३ म्हणोनि–सा. ४ आपुलेन–मा. ५ अर्थाचेन–मा. ६ वांचोनि–मा; वांचोनि–मा. ७ हों–मा; सा. ८ कांहीं–सा; कहीं–मा. ९ समोर–मा, सा. १० तयातें—मा; तयाचें–सा. ११ पुरुषत्व–मा, सा. १२ वाळिलें—मा, सा. १३ सर्वस्व मज—मा, सा. १४ दिधलें–मा, सा. १५ पुरुषोत्तमीं–मा, सा. १६ जगीं–मा, सा. १७ आत्मेनि—सा. १८ प्रस्तुत–मा, सा. १९ हा शब्द साखरेप्रतींत मागील चरणांत घातला आहे. २० नव्हे हें–मा; सा. २१ जिणतें–मा; जिणें–सा. २२ अवतरवी ते–सा. २३ यें–मा. २४ सांगितलें मा, सा. २५ आजी–मा. २६ शंभूचां–मा, सा. २७ तया–मा, सा.

जालासि आस्था । निधि[1] तुं[2] गा ॥ ५४५ ॥ चोखटिवां आपुलिया । पुढिला उगाणा घेयावेया । तेया[3] दर्पणांची[4] परी धनंजया । केली आह्मां ॥५४६॥ का भरलें चंद्रतारांगणीं[5] । नभ सिंधु आपणेयां[6] आणी । तैसा गीतेसिं[7] मी अंतष्करणीं[8] । सूदला[9] तुवां ॥५४७॥ जें त्रिविधमलकटां[10] । सांडिलासि[11] सूभटा[12] । ह्मणौनि गीतेसिं[13] मज वसैठा[14] । जालासि गा ॥५४८॥ परि हें काइ[15] बोलों[15] गीता । जे हे माझी उन्मेखलता[16] । जाणे तो समस्तां । मोहां मूके[17] ॥ ५४९ ॥ सेविली अमृतसरिता । रोगु दवडुनि[18] पांडुसुता[19] । अमरपण उचितां[20] । देउनि[21] घली[22] ॥५५०॥ तैसी गीता हे जाणितालिया । काइ[23] विस्मो[24] मोहो[25] जावेयां[26] । परि आत्मज्ञानें आपणपेयां[27] । मिलिजे[28] एथ[29] ॥५५१॥ जेयां[30]

---

१ निधी सा, २ तूं–मा, सा. ३ तया--सा. मा. ४ दर्पणाचीचि—सा. ५ चंद्रतारांगणीं–मा, सा. ६ आपणयामाजि--मा; सा. ७ गीतेसीं--मा, सा. ८ अंतःकरणीं—मा, सा. ९ सूदला—सा. १० त्रिविधीं मळकटां--मा; त्रिविधमळिकटा—सा. ११ तूं सांडिलासि—मा; तूं सांडलासि--सा. १२ सुभटा--मा, सा. १३ गीतेसीं--मा, सा. १४ वसौटा -मा, सा. १५ बोलों कायि–मा; बोलों काय--सा. १६ उन्मेषलता--मा; उन्मेषता--सा. १७ मुके–मा, सा. १८ दवडूनि--मा, सा. १९ पंडुसुता--सा. २० उचित्तां–सा. २१ देऊनि–मा, सा. २२ घाली–मा, सा. २३ कायि--मा; काय--सा. २४ विस्मयो--सा. २५ मोह-- सा. २६ जावया--मा, सा. २७ आपणयां-- मा; आपणपयां–सा. २८ मिळिजे--मा, २९ येथ--मा, सा. ३० जया--मा; सा.

आ[1]त्मज्ञानाचां । ठां[2]इं । कर्म आ[3]पुलेया जीविता पां[4]ई । होउं[5]-
नियां उतराई । लया जा[6]ए ॥ ५५२ ॥ हा[7]रपलें दा[8]उनि जैसा ।
मा[9]गु सरे वीरविलासा । ज्ञा[10]नें क[11]लसु व[12]ळघे जैसा । कर्मप्रासा[13]दा
॥ ५५३ ॥ ह्मणौनि ज्ञानियां पुं[14]रुखां । कृत्य क[15]रुं सरलें देखां ।
ऐसा अना[16]थांचा सखा । बोलिला तो ॥ ५५४ ॥ तें श्रीकृ[17]ष्ण-
वदनामृत । पां[18]थु भ[19]रुनि असे ॐ[20]संडतं । तं[21]व व्यासकृपा एं[22]तं ।
सं[23]जयासि ॥५५५॥ तो धृतराष्ट्रां[24] राया । सू[25]तं अ[25]से पान करावे[26]या ।
ह्मणौनि जीविं[27]तांतु ते[28]या । ने[29]व्हे चि भारी ॥५५६॥ ये[30]र्‍हविं
गीताश्रवं[31]णअवसरिं । आवडों लागतां अनधिकारी । परि से[32]खिं

1 आत्मज्ञानाच्या--सा. 2 ठायीं--मा, सा. 3 आपलेया--सा 4 पाहीं--मा, सा. 5 होऊनियां--मा. 6 जाय--मा, सा. 7 हरपले--सा. 8 दाऊनि--मा. दावूनि--सा. 9 माग--शा. 10 ज्ञान--मा. 11 कळस--मा, सा. 12 वळघे--मा, सा. 13 कर्मप्रासादाचा--सा. 14 पुरुषां--मा; पुरुषा--सा. 15 करूं -- मा, सा. 16 अनाथांचा-- मा. 17 श्रीकृष्णवचनामृत-- सा. 18 पार्थां-- सा. 19 भरोनि-- सा. 20 ओसंडत-- सा, वोसंडत--मा. 21 मग-- मा, सा. 22 प्राप्त-- मा, सा. 23 संजयासी-- मा, सा 24 धृतराष्ट्र -- सा. 25 सूतसे -- सा; सुतसे--मा. 26 करावया--मा, सा. 27 जीवितांत--सा. 28 या--सा; तया--मा. 29 नोहेचि-- सा. 30 ये-र्‍हवीं--मा, सा. 31 गीताश्रवणा--मा, गीताश्रवण अवसरी--सा. 32 सेखीं-- मा, सा.

ते चि उाजिरी[1] । पाति[2] लाभली ॥ ५५७ ॥ जेधवां[3] द्राक्षिं[4] दूध घातलें । तेधवां[5] वायां[6] गेलें गंमलें[7] । परि फलपार्कि[8] दूणावलें[9] । देखिलें[10] जेविं[11] ॥५५८॥ तैसिं हरिवक्त्रिंचीं[12] आखेरें[13] । संजयें सांघितलिं[14] आदरें । तिहिं[15] अंधु तो[16] अवसरें । सुखिया जाला ॥ ५५९ ॥ ते चि मऱ्हाटेनि विन्यासें । मियां उन्मखें[17] ठसेंठोमसें[18] । जाणों[19] नेणों[20] तैसें । निरोपिलें[21] ॥५६०॥ सेवंतिएं[22] अरसिकां हिं[23] । आंग पांतां[24] विशेषु[25] नाहिं[26] । परि सौरभ्य नेलें तिहिं[27] । भ्रमरिं[28] जाणिजे[29] ॥ ५६१ ॥ तैसें घडे[30] तें प्रमेय घेइजे । न्यून[31] तें[31] तें मज देइजे । जें नेणणें हें[32] साहाजें[33] । रूप किं[34] बाला[35] ॥५६२॥ परि[36] नेणतें जऱ्हि[37] होएं[38] । ताऱ्हि[39] देखौनि[40]

---

१ उजरी– मा, सा. २ पातला— मा, सा. ३ जेव्हां-- मा, सा. ४ द्राक्षीं— मा, सा. ५ तेव्हां-- सा. ६ तरी वायां - मा. ७ हा शब्द माडगांवकरप्रतींत नाहीं. ८ फळपाकीं-- मा, सा ९ दुणावलें-- मा, सा. १० देखिजे-- सा. ११ जेवीं-- मा. १२ हरिवक्त्रींचीं– मा, सा. १३ अक्षरें--मा, सा. १४ सांगितलीं– मा, सा. १५ तिहीं-- मा, सा. १६ तोही-- मा, सा. १७ उन्मेषें-- मा, सा. १८ ठसेठोंबसें– मा, सा. १९ जीं जाणें-- सा; जाणे-- मा. २० नेणें-- मा, सा. २१ २१ निरूपिलें-- मा. २२ सेवंतिये-- मा. सेवंतीये—सा. २३ ही-- मा, सा. २४ पाहतां--सा. २५ विशेष-- मा. २६ नाहीं-- मा; २७ तिहीं– मा, सा. २८ भ्रमरीं-- मा, २९ जाणीजे-- मा. ३० घडतें-- मा, सा. ३१ उणें-- मा, सा. ३२ हें चि-- मा, सा. ३३ सहजें-- सा, साहजें– मा. ३४ कीं– मा, सा. ३५ बाळा-- मा, सा. ३६ तरि-- सा. ३७ जऱ्ही-- मा, सा. ३८ होये-- मा. सा. ३९ तऱ्ही-- मा, सा. ४० देखोनि– सा.

बापु[1] किं[2] माए[3]। हरिखु[4] कें हिं[5] न माए[6]। चोज करिति[7] ॥५६३॥ तैसें संत माहिएर[8] माझें। तुह्मिं[9] मीनलेयां[10] मीं लाडैजे[11]। तें चि ग्रंथाचेनि व्याजें। जाणिजो जी ॥ ५६४ ॥ आतां विश्वात्मकु[12] माझा[13]। स्वामी श्रीनिवृत्तिराजा। तो अवधारु[14] वाक्यपूजा। ज्ञानदेउ[15] ह्मणे ॥ ५६५ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे
श्रीकृष्णार्जुनसंवादे पुरुषोत्तमयोगो
नाम पंचदशोऽध्यायः।
॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

---

१ बाप-सा. २ कीं-सा; कां-मा. ३ माय-मा; माये-सा. ४ हर्षे-मा; हर्ष-सा. ५ हीं-मा, सा. ६ माये-मा; समाये-सा. ७ करिती--मा, सा. ८ माहेर--मा, सा. ९ तुम्हीं मा, सा. १० मीनलयां--मा; मिनलिया-सा. ११ लाडें जे—सा. १२ विश्वात्मक-मा. १३ हा माझा-मा, सा. १४अवधारू—मा, सा. १५ ज्ञानदेवो-मा, सा.



# टीपा व स्पष्टीकरण

ज्ञानेश्वरीच्या यापूर्वीच्या पहिल्या, सहाव्या, दहाव्या, बाराव्या अशा अध्यायांचे आरंभ ओझरते जरी पाहिले, तरी तेथे गुरुस्तुतीच्या रुपानें ज्ञानेश्वरांनीं बराच ग्रंथविस्तार केल्याचें दिसत असून, प्रस्तुत पंधराव्या अध्यायांतही या परंपरेला अनुसरून पहिल्या २८ ओंव्या, त्यांनीं श्रीगुरुचरणमानसपूजेंत खर्ची घातल्या आहेत. पुढें सोळाव्या व सतराव्या अध्यायांतही त्यांनीं असेंच अनुक्रमें सद्गुरुसूर्यस्तवन व गुरुरायगणेंद्रनमन केलें असून, शेवटच्या अध्यायांत तर आरंभीं व शेवटीं गुरुनमन करून गुरुस्तुति करण्याचें आपल्या वाणीला वेडच लागलें आहे, असा कबुलीजबाबच त्यांनीं देऊन टाकला आहे. ज्ञानेश्वरांनीं अंगिकारलेल्या नाथपंथांत गुरुभक्तीला विशेष महत्व होतें, म्हणुनच त्यांनीं आपल्या ग्रंथांत गुरुस्तुतीला एवढें महत्वाचें स्थान दिलें हें खरें असलें, तरी ज्ञानेश्वरांच्या मुळच्या विनम्र व श्रद्धाशील वृत्तींत आपले गुरु व ज्येष्ठ बंधु निवृत्तीनाथ यांच्याबद्दल नितांत आदर वसत असावा, हेंही अगदीं साहाजिकच होतें. ज्ञानेश्वर म्हणुनच येथे आपल्या हृदयांत गुरूंच्या पावलांची स्थापना करण्याचा संकल्प करतात. **ओ. १-चौफळौनि**-चौरंग करून ( नाम क्रियापद ). आतां आपलें हृदय हाच चौरंग करून त्यावर श्रीगुरुचीं पावलें बसऊं. आपल्या हृदयाचा चौरंग करून त्यावर गुरूंच्या पावलांची स्थापना करूं. ज्ञानेश्वरांना आपल्या गुरूंच्या पादुकांची मानसपूजा करावयाची असल्यानें, त्यांची प्रथम ते हृदयरूपीं आसनावर स्थापना करतात. ज्याची पूजा करावयाची त्याची प्रथम कोणत्या तरी स्थानीं स्थापना करावी लागते. ज्ञानेश्वरांनीं येथें आपल्या गुरूंच्या पायांची पूजा आरंभतांना, त्यांची आपल्या हृदयाच्या चौरंगावरच स्थापना केली आहे. गुरूंच्या पावलांचें स्मरण ज्ञानेश्वरांना नित्य आहे असा अर्थ.

**ओ. २**—आपल्या हृदयासनावर स्थापलेल्या गुरुपादुकांना आतां अर्घ्य देतात. **अर्घ्यु**—गंध, पुष्प व अक्षता यांसह ओंजळींत पाणी घेऊन तें

देवावर सोडणें याला अर्घ्य म्हणतात. येथें ऐक्यभावावर ओंजळीचें, सर्व इंद्रियांवर कलिकांचें व पुण्यावर जलाचें, अशीं रूपकें कल्पिलीं आहेत. **ऐक्यभावाची** इ.— आत्मा व परमात्मा यांचें ऐक्य आहे या भावनेची ओंजळ. **सर्वेंद्रिय** इ.—पांच कर्मेंद्रियें व पांच ज्ञानेंद्रियें अशीं दहा इंद्रियें हींच कोणी कुड्मलें अथवा पुष्पकालिका, अशा दशेंद्रियरूपीं पुष्पकळ्यांनीं. **पुण्यांजलि—** पुण्यरूपीं जलाचें अर्घ्य. आत्मापरमात्मैक्यरूपीं भावनेची ओंजळ, दशेंद्रियांच्या कळ्यांनीं भरून पुण्यरूपीं जलाचे अर्घ्य गुरुपादुकावर अर्पण केले आहे. सर्वाभूतीं समभाव झालेल्या मनानें सर्व दशेंद्रियें व पुण्यसंचय आपण गुरूंच्या पायावर अर्पण केला आहे, असे ज्ञानेश्वर सांगतात. दशेंद्रियांच्या व्यापाराचें व पुण्यसंचयाचें अशा रितीनें गुरुचरणावर उदक सोडल्यानंतर, आपल्या हांतून भावी जन्माला कारणीभूत होणारीं फलाशायुक्त कर्मे, होणार नाहींत व अशीं कर्मेंच झालीं नाहींत म्हणजे आपण जन्ममरणाच्या फेऱ्यांत सांपडणार नाहीं, असा ज्ञानेश्वरांचा आशय आहे. आपल्या दहा इंद्रियाकडून होणाऱ्या कर्मांमुळें व आपण केलेल्या पापपुण्यामुळें, प्राण्याला जन्ममरणाच्या चक्रांत सांपडावें लागतें. अशीं कर्मे व पुण्यपाप हींच जर ईश्वरार्पण किंवा गुरुचरणार्पण केलीं, तर पुढें कसल्याच कर्मांचा संभव नसल्यामुळें; जन्म व मरण प्राप्त होण्याचे कारणच उरणार नाहीं. ज्ञानेश्वर अशा मोक्षाच्या उद्देशानेंच आपल्या सर्व कर्मांचें व पापपुण्यांचें उदक गुरुचणावर सोडून मोकळे झाले आहेत. **ओ. २** — आतां या ओंवींत गुरुचरणांना चंदनाची उटी लावण्याचा उपक्रम केला आहे. गुरुपादुकांची प्रथम एका आसनावर स्थापना करून त्यांना अर्घ्य दिल्यानंतर, मानसपूजाविधीच्या क्रमानें यापुढें त्यांना चंदन किंवा गंधलेपन करणें ओघानेंच येतें. तोच प्रकार येथें पुनः अध्यात्मिक रूपकाचा अवलंब करून वर्णिला आहे. **अनन्योदक** इ.—गुरूंच्या ठिकाणीं असणारी जी अनन्यभक्ति, त्या अनन्यभक्तीच्या शुद्ध पाण्यांत धुतलेली गुरुनिष्ठेची, गुरुसेवेची, जी वासना, तीच गुरुचरणांना लावलेली चंदनाची उटी होय. चंदनाचें खोड चांगल्या स्वच्छ पाण्यांत उगाळून मगच त्या चंदनाचा लेप देवतामूर्तीवर करतात. येथें ज्ञानेश्वरांनीं गुरुनिष्ठारूपीं चंदनाचें खोड गुरुबद्दलच्या अनन्यभक्तीच्या पाण्यांत उगाळून तो चंदनाचा लेप गुरुचरणावर लावला आहे. **अघोट** — अखंडित लेप. पातळ नव्हे तर जाड असा लेप. आपली

गुरुबद्दलची अनन्यभक्तीची भावना असून, त्या भावनेने निर्माण झालेली गुरुसेवेची इच्छा गुरुचरणांना व्यापून राहिली आहे, असा ज्ञानेश्वरांचा इत्यर्थ आहे. गुरूच्या अनन्यभक्तीनें निर्माण झालेली गुरुसेवेची आपली वासना गुरुचरणीं अखंड आहे, असा त्यांचा सांगण्याचा भाव आहे. **ओ. ४** – या व पुढील ओंवीत गुरुचरणांना अलंकार समर्पण करतात. **प्रेमाचेनि इ०**––गुरुप्रेमरूपीं सुवर्णाचीं. **भांगारें** – सुवर्णाचीं. हें नेपुराचें विशेषण आहे. **निर्वाळूनि** – स्वच्छ करून, उजळा घालून. गुरुप्रेमरूपी सोन्याचीं केलेलीं नूपुरें, उजाळा देऊन तीं त्या सुकुमार गुरुचरणांत घालूं. **नेपुरें**–पादभूषण, पैंजण. गुरुप्रेमरूपी झळझळीत सोन्याचें पैंजण मी गुरुचरणीं घालतो, असें म्हणण्यांत ज्ञानेश्वरांनीं आपलें उत्कट व जाज्वल्य गुरुचरणप्रेमच व्यक्त केलें आहे. आपल्या गुरुप्रेमानें गुरुचरण असे अलंकृत करण्यांत देखील ज्ञानेश्वरांचा विनय दिसून येतो. **ओ. ५** – येथे आणखी जोडवीं हा अलंकार गुरुचरणांना अर्पण करतात. **घनावलि**–घणावलेली, दृढ झालेली, निश्चित झालेली. पहा " पै सावधपणें जैसें । घार्हावलें आलसें । सुषुप्ति बैसे । घणावोनि॥ – ज्ञानेश्वरी--१४-१४१. गुरुचरणाबद्दलची दृढ झालेली आवड ही एक. **अव्यभिचारें**––एकनिष्ठेनें जी चोखडी, चोख आहे, अशी दुसरी. ज्ञानेश्वरांनीं येथे गुरूंच्या दोन चरणांत दोन जोडवी घातलीं आहेत. एक गुरुचरणाबद्दल दृढ झालेल्या आवडीचें जोडवें, व दुसरें गुरुचरणाबद्दलच्या एकनिष्ठतेचें जोडवें, असा हा दोन जोडव्यांचा जोड आहे. गुरुचरणाबद्दलची आपली आवड जशी दृढ आहे, तशीच ती एकनिष्ठ किंवा अनन्य आहे असेंच ज्ञानेश्वरांनीं येथे सूचित केलें आहे. **आंगुलिया** – जोडवीं. **ओ. ६** – यानंतर गुरुचरणावर कमल वाहिलें आहे. **आनंदमोदबहळ** – ' आनंदामोदबहल ' असा पाठ असणें चांगलें. ब्रह्मानंदाच्या आमोदानें, सुगंधानें प्रचुर असे अष्टसात्विक भावांचें उमललेलें कमल, आतां गुरुचरणावर ठेऊं. **सात्विकाचें**–सात्विकभावरूपीं कमल. सात्विकभाव ही स्थायि व व्यभिचारी या भावांमधील अवस्था असून, हिच्या ठिकाणीं सहज, अकृत्रिम, सत्य अशा भावना व्यक्त असतात. अशा सात्विक भावनेंतच भक्ताचें मन आराध्यदेवतेकडे आकर्षिलें जातें. हे सात्विक भाव स्वेद स्तंभ, रोमांच, स्वरभंग, वेपथु (कंप), वैवर्ण्य, अश्रु, व प्रलय असे आठ आहेत. म्हणून येथे ' अष्टदल ' असा मुद्दाम उल्लेख केला आहे. ब्रह्मानंदाच्या सुगंधानें

बहरलेलें आपलें अष्टसात्विकभावाचें कमल ज्ञानेश्वरांनीं गुरुचरणीं अर्पण केलें आहे. गुरुचरणांना वंदन करतांना आपले अष्टसात्विक भाव कसे अगदीं बहरून येऊन मन एका विशेषप्रकारच्या आनंदानें भरून गेल्याचें ज्ञानेश्वर सांगतात. **ओ. ७**–वरील सहा ओंव्यांत मानसपूजेंतील आसन, अर्घ्य, गंध, अलंकार व पुष्प इत्यादि गुरुचरणांना अर्पण केल्यावर आतां धूप, दीप, आलिंगन यांची येथे पाळी आली आहे. **अहंधूपु** – अहंकार किंवा अहंभावरूपीं धूप. असा अहंकाराचा धूप जाळणें म्हणजे मीपणा नष्ट होणें. मीपणा नष्ट झाल्याशिवाय गुरूबद्दल ऐक्य निर्माण होणार नाहीं. म्हणून ज्ञानेश्वरांनीं गुरुचरणापुढें मीपणाचा धूप जाळून तो नष्ट केला आहे. **सोहंतेजे**—'सः परमात्मा अहं' अशा महावाक्याचा दीप ज्ञानेश्वरांनीं गुरुचरणाना ओवाळला आहे. आत्मा व परमात्मा हे एकच आहेत, या ज्ञानाचा दीप हृदयांत पाजळला कीं, मोक्षाला वेळ लागत नाहीं. ज्ञानेश्वरांनीं अशा ज्ञानाचा दीपच गुरुचरणांना ओवाळला आहे. ज्ञानेश्वरांना अशा ज्ञानाची प्रतीति झाली होती असाच त्याचा अर्थ आहे. **सामरस्य**–गुरुशिष्यैक्य. **पोटाळूं**--आलिंगूं. अशा रितीनें अहंभाव नष्ट होऊन आत्मापरमात्मैक्याचें ज्ञान अंगीं बाणल्यावर मग गुरुशिष्यैक्य होण्यास काय वेळ ? म्हणून असें ऐक्य मग आपण निरंतर कवटाळूं, असें ऐक्य आपणास मग सहजच प्राप्त होईल, असा ज्ञानेश्वरांचा आशय आहे. **ओ. ८–पाउवां**-पादुका, खडावा. आपल्या शरीराच्या व प्राणाच्या अशा दोन खडावा, जोडे मी आतां गुरुचरणीं, गुरूंच्या पायांत घालीन, असें ज्ञानेश्वर मोठ्या कृतज्ञतेनें सांगतात. ज्ञानेश्वर आपल्या गुरुकृपेबद्दल एवढे कृतज्ञ आहेत कीं, आपल्या शरीराचे व प्राणाचे जोडे करून जरी त्यांनीं गुरूंच्या पायांत घातले, तरी गुरूनीं केलेल्या उपकारांची फेड होणार नाहीं, असें त्यांना वाटतें. एकाद्याचे आपल्यावर फार उपकार झाले तर "माझ्या अंगाच्या कातड्याचे जोडे करून जरी आपल्या मी पायांत घातले, जरी आपलें उपकार फिटणार नाहीत" असें आपण नित्याच्या व्यवहरांत जसें म्हणतो, तशाच उक्तीचा ज्ञानेश्वरांनीं येथे अवलंब केला आहे. **भोगमोक्षीं**—ऐहिक सुखोपभोग व पारलौकिक मोक्ष यांचें गुरुचरणावर निंबलोण करूं, असें ज्ञानेश्वरांनीं आपल्या या गुरुमानसपूजेच्या शेवटीं म्हटलें आहे. **निंबलोण**—दृष्ट काढण्यासाठीं घ्यावयाचे कडू निंबाचीं पानें, मीठ, मोहरी इ.

पदार्थ. दृष्ट काढतांना हे पदार्थ ओवाळून टाकावयाचे असतात. येथे ज्ञानेश्वरांनीं गुरुचरणावरून भोगमोक्षाचें निंबलोण केलें, म्हणजे भोग व मोक्ष हे गुरुचरणा॰ वरून ओवाळून टाकले असा अर्थ. गुरुचरणसेवेपुढें ऐहिक सुखोपभोगांची व पारलौकिक मोक्षसुखाची ज्ञानेश्वरांना किंमत वाटत नाहीं, असाच भाव त्यांनीं व्यक्त केला आहे.

**ओ.** ९--याप्रमाणें गुरुचरणांची अध्यात्मिक मानसपूजा केल्यावर, ज्ञानेश्वर येथे गुरुसेवेमागील आपला हेतु स्पष्ट करतात. **इया** इ. — या गुरुचरणसेवेनें मला असें दैव लाभावें कीं, ज्यामुळें सकळ इच्छित अर्थांचा समुदाय मला पाट बांधील, किंवा मला पट्टाभिषेक करील. या गुरुचरणसेवेनें मला असें दैव लाभावें कीं, ज्यामुळें मला सर्व इच्छित वस्तूंची प्राप्ति व्हावी. अशा इच्छित वस्तूंची प्राप्ति होण्याइतकें दैव गुरुकृपेनें आपणास अनुकूल होईल, अशी ज्ञानेश्वरांना खात्री आहे. **पाटु बांधणें** – पट्टाभिषेक करणें, स्वामित्व देणें. **जें** – जें दैव मला सर्व इच्छित वस्तूंचें स्वामित्व देईल. **ओ.** १० — गुरुचरणसेवेनें प्राप्त झालेल्या दैवानें आणखी काय काय होईल तें सांगतात. **ब्रह्मिचें** इ.–परब्रह्माच्या ठिकाणीं विश्रांति मिळण्यापर्यंत, अर्थात् परब्रह्माच्या प्राप्तीपर्यंत. **उन्मेख** – माझें ज्ञान उत्कर्ष पावेल. **विसवणें**-विश्रांति. **वेऱ्हीं** – पर्यंत. **उन्मेखु**-ज्ञान. **उजरि**-उत्कर्ष. गुरुचरणकृपेनें माझें दैव अनुकूल होऊन माझें ज्ञान ब्रह्मप्राप्ति होण्याइतकें वाढेल. माझें ज्ञान मला ब्रह्मपद मिळवून देण्याइतकें वृद्धिंगत होईल. अशा श्रेष्ठ प्रकारच्या ज्ञानानें माझी वाणी म्हणजे प्रत्यक्ष अमृताचा सागरच होईल. आपल्या वाणीला प्रत्यक्ष अमृताचें सामर्थ्य येईल, असें ज्ञानेश्वर सांगतात. आपल्या वाणींत श्रोत्यांना मोक्ष देण्याचें सामर्थ्य येईल असाच तेथे आशय आहे. **ओ.** ११— गुरुकृपेनें दैव अनुकूल झाल्यावर आपलें वक्तृत्व काय दर्जाचें होईल, त्याचेंही वर्णन करतात. **पूर्णचंद्राचा** इ.–कोटी पूर्णचंद्रांची माझ्या वक्तृत्वावरून कुरोंडी, करावी, कोटि पूर्णचंद्र माझ्या वक्तृत्वावरून ओवाळून टाकावे, इतकी माझ्या मुखांतील अक्षरांना गोडी येईल. चंद्र हा सुधाकर आहे, तो आपल्या किरणांतून अमृताचा निष्यंद करतो अशी समजूत आहे. पण असे अमृतस्रावी कोटी पूर्णचंद्र जरी माझ्या वक्तृत्वावरून ओवाळून टाकले, तरी गुरुकृपेनें माझ्या वाणीला आलेल्या गोडीची ते बरोबरी करूं शकणार नाहींत, असा ज्ञानेश्वरांचा आत्म॰

**विश्वास** आहे. **घापे**—घातली जाईल. ( घाल धातूचें कर्मणि प्रयोगाचें रूप, घातले जातें किंवा घातलें जाईल या अर्थी ) **कुरौंडी**—ओवाळणी. **तैसी**—चंद्राच्या किरणांतून स्रवणाऱ्या अमृताइतकी गोडी आपल्या वाणीला येईल, असें ज्ञानेश्वर आत्मविश्वासानें सांगतात. पण हें सर्व गुरुकृपेनें प्राप्त झालेल्या दैवानें घडून येणार आहे. असे दैववान् आपण आहों असाच ध्वनि ज्ञानेश्वरांनीं येथे प्रकट केला आहे. **ओ. १२**-अशा दैवाच्या आनुकूल्यानें आपली वाणी श्रोत्यांना ज्ञानाची कशी खैरात करील, तें आणखी एक भव्य उपमा देऊन सांगतात. **सूर्ये** इ.-सूर्यानें आश्रय केलेली पूर्व दिशा जशी सर्व जगाला प्रकाशाचें साम्राज्य उघडून देते, तद्वतच गुरुकृपेचें अधिष्ठान लाभलेली आपली वाणी आपल्या श्रोत्यांना ज्ञानाचा लखलखाट करून सोडील. **राणिव**—राज्य. **दिवालि करणें**-लखलखाट करणे, गर्दी करणे. **ओ. १३**—अशी गुरुकृपेचें अधिष्ठान लाभलेली आपली ज्ञानसंपन्न वाणी, केवढी सामर्थ्यशाली होईल तें आणखी वर्णन करतात. **जेणें दैवें**—ज्या गुरुचरणसेवेनें प्राप्त झालेल्या दैवानें, वाणीला असें माधुर्य येईल कीं, त्याच्यापुढें नादरूपानें अवतरलेलें ब्रह्मही खुरटें वाटावें ! गुरुकृपेच्या दैवानुकूल्यानें वाणीला अशी मधुरता प्राप्त होईल कीं, त्यापुढें सुस्वर गायनही फिकें पडावें. **नादब्रह्म**—नादरूपानें अवतरलेलें ब्रह्म, सुस्वर गायन. **कैवल्य इ०**—किंवा कैवल्यसुख अथवा मोक्षसुखही त्या वाणीच्या श्रवणसुखापुढे मुळींच शोभूं नये. गुरुकृपेचें दैव प्राप्त झाल्यामुळें, आपली वाणी अशी मधुर होईल कीं, तिच्यापुढें सुस्वरगायनही फिकें वाटेल व त्या वाणीचें श्रवणसुख इतकें उत्कट असेल कीं, त्याची प्रत्यक्ष मोक्षसुखदेखलि बरोबरी करणार नाहीं. **न सजे**—शोभणार नाहीं. **ओ. १४**—आपली वाचारूप वेल श्रवणसुखाच्या मांडवावर अशा कांहीं जोरानें बहरेल कीं, जगाला तिच्यामुळें मोगरीच्या सुगंधाचा आनंद लुटावयास मिळावा ! वसंत ऋतूंत मोगरीच्या सुवासानें लोकांना जसा नितांत आनंद मिळतो, तसाच आनंद श्रोत्याना आपल्या वाणीच्या श्रवणानें मिळेल, असें ज्ञानेश्वर सांगतात. **माधवी**—वसंत ऋतूंत फुलणारी एक वेल, मोगरी. **सांसिनलि**—बहरली, प्रफुल्लित झाली. पहा—" तेणें तोखें सदाफळ झाडें । वनश्री सांसिनली चहुंकडे—" नरेंद्र; रुक्मि. स्व. ७७४ **ओ. १५**—ज्या देवाचें अथवा परब्रह्माचें ठाव ठिकाण न सांपडल्यामुळें, मनाला

व वाणीला परतावें लागतें, तो देव अथवा परब्रह्म गुरुकृपेच्या महिम्यानें शब्द-गोचर होतो, असा चमत्कार घडून येतो. परब्रह्माचें वर्णन वास्तविक वेदांना किंवा मनाला करतां न आल्यामुळें, तें न करतांच त्यांना परतावें लागलें आहे. पहा– " यतो वाचो निवर्तंते अप्राप्य मनसा सह. " निर्गुण परब्रह्माचे वर्णन वेदांना व मनाला करणें अशक्य आहे. कारण तें शब्दातीत आहे. तथापि अशा वर्णनातीत परब्रह्माचें शब्दचित्र रेखाटण्याचा चमत्कार, आपणास केवळ गुरूंच्या अनुग्रहामुळेंच करतां आला आहे, असा ज्ञानेश्वरांचा अभिप्राय आहे. गुरुकृपेचा महिमा असा अपार आहे कीं, तो प्राप्त झालेल्या शिष्याला, निर्गुण निराकार अशा परब्रह्माचें स्वरूप रेखीव शब्दांत श्रोत्यांपुढें उभे करण्याचा चमत्कार करून दाखविता येतो. जी गोष्ट वेदांनाही शक्य झाली नाहीं, ती गुरुकृपेमुळें आपणास शक्य झाली असा ज्ञानेश्वरांचा भाव परब्रह्माचें वर्णन शब्दांत हुबेहूब करण्यांत आपण यशस्वी झालों तें केवळ गुरुकृपेमुळेंच होय, असें सर्व श्रेय ज्ञानेश्वरांनीं गुरूंनाच देऊन टाकलें आहे. **ओ. १६**—पुनः हीच गोष्ट थोड्या निराळ्या भाषेंत सांगतात. **अगोचर**–इंद्रियांना जाणण्यास अशक्य असें परब्रह्म. जें परब्रह्म कोणत्याही ज्ञानानें जाणतां येत नाहीं, जें ध्यानानेंही आपलेसें करतां येत नाहीं, जें इंद्रियग्राह्यही नाहीं, तें माझ्या ओवींला मात्र प्राप्त होतें. माझी ओवी किंवा माझी वाणी मात्र अशा परब्रह्माचें वर्णन करूं शकतें. हा गुरुकृपेचाच महिमा होय. **चोजवे**—जाणवे. **नागवे** —न आंगवे=न सांपडे, स्वाधीन होत नाहीं. **पावे**—प्राप्त होई. **ओ. १७—गुरुपदपद्मपराग**--गुरुचरण-रूपी कमलाचा सुगंध जेव्हां प्राप्त होतो, तेव्हांच वर सांगितलेलें सौभाग्य वाणीला प्राप्त होतें. निर्गुण निराकार अशा परब्रह्माचें वर्णन करण्याचें सौभाग्य जें वाणीला येतें, तें गुरुचरणसेवेनेंच होय, असें ज्ञानेश्वरांनीं येथे पुनरपि म्हटलें आहे. **पद्म-पराग**—कमलगंध. **आंग वलघणें**–प्राप्त होणें.

**ओ. १८**—आतां ज्ञानदेव म्हणतात, " तर मी आतां अधिक काय सांगू ? गुरुकृपेचें हें भाग्य माझ्याशिवाय दुसऱ्या कोणास मिळालेलें नाहीं. " निवृत्तिनाथ हे ज्ञानदेवांचे ज्येष्ठ बंधु व तेच त्यांचे गुरु असल्यामुळें, त्यांना गुरूचा घरच्या घरीं लाभ झाला. म्हणून गुरुचरणसेवेच्या भाग्याचा लाभ आपणाला जसा सहज झाला तसा दुसऱ्यास झाला नाहीं, हें त्यांचें म्हणणें अगदीं सार्थ

आहे. **अना ठाईं**-दुसऱ्या ठिकाणीं, दुसऱ्या कोणास. **ओ. १९**—आतां गुरुकृपेचें हें भाग्य आपणालाच कां लाभलें, याचें स्पष्टीकरण ज्ञानेश्वर येथे करतात. **जें**— याचें कारण असे कीं, माझ्या गुरूचें मी एकुलतं एक तान्हें बाळ असल्यामुळें त्यांच्या कृपेला मी एकटाच पात्र झालो त्यांची कृपा कवळ माझ्या एकट्याच्याच हातची होऊन बसली. **एकलौतें**—एकुलतं एक. **एकहातें**- त्यांच्या कृपेचा कारभार असा एकहाती झाला. गाय जशी एकाच धार काढणाऱ्याच्या सवईमुळें एकहाती होते, तद्वत् गुरूंच्या घसटींतला मी एकटाच शिष्य असल्यामुळें, त्यांची कृपा देखील माझी एकहाती झाली आहे. गुरुकृपेची धार माझ्याशिवाय दुसऱ्यास काढतां येणार नाहीं असा अर्थ. **ओ. २०**—असें पहा कीं, मेघ मोठ्या सामग्रीनें जसा चातकासाठीं वर्षाव करतो, त्याप्रमाणेंच स्वामीनीं, गुरूनीं, माझ्याबाबतींत केलें आहे. मेघाची मार्गप्रतीक्षा करणाऱ्या चातकपक्ष्यासाठीं मेघानें जसा पाण्याचा वर्षाव करून त्याला संतुष्ट करावें, त्याप्रमाणें गुरूंनीं देखील माझ्यावर आपल्या कृपेचा वर्षाव करून मला तृप्त केलें आहे. **भरोवरी आघवी**-मोठ्या सामग्रीनें (तृ.) **रिचवी**-वर्षाव करी. **मेहु**—मेघ. **ओ. २१**—अशी गुरुकृपा माझ्या पाठीशीं होतीं, म्हणूनच माझें तोंड रिकामी बडबड करीत असतांना, त्याला गीतेसारखा गोड विषय अनायासें व्याख्यानाकरतां सांपडला. वास्तविक मला प्रथम कांहीं विषय नसल्यामुळें, माझी रिकामीच बडबड चालू होती. पण गुरुकृपेनें माझ्या बडबडीला, व्याख्यानाला गीतेसारखा सुरस विषय सांपडला ! माझ्या व्याख्यानांत गीतेचा जो विषय सहज आला, गीता ही माझ्या बडबडीचा जी विषय होऊन बसली, ती निव्वळ गुरुकृपेमुळें ! **आंतुडणें**—सांपडणें, प्राप्त होणें. पहा—"सांग पांडुरंगा मज हा उपाव ॥ जेणें तुझे पाव आंतुडती ॥—तुकाराम. **ओ. २२**–हीच गोष्ट एक दोन दृष्टांतांनीं सांगतात. **होए** इ.-प्रारब्ध जर वश होईल, तर हातांत घेतलेल्या वाळूचीं देखील रत्नें होतील. **परौते**—पलीकडे. दुसऱ्या बाजूस, उलट. पहा-' रंका परौते गाळूं '-ज्ञानेश्वरी अ. १२-१६. **आपैतें**—वश. नशीब जर अनुकूल होईल, तर हातांत घेतलेल्या वाळूचीं उलट रत्नें होतील. पहा-" विषमप्यमृतं क्वचिद्भवेदमृतं वा विषमीश्वरेच्छया "—रघुवंश ८. ' त्यानें हातांत धरलेली माती देखील सोनें होते ' असें भाग्यवानाबद्दल आपण आजच्या

व्यवहारांतही म्हणतो. **उजू** इ.—आयुष्य जर सरळ असेल, तर मारणारा देखील प्रेम करील. आयुष्याची दोरी जर बळकट असेल, तर मारणारा शत्रु देखील मित्राप्रमाणें प्रेम करील असा भाव. **मारितें**-मारणारा. **उजू**-सरळ, अखंड. वाळूचीं रत्नें होणें हें जसं अनुकूल नशिबावर व मारणाऱ्यानेंही उलट प्रेम करणं हें जसं आयुष्याच्या बळकटपणावर अवलंबून आहे, तद्वत् माझ्या बडबडीला गीतेसारखा विषय सहज सांपडणें, हें निवळ गुरुकृपेवरच अवलंबून आहे. **ओ. २३**—परमेश्वर जर भुकेची वेळ राखील, परमेश्वराच्या मनांत कोणीकडून तरी जगवायचंच आलं, तर आधणांत घातलेल्या खड्यांचा देखील अमृततुल्य भात तयार होईल. ईश्वराच्या कृपनं खडे शिजविले, तरी त्याचा सुंदर भात होईल असा अर्थ. **हरल**—खडे. **अमृताचे**-अमृतासारखे गोड. परमेश्वर याप्रमाणें कांहींही करूं शकेल. आपण म्हणतोंच ना ' भुकेला कोंडा अन् निजेला धोंडा. ' हा चमत्कार परमेश्वरच घडवितो. **ओ. २४**-त्याप्रमाणें गुरु जर शिष्याचा अंगिकार करतील, ते जर शिष्यावर कृपा करतील, तर अवघा संसार मोक्षमय होऊन जाईल. शिष्य जन्ममरणरूप संसारांतून सुटून त्याला ब्रह्मनिर्वाणरूप मोक्ष मिळेल. शिष्याला असा मोक्ष देण्याचें सामर्थ्य फक्त गुरूंतच आहे. **ओ. २५** गुरुकृपेनें शिष्याचें कसें कल्याण होतें, गुरु शिष्यांचा कसा पाठिराखा होतो, याच एक पौराणिक उदाहरण देतात. " असें पहा कीं, विश्ववंद्य असा पुराण पुरुष जो नारायण श्रीकृष्ण, त्यानें आपलें भक्त जे पांडव, त्याना कधी उणें म्हणून कांहीं पाडलेंच नाहीं. त्यांना कमी म्हणून कांहीं पडूंच दिलें नाहीं. द्रौपदीवस्त्रहरणप्रसंगीं द्रौपदीला वस्त्रें पुरवून तिची लाज राखणें, दुर्वास ऋषि पांडवाचें सत्वहरण करण्यास आला असतां, शिष्यांसह त्याला यथेच्छ भोजन घालून पांडवांचें सत्त्वरक्षण करणें, इतकेंच नव्हे तर अर्जुनाचें सारथ्य करणें, या गोष्टीं श्रीकृष्ण पांडवांचा कसा पाठिराखा होता हेंच सिद्ध करतात. शिवाय श्रीकृष्णानें अर्जुनाला भगवद्गीतेचा उपदेश करून ज्ञानसंपन्न केलें, ही गोष्ट देखिल पांडवांबद्दल त्याला वाटत असलेल्या आस्थेचाच द्योतक आहे. **ओ. २६**-म्हणून ज्ञानेश्वर म्हणतात कीं, श्रीकृष्णानें पांडवांना जसें कांहीं कमी पडूं दिलें नाहीं, त्याचप्रमाणें " श्रीनिवृत्तिनाथांनीं सुद्धां माझ्या अज्ञानाला ज्ञानाचें तेज आणलें. माझ्या अज्ञानाला देखील ज्ञानाची योग्यता आणली. " निवृत्तिनाथ

हे ज्ञानेश्वरांचे गुरु असल्यामुळें, त्यांनीं आपल्या अज्ञानाचेंही कौतुक करून आपल्या-कडून गीताप्रवचन करविलें, व त्यांच्या प्रोत्साहनामुळे व पाठिंब्यामुळेंच आपल्या तोंडून निघणाऱ्या शब्दांना ज्ञानाचें नीट स्वरूप आलें, असें ज्ञानेश्वर मोठ्या विनयानें व प्रांजलपणानें सांगतात. श्रीकृष्णांनीं अर्जुनाला जसें ज्ञानसंपन्न केलें, तसेंच निवृत्तिनाथांनीं आपणास ज्ञानाच्या पायरीवर बसविलें, असें म्हणण्याचा त्यांचा भावार्थ आहे. **वोजें**—चांगुलपणाला, व्यवस्थितपणाला. **ओ. २७**—हें आतां पुरें ! कारण या बोलण्यानें, वाच्यतेनें, प्रेम कमींच होतें. शिवाय गुरूंचा गौरव वर्णन करण्याचें मला तरी ज्ञान कोठें आहे ? त्यांचा गौरव करण्याइतकें ज्ञानही मजजवळ नाहींच. **रुळतसे**--मळतसे. ज्ञानेश्वरांचें म्हणणें असें कीं, प्रेमाची वाच्यता केली कीं, त्याला कमीपणा येतो. प्रेम ही बोलून दाखविण्याची वस्तू नसून ती प्रत्यक्ष करण्याचीच वस्तु आहे. **ओ. २८**—आतां त्या गुरूंच्याच प्रसादानें गीतेचा अभिप्राय सांगून तुम्हां संतांच्या पायांची मी सेवा करीन, असें ज्ञानेश्वर श्रोत्यांना अनुलक्षून म्हणतात. गीताप्रवचनाच्या रूपानें मी तुम्हां संतश्रोत्यांची सेवा करीन असा भाव. **पसायें**--प्रसादानें. **वोलगैन** सेवीन, सेवा करीन. **ओ. २९**-येथून ३३ ओवीपर्यंत पांच ओव्यांत मागील १४ व्या अध्यायांतील विषयाचें अनुसंधान व प्रस्तुत १५ व्या अध्यायांत पुढे येणाऱ्या विषयांचा प्रस्ताव केला आहे. श्रीकृष्णांनीं आपल्या गीतेच्या १४ व्या अध्याच्या शेवटीं कोणता सिद्धांत मांडला, तेंच पुढील ३० ओवीमध्यें सांगितलें आहे. **निर्णय** सिद्धांत. **कैवल्यपति**-कैवल्याचा, कैवलस्थितीचा स्वामी, श्रीकृष्ण.

**ओ. ३०**-तो सिद्धांत असा कीं, ज्याच्या हातांत ज्ञान, तो मोक्षाचा अधिकारी. शंभर यज्ञ करणारा जसा स्वर्गांतील संपत्तीचा मालक, तसा ज्ञानी हा मोक्षाचा धनी. हाच सिद्धांत श्रीकृष्णांनीं चौदाव्या अध्यायाच्या शेवटीं मांडला. **शतमखु**-शंभर यज्ञ करणारा. शंभर यज्ञ करणाऱ्याला इंद्रपद व स्वर्गांतील सर्व वैभव प्राप्त होतें, अशी समजूत आहे. **ओ. ३१**-किंवा जो शंभर जन्म यज्ञादिकांसारख्या बाह्य कर्मांच्या खटपटींत घालवितो, तोच ब्रह्मपद मिळवितो, दुसरा कोणी नाहीं. **बाह्यकर्मे**-मनाशीं संबंध नसणारीं यज्ञयोगासारखीं कर्में. 'ब्रह्मकर्मा' असा पाठ घेतल्यास त्याग संध्या ब्रह्मकर्म करणारा असा त्याचा अर्थ

होईल. ओ. ३२-किंवा डोळस माणसालाच ज्याप्रमाणें सूर्याचा प्रकाश लाभतो, त्याप्रमाणें ज्ञानानेंच मोक्षाची गोडी चाखतां येते वर सांगितल्याप्रमाणें हाच सिद्धांत चवदाव्या अध्यायाच्या शेवटीं मांडण्यांत आला आहे. ओ. ३३-आतां हें ज्ञान मिळविण्याची योग्यता कोणाच्या अंगीं आहे हें पाहूं गेल्यास, जगांत एकच पुरुष दृष्टीस पडतो. यापुढें ओ. ३३-४४ या ओव्यांत जो विषय मांडला आहे तो सामान्यपणें असाः-(१) ज्ञानी तोच मोक्षाचा अधिकारी हा चवदाव्या अध्यायाच्या शेवटीं मांडलेला सिद्धांत असून ( २ ) ज्ञान होण्यास मन शुद्ध व्हावें लागतें व ( ३ ) मन शुद्ध होण्यास तें वैराग्यसंपन्न होणें अवश्य आहे, व पुनः विरक्तता येण्यास संसाराचें अनित्यत्व मनाला पटलें पाहिजे. ( ४ ) म्हणून हें संसाराचें अनित्यत्व पटविण्यास त्यावर अश्वत्थ वृक्षाचें रूपक, प्रस्तुत पंधराव्या अध्यायांत करण्यांत आलें आहे. ओ. ३४—अंजन भूमिगत द्रव्य दाखवितें, पण तें ज्या डोळ्यांत घालावयाचें, ते डोळे पायाळूचेच आसावयाला पाहिजेत. पायाळू माणसानेंच विशिष्ट प्रकारचें अंजन डोळ्यांत घातलें म्हणजे भूमिगत द्रव्य दिसतें, अशी ज्ञानेश्वरकालीन समजूत होती. कारण हा दृष्टांत ज्ञानेश्वरांनीं अनेक वेळां योजला आहे. ओ. ३५-भूमिगत द्रव्य दिसायला पायाळूचेच डोळे जसे पाहिजेत, तसेंच मोक्ष मिळविण्यारा ज्ञानच पाहिजे. ज्ञानच मोक्ष देईल दुसरं कोणी नाहीं परि ३०—पण तें (ज्ञान) स्थिर होण्यासाठीं शुद्ध मनाची जरूरी आहे. थारे—स्थिर होई ओ. ३६-पण विरक्ताशिवाय ज्ञानाचा टिकाव कुठंच लागणार नाहीं, असा सिद्धांत भगवंतांनीं विचार करूनच येथें मांडून टाकला आहे. ठाईं--या ठिकाणीं, प्रस्तुत अध्यायांत. ओ. ३७-आतां मनाला एकदम येऊन बिलगणाऱ्या विरक्तीचा प्रकार तरी कसला असतो, याचाही विचार सर्वज्ञ अशा श्रीकृष्णांनीं केला आहे. परी-प्रकार. ओ. ३८—जेव्हां आपल्या पुढील अन्न विषयुक्त आहे, असें जेवणाऱ्याला ठाउक होतें, तेव्हां तो ज्या प्रकारें आपल्यापुढील ताट टाकून जातो. वैराग्याचा प्रकार असाच असतो असें पटविण्यासाठीं हा दृष्टांत दिला आहे. विषदिग्ध अन्न जसं ताडकन् टाकलं जातं, तसाच संसार ही ताडकन् सोडला पाहिजे. रसोये--अन्न. ओ. ३९-तसेंच या सर्व संसाराची अनित्यता जेव्हां मनाला पटते, तेव्हां वैराग्य नको म्हणून मागें ढकललं तरी तें पाठीस लागतं. संसार हा अनित्य नाशवंत आहे हें उमगलं कीं,

मग वैराग्याबद्दल निराळी खटपट करावयास नको, तें आपोआप धांवत येतेंच. संसाराचें अनित्यत्व उगमणं म्हणजेच वैराग्य बाणणं होय, असा भाव. संसाराच्या अनित्यत्वाच्या ज्ञानाची वैराग्यांत व परिसमाप्ति होते. **ओ ४०**–आतां हें संसाराचें अनित्यत्व किंवा अशाश्वतता कशी आहे, हें संसारावर वृक्षाचें रूपक करून श्रीकृष्णांनीं प्रस्तुत पंधराव्या अध्यायांत सिद्ध केलें आहे. **रुखाकारें मिसें**–वृक्षाच्या आकाराच्या मिषानें, वृक्षाचें रूपक करून. **पंचदशीं**–पंधराव्या अध्यायांत. **ओ ४१**–झाड उपडलें कीं, त्याची उलटी बाजू (बुंधा) आपणांस दिसते. असें उपडलेलें झाड वाळतें, पण हें संसाररूपीं झाड तसें वाळणारें नव्हें. या संसाररूपी वृक्षाचा बुंधा जरी उपडल्याप्रमाणें वर आहे, तरी हें झाड इतर सामान्य वृक्षाप्रमाणें लवकर वाळणारें, सुकणारें नव्हें. **कवतिकें**–कौतुकानें. **येरी मोहरा**–उलट्या बाजूनें. **ठाके**–उभे राहतें. **ओ ४२**–याप्रमाणें संसारावर झाडाचें रूपक कुशलतेनें करून, भगवान् श्रीकृष्ण मुमुक्षूंना जन्ममरणाच्या फेऱ्यांतून सोडवितात. **कुसरी**–कौशल्यानें. **संसाराची वारी**–पुन: जन्मण्याची व मरण्याची येरझार. **सारिखे**–चुकवितो. **ओ. ४३**–संसार मिथ्या आहे असें समजून, अहंभाव किंवा मीपणा आत्मस्वरूपांत लुप्त होऊन जावा, विलीन व्हावा, यासाठींच श्रीकृष्णानीं या पंधराव्या अध्यायाची योजना केली आहे. पंधराव्या अध्यायाचें प्रतिपाद्यच येथें सांगून टाकलें आहे. संसार खोटा आहे असें समजणे व अहंभाव नष्ट होणें, हेंच खरें ज्ञान होय. थोडक्यांत "ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या जीवो ब्रह्मैव नापर:" असें समजणें हेंच सर्व ज्ञानाचें सार आहे. **ओ ४४**–आतां गीताग्रंथांतील हेंच ज्ञान सांगावें, या हेतूनें येथें विस्तारानें सांगितलें आहे, तें तुम्हीं मन लावून ऐकावें असें ज्ञानेश्वरांनीं श्रोत्यांना अनुलक्षून म्हटलें आहे. गीतेमध्यें हें ज्ञान भगवंतांनीं सांगितलें आहे तेंच, विस्तारानें आपण सांगणार आहो. तरी मन लावून ऐका, असा ज्ञानेश्वरांचा प्रस्ताव आहे. **ग्रंथगर्भिचें**–भगवद्गीतांर्गत. **उपलाविलें**–सविस्तर सांगितलेलें. **जीवें**–मन लावून अवधानपूर्वक. **आकर्णिजो**–ऐकावें.

( **श्लोक १** )– " ज्याचें मूळ वर, व शाखा अनेक खालीं आहेत, जो कधींही नाश पावणारा नाहीं व वेद हीं ज्याचीं पानें, असें ज्या अश्वत्थ वृक्षाचें वर्णन करतात, तो वृक्ष ज्यानें जाणला, त्यानें सर्व जाणलं." असें श्री-

भगवान् म्हणाले. **ओ. ४५** – यांत भगवंतांचेंच वर्णन केलें आहे. **महानंद-समुद्रु**-ब्रह्मसाक्षात्काराचा, परब्रह्मांत ऐक्य पावण्याचा, जो महानंदरूपी समुद्र त्याला भरती आणणारा, पूर्णिमेचा सोळा कलायुक्त चंद्र असा जो श्रीकृष्ण. पूर्णिमेला समुद्राला भरती येते. पूर्णचंद्र जसा समुद्राला भरती आणतो, तसाच हा श्रीकृष्ण ब्रह्मसाक्षात्काराच्या समुद्राला भरती आणतो, भक्तांना ब्रह्मानंद लुटायला-लावतो, ब्रह्मानंदांत डुंबायला लावतो, ब्रह्मानंदाचा यथेच्छ अनुभव देतो. **द्वारकेचा इं०**-द्वारकेचा राजा. **ओ. ४६**-येथून ६२ ओवीपर्यंत याच अश्वत्थ वृक्षाच्या अलौकिकत्वाचें वर्णन केलें आहे. "अगा पांडुकुमारा अर्जुना! जीव जेव्हां आपल्या स्वरूपरूपी घराला यावयास निघतो, त्यावेळीं भासमान होणारें हे जग त्याला आडकाठी करतें. जीव म्हणजे मानव शरीरांतील आत्मा ज्यावेळीं परमात्म्याशीं ऐक्य पावण्यास जातो, म्हणजे साधकाला ज्यावेळीं आत्मापरमात्मैक्याचें ज्ञान होऊं लागतें, त्यावेळीं हें जग खरें आहे असा भ्रम, त्या ज्ञानाच्या आड येतो. आपल्या भोंवतींचें हें जग खरेंच आहे असें आपणास वाटतें व त्या भ्रमामुळें आपण 'आत्मा हाच परमात्मा आहे' या ज्ञानाला दुरावतो. वास्तविक ब्रह्म हेंच एक खरें आहे, जग खोटें आहे व जीव (आत्मा) हेंच ब्रम्ह ( परमात्मा ) आहे. हें ज्ञान होय. पण या ज्ञानाला, भासमान होणारें हें जग आडवें येतें. **पांडुकुंवरा**-'कुंवरा' हें 'कुमरा' याचें अपभ्रष्ट रूप आहे. **स्वरूपाचया**-स्वरूपाच्या, आपल्या मूळच्या स्वरूपाच्या. **घरा** – परमात्मा किंवा परब्रह्म हें मूळ आत्म्याचें घर होय. प्रत्येकाचा आत्मा या परमात्म्याचेंच प्रतिबिंब होय. आत्मा पुनः परमात्म्याकडे परत जाणें, म्हणजेच खरें ज्ञान होऊन मोक्ष मिळणें होय. **आडावारा करी** – परब्रम्हाचे बाजूचा वारा आडवितो, प्रतिबंध करतो. **विश्वाभासु** - जग खरें आहे हा भ्रम. **ओ. ४७**-" तो विश्वाभास म्हणजे हें आवाढव्य जग किंवा संसार नसून, तो एक स्थिरावलेला महावृक्ष असें समज." **जगडंबर** – विश्वविस्तार. **थांवला** - स्थिरावलेला. विश्वाभासाला येथे स्थिरावलेला, दृढमूल झालेला महावृक्ष म्हटलेलें आहे, हें लक्षांत ठेविलें पाहिजे. **ओ ४८** – पण हा महावृक्ष इतर झाडांसारखा खालीं मूळें व वर फांद्या असा नाहीं, म्हणून तो कोणाला ओळखूं येत नाहीं. हा विश्वाभासरूपी महावृक्ष, इतर नेहमीच्या झाडांन्या अंगदीं उलट आहे. याचें मूळ वर व

शाखा खालीं, असा उलटा प्रकार असल्यामुळें,' तो एक वृक्ष आहे असें कोणाला ओळखूं येत नाहीं. **लेखा** - गणति. पहा - " ऋषीश्रृंगासारिखा । क्रिडी - कुरंगु केला देखा । यां स्त्रियांसि न ये लेखा । ऐसा कवणु असे ? " ॥ उद्धवगीता- ४६५. **नेए**-न ये, येत नाहीं. **ओ. ४९**-या व पुढील ओवींत इतर झाडांची स्थिति प्रथम सांगतात, व तसा हा महावृक्ष नव्हे, असें वर्णन करतात. " इतर वृक्षांची गोष्टी अशी आहे कीं, त्यांच्या वरच्या शाखांचा विस्तार केवढा जरी मोठा असला, तरी मुळाला जर आग किंवा कुऱ्हाड लावली, तर तीं झाडें उन्मळून पडतात. **आगी कां कुऱ्हाडी**-(षष्ठीसारखा उपयोग) आगीचा किंवा कुऱ्हाडीचा. **रिगावा**-शिरकाव. इतर झाडांच्या बुडाशीं आगीचा किंवा कुऱ्हाडीचा शिरकाव झाल्यास, त्या झाडांचीं मुळें जाळलीं किंवा तोडली तर. **भले तेव्हडी**—वाटेल तेवढी. **वरिचिली वाढि**- वरचा शाखाविस्तार. त्या झाडांचा वरचा शाखाविस्तार वाटेल तेवढा जरी अवाढव्य असला, तरी त्या झाडांची मुळें जाळल्यास अथवा तोडल्यास, तीं उलथून पडतात. **ओ. ५०**- इतर झाडें मुळाजवळ तुटल्यानंतर वरच्या फांद्यासह उलथून पडतात. **तरि तैसी इ०**—तर तशी गोष्ट, तशी स्थिति, या महावृक्षाची कशी असेल ? कारण हा वृक्ष इतरासारखा सोपा नाहीं. हा वृक्ष तोडणें सोपें नाहीं. **उलंडैल- शाखांसि**--शाखासहित उलथतो, उलथून पडतो. **उलंडणें**-उलथणें. **ओ. ५१**- अर्जुना ! आश्चर्याची गोष्ट सांगायची, तर हा संसाररूपी वृक्ष अलौकिक असा कीं, याची वाढ खालच्या बाजूस आहे. इतर वृक्षांची वाढ वर असते याची खालीं. कारण याचें मूळच वर आहे. **ओ. ५२**-ज्याप्रमाणे सूर्य किती उंचीवर आहे हें समजलें नाहीं, तरी त्याची किरणें खालीं पृथ्वीतलावर पसरतातच. त्याप्रमाणेंच हें संसाररूपी विचित्र झाड बांडगुळासारखें आहे. याचें मूळ जरी वर कोठे, किती उंच आहे हें समजत नाहीं, तरी याच्या फांद्या खालीं सूर्याच्या किरणाप्रमाणें पसरलेल्या आहेत. **रश्मिजाल** - किरणसमूह. **कांवरुखें**—झाडावरचें बांडगूळ. पहा—" सदा सफळ आंब्याचा रूख । त्यावरी उपजे कांवरुख । '- एकनाथी भागवत २३।२३. बांडगूळ आश्चर्यकारक असलें तरी तें क्षणभंगुर असतें. तसाच संसार क्षणभंगुर आहे असा भाव. **ओ. ५३**—आणि जगांतलं असतं नसतं सगळं या एका वृक्षानंच व्यापून टाकलं आहे. पृथ्वीप्रलयाच्या

वेळच्या पाण्यानें ज्याप्रमाणें सर्व आकाश व्यापलें जातें, त्याप्रमाणें या एकट्या वृक्षानें असत्या नसत्या सर्व वस्तू व्यापून टाकल्या आहेत. संसारानें सर्व वस्तूंना घेरलेलें आपण पाहतोंच. **रुंधलें**—व्यापलें. **ओ. ५४**—ज्याप्रमाणें सूर्य अस्ताला गेल्यावर, रात्र अंधारानें भरून जाते, त्याप्रमाणें हा संसाररूपी वृक्ष गगनांत पसरलेला आहे. **मांडला**—पसरलेला. संसाराच्या व्यापकपणाला अंधाराच्या गडदपणाची भीषण उपमा ज्ञानेश्वरांनीं मोठ्या सार्थतेनें दिली असून, त्यायोगें संसाराबद्दल अरुचि निर्माण केली आहे. **ओ. ५५**—चांखावें म्हटलें तर याला फल नाहीं, व हुंगावें म्हणावें तर फूलही नाहीं. या वृक्षाचं जर कांहीं असेल तर हा एकटा वृक्षच. दुसरं तिसरं कांहीं नाहीं. **तुरुंबितां**—वास घेण्यास, हुंगण्यास. हा संसार मुळीं आभासात्मक असल्यामुळें, त्याला फळें फुलें नाहींत हें म्हणणें युक्तच आहे. ज्याला मुळीं अस्तित्वच नाहीं, त्या संसाररूपी वृक्षाला फल तरी कुठलें किंवा फूल तरी कुठलें ? **ओ. ५६**—या वृक्षाचीं मुळें वर आहेत. म्हणून कांहीं हा उलथून टाकलेला, उपटून टाकलेला नव्हे. आणि म्हणूनच हा नित्य हिरवागार आहे. हा उपटून टाकलेला नाहीं, म्हणूनच नेहमीं हिरवागार राहिलेला आहे. **शाड्वल**—लसलसित, हिरवागार. **ओ. ५७**— आणि याला वर मुळें आहेत असे जरी म्हटलें, तरी खालीं देखलि याला वाटेल तेवढीं मुळें आहेत. **असोसें**—पुष्कळ, फार. म्हणजे हा वृक्ष जसा ऊर्ध्वमूल आहे, तसा तो अधोमूलही आहे. **कीरू**—निश्चितपणानें. **अधि**-खालीं. **ओ. ५८**—आणि इतर वनस्पतींना मारून टाकणाऱ्या गवताप्रमाणें हा सैराट वाढणारा असून, पिंपळ व वड यांच्या पारंब्या जमीनीला पोंचून त्यांना पुनः जशा डाहाळ्या फुटतात, तशाच यालाही फुटलेल्या आहेत. **बल्बेचेन**—सैराट उगवणाऱ्या गवताप्रमाणें ( राजवाडे ). **महामारी**—झपाट्यानें वाढणारा. घायमारीचें फडें असेंच झपाट्यानें वाढतें. **ओ. ५९**—त्याप्रमाणें हे अर्जुना ! या संसाररूपी वृक्षाला खालींच खांद्या आहे असें म्हणावें, तर तसाही प्रकार नाहीं **हेंई नाहीं**—तसेंही नाहीं. **ओ. ६०**—तर याला वर देखील खांद्याचे मोठे समुदाय असून, ते चांगलेच विस्तार पावले आहेत. **मांदोड**—समुदाय. **ओ. ६१**—या वृक्षाच्या पालवीचें किंवा वेलांचेच सर्व आकाश झालें आहे जणु. किंवा या वृक्षाच्या आकारानेंच जणु वारा सर्वत्र वाहत आहे. फार काय (उत्पत्ति

स्थिति व लय या ) तीन अवस्थांना आश्रय देण्यासाठींच जणु हा वृक्ष निर्माण झाला आहे. तात्पर्य या संसाररूपी वृक्षाचा विस्तार गगनाएवढा व्यापक असून, त्याचा आकार वाऱ्याप्रमाणे सर्वगामी आहे. उत्पति, स्थिति व लय या अवस्थांना या वृक्षाचाच आश्रय मिळाला आहे. संसार नसता तर या तीन अवस्थांचे नांव घेण्याचेंच कारण नव्हतें. हा संसार या तीन अवस्थांनीं युक्त आहे असा भाव. जगांतील प्रत्येक वस्तूला उत्पत्ति, स्थिति व लय या तीन अवस्थांतून जावेंच लागतें. म्हणूनच संसाराला या तीन अवस्थांचें आश्रयस्थान म्हटलें आहे. **ओ. ६२**--असा हा विश्वाकाररूपी, वर मुळें असलेला एकच वृक्ष उत्पन्न झाला आहे. **विटकुं**-वृक्ष. **ओ. ६३**—आतां या झाडाच्या वर कोण आहे, त्याचें वर असलेलें मूळ कशा प्रकारचें आहे, व याचा खालीं येणारा फांद्यांचा विस्तार कसा आहे ? **ओ ६४**-अथवा या वृक्षाच्या खाली ज्या मुळ्या आहेत, त्यापासून वर फुटलेल्या खांद्या कोणत्या व कशा उत्पन्न होतात. **ओ. ६५**-आणि या वृक्षाला ' अश्वत्थ ' असें नांव कशावरून पडलें, व आत्मज्ञान्यांनीं याचा काय निर्णय केला आहे ? **ओ. ६६**-या सर्व गोष्टीं तुझ्या अनुभवास येतील अशा उत्तम रितीनें स्पष्ट करून सांगतो, असें श्रीकृष्ण अर्जुनास म्हणतात. **फावे**-येईल, लाभेल. **सोलींवे विन्यासें**-स्वच्छ प्रतिपादनानें. **ओ. ६७**-तर हे भाग्यवंता ! हें निरूपण ऐकण्यास तूंच योग्य आहेस. म्हणून सर्व इंद्रियांचें कान करून अंतःकरणपूर्वक तूं हें ऐक. **कान चि इ०**-तुला माझें निरूपण ऐकायचें आहे, तर दोन कानांनीं भागणार नाहीं. म्हणून तुझ्या सर्व दशेंद्रियांचेंच कान कर. इतक्या आस्थेनें तूं ऐक **हियें आथिलेया**-हृदयानें संपन्न होऊन, मनःपूर्वक. **ओ. ६८**-यादवांचा राजा श्रीकृष्ण याप्रमाणें प्रेमरसपरिप्लुत भाषण करतां क्षणींच, अर्जुनाचें अवधान (लक्ष्य) त्याच्यारूपानें मूर्तिमंत उभे राहिलें. अर्जुन जणु अवधानाचा पुतळाच होता. अर्जुनानें श्रीकृष्णाचें विवेचन एकाग्रचित्तानें ऐकण्यास प्रारंभ केला. **सुरफुरें**-भरपूर **ओ ६९**-येथून तीन ओव्यांत अर्जुनाच्या उत्कट अवधानावर सुंदर उत्प्रेक्षा केल्या आहेत. ज्याप्रमाणें आकाशानें आलिंगन देण्यासाठीं बाहू पसरले असतां, दशदिशा देखील कमीच पडतात, तद्वतच अर्जुनाचें श्रोतेपण इतकें वाढलें कीं, श्रीकृष्णांचें निरूपण त्याला ऐकतांना कमीच पडलें. अर्जुनाची उत्कंठा एवढी वाढली कीं, त्यांची उत्कंठा

परिपूर्ण करतांना, श्रीकृष्णांना आपल्याजवळील निरूपण कमीच भासलें. अर्जुनाची तें निरूपण ऐकण्याची उत्कटता केवढी जबर होती, तें येथें ध्वनित केलें आहे. **खेंव**—क्षेम, आलिंगन. आकाशानें दहादिशांना जो आलिंगन द्यावयास जावें, तों आकाशाला त्या कमीच भासाव्या, तसा अर्जुनाच्या ऐकण्याच्या प्रबल उत्कंठेच्या मानानें श्रीकृष्णाचें निरुपणच कमी भासलें. **थेकुलें**-कमी, अल्प **ओ. ७०**—किंवा श्रीकृष्णाच्या भाषणरूपी समुद्राला अर्जुनाचें श्रोतेपण म्हणजे दुसरा अगस्तिऋषिच जणुं. मूळच्या अगस्तिऋषीनें समुद्र जसा एका आचमनांत पिऊन टाकला, तद्वत् अर्जुनाच्या श्रोतेपणानें श्रीकृष्णाचें निरूपण केव्हांच ग्रहण करून टाकलें. अर्जुनानें श्रीकृष्णाच्या सर्व निरूपणाचा एकच घोंट केला. एका घोटांत त्यानें तें निरूपण पिऊन टाकलें, इतकी त्याची निरूपणाबद्दलची आतुरता, येथें या अगस्तीच्या पौराणिक दृष्टांतानें सूचित केली आहे. **घोंटु भरूं पाहे**—एका घोटांत पिण्याचा उपक्रम केला. **एकसरा**—एकदम. **ओ. ७१**--आपलें प्रवचन ऐकण्याची अर्जुनाच्या ठिकाणीं अशी अमर्याद इच्छा उत्पन्न झालेली पाहून श्रीकृष्णानें आपल्याला झालेलें समाधान त्याच्यावरून ओंवाळून टाकलें. **सोय संडौनि**—आधार सोडून, मर्यादा सोडून, अमर्याद. **खवळली**-खवळलेली, उत्तेजित झालेली ('आवडी' चें विशेषण). **जालन**-झालेल्या. **कुरौंडि**—कुरवंडी. अर्जुनानें आपल्या प्रवचनाबद्दल एवढी आस्था दाखवावी हें पाहून श्रीकृष्णाला समाधान वाटलें, व तें त्यानें अर्जुनावरून ओंवाळून टाकलें. श्रीकृष्णाला अर्जुनापुढें आपल्या सुखाची किंमत वाटली नाहीं. त्यांनीं प्रवचनास प्रारंभ करून आपलें सुख एकीकडे सारलें.

**ओ. ७२**—या व पुढील ओंवींत 'ऊर्ध्व' या पदाचा अर्थ सांगितला आहे. मग श्रीकृष्ण अर्जुनास म्हणाले. "धनंजया ! या झाडाच्या वर जें (ब्रह्म) आहे, त्याला या झाडामुळेंच, या झाडाच्या अनुषंगानेंच ऊर्ध्वत्व प्राप्त झालें आहे. हें झाड आहे म्हणून याच्या वर तें ब्रह्म आहे असें म्हणावयाचें. **ओ. ७३**-नाहींतर हें ब्रह्म असें आहे कीं जेथें मध्ये व खालीं असा भेद मुळींच नसून, ज्याच्या ठिकाणीं अद्वैताबरोबर ऐक्यही आहे. **एकवद**--ऐक्य. ब्रह्म एकच असल्यानें तेथें वर, खाली, मध्ये ही भाषाच अशक्य होते. ब्रह्म जसें एकच आहे, तद्वत् सर्व वस्तु त्याला येऊन मिळणाऱ्या असल्यानें त्याच्या ठिकाणीं ऐक्यही

आहे. **ओ. ७४-७७** या चार ओव्यांत ब्रह्माच्या स्वरूपाचें वर्णन केलें आहे. "
" ब्रह्म हें नादमय आहे. पण तो नाद ऐकतां येण्यासारखा नाहीं. तें मकरंदयुक्त आहे, पण तो मकरंद सुगंधरहित अतएव हुंगतां येण्यासारखा नाहीं. तें आनंदमय आहे. पण तो आनंद स्त्रीपुरुषसंबंधासारखा स्पर्शसुखावर अवलंबून नाहीं. तात्पर्य ब्रह्माचा अनुभव श्रोत्र, घ्राण, स्पर्श इत्यादि इंद्रियांच्या आवाक्या बाहेरचा आहे. **सुरत**—स्त्रीपुरुषसंबंध. हा आत्यंतिक आनंदाचा द्योतक आहे. ब्रह्माचा आनंद असाच आहे. पण स्त्रीपुरुषसंबधाप्रमाणें तो स्पर्शेंद्रियावर अवलंबून नाहीं. "
तात्पर्य ब्रह्माचें स्वरुप नादमय, ज्ञानमकरंदात्मक व आनंदमय आहे. **ओ. ७५**—ज्याला अलीकडे ( अऱ्हा ) असें कांहीं नाहीं, व पलीकडचें ( परौतें ) ही नाहीं. ज्याला पुढे कांहीं नाहीं व मागेंही कांहीं नाहीं. डोळ्यांनीं न पाहतांच जें दिसतें, पण चर्मचक्षूंना जें अदृश्य आहे. परब्रह्म हें बाह्येंद्रियगोचर नसून प्रतीतीनेंच केवळ जाणतां येण्यासारखें आहे.

**ओ. ७६** ज्या परब्रह्माला मायारूप दुसऱ्या उपाधीच्या उजळा घातला तरच, हा नामरूपात्मक संसार दिसूं लागतो ना? या ओंवीचा असा प्रश्नार्थक अर्थ केला तरच सरळ अर्थ लागेल. परब्रह्मावर मायेचें आवरण बसलें कीं, मगच हें नाना रूपांचें व नांवांचें जग निर्माण होतें, एरव्ही नाहीं. जग ही माया आहे, आभास आहे. अशा मायेनें परब्रम्हाला घेरलं कीं, संसार सुरू होतो. नाहीं तर ब्रह्म तसें एकच आहे. **उपास्त्रिरा**—उजळा, झकाकी. **ओ. ७७**-जें परब्रह्म ज्ञाता, ज्ञेय यांच्या विरहित असून, नुसतें ज्ञानच आहे, व जें सुखानें भरलेलें एकजिनसी गगनच आहे. ज्ञाता ज्ञेय व ज्ञान या अभिमान त्रिपुटीपैकीं परब्रह्माच्या ठिकाणीं ज्ञाता व ज्ञेय या दोन वस्तूंचा संभव नाहीं, ते केवळ ज्ञानच आहे. तेथे जाणणारा व जाणण्याला शक्य असें कांहीं नाहीं. ' सर्व ज्ञानमनन्तं ब्रह्म ' अशीच त्याची स्थिति आहे. शिवाय तें आकाशा प्रमाणें सर्वत्र सुखानें भरलेलें आहे. ' सत चित् व आनंद ' असें त्यानें स्वरूप वर्णिले असल्यानें, तें सुखमय अथवा आनंदमय आहे. **गांलिवं**—शुद्ध. यानंतरची ७८ म्हणून माडगांवकर व साखरेप्रतींत दिलेली ओंवी, वरच्याय अर्थाचा अनुवाद असल्यानं, ती नंतर कोणीतरी प्रक्षिप्त केली असावी असें दिसतें. **ओ. ७८**-याप्रमाणें जे शुद्ध परब्रह्म, तें या संसारवृक्षाचें वरचें मूळ होय. आतां या मुळाच्या

ठिकाणीं जे अंकुर फुटतात, ते खालीं दिल्याप्रमाणें आहेत. **आर घेंण**-अंकुर फुटणें. झाडाला जसे मुळांतून खाली जमिनींत बीजाचे अंकुर फुटतात, तसे या संसारवृक्षाचें मूळ जें ब्रह्म, तेथे त्याला अंकुर फुटतात. **ओ. ७९**-येथून पांच ओव्यांत मायेचे वर्णन केले आहे. कारण हा संसार मायरूप आहे हें वर सांगितलेंच आहे. तर माया म्हणून जिला म्हणतात, जी नसूनही असल्या-सारखी आहे, एकाद्या वांझेला संतति आहे असें म्हणणें जितकें युक्त तितकेंच हिचें अस्तित्वही मानणें युक्त होईल. माया किंवा संसार हा वांझ स्त्रीच्या संतति-प्रमाणें अभावात्मक आहे. वांझेला संतति आहे असें मानणें जसें शक्य नाहीं, वाटेल तर खोटेंपणाने तसें म्हणावें, त्याप्रमाणें मायेलाही खरे अस्तित्व नाहीं, जें दिसते तें तिचें आभासात्मक अस्तित्व आहे **ओ. ८०**—याप्रमाणें जी आहे म्हणतां येत नाहीं, व जी नाहींही म्हणतां येत नाहीं व विवेकापुढें, विचारांपुढें जिचा टिकाव लागत नाहीं. अशी ती असून तिला अनादि म्हणतात. मायेला खरें अस्तित्व नसल्यामुळें, ती केवळ आभासात्मक असल्यामुळें, तिला ' संत ' म्हणतां येत नाहीं, व ती इंद्रियाला गोचर आहे, सर्व इंद्रियांना अनुभवास येते त्या अर्थी तिला ' असंत '=नाहीं, असेही म्हणतां येत नाहीं. कारण मायारूपानें सर्व जग आपण पाहतच आहों. पण ' ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या ' या विचारानें तिच्याकडे पाहिल्यास ती टिकत नाहीं. म्हणून तिला ज्ञानाचा वारा देखील सहन होत नाहीं असें म्हटलें आहे. शिवाय ती अनादि आहे. कारण तिचा प्रारंभ केव्हां झाला तें कोणासच समजत नाहीं. **ओ. ८१**-जी संसाररूप वृक्षाची बी, प्रपंचाचा आधार असून विपरीत ज्ञानाची प्रतीति करून देणारी अशी पेटवलेली एक दिव-टीच आहे. मायेपासूनच संसार उत्पन्न होत असल्यामुळें, तिला संसारवृक्षाची बी असें म्हटलें आहे, व म्हणूनच ती प्रपंचाचा आधारही झाली आहे. माये-मुळें जग किंवा संसार खरा आहे असें विपरीत अन्यथा ज्ञान, प्रसृत होतें. म्हणून अशा खोट्या ज्ञानाचा प्रसार करणारी दिवटी असें तिला म्हटलें आहे. **सांचली**-प्रज्वलित झाली. **ओ. ८२**-" जी अनेक शक्तींची पेटी आहे, जी जगरूपीं भ्रमाचें केवळ आकाशच आहे, व जेवढ्या म्हणून वस्तु आहेत त्या वस्तुरूपीं वस्त्राची ही माया म्हणजे एक केलेली घडीच होय. ' मायेच्या ठिकाणीं विकार विचारांच्या अनेक शक्ती आहेत. म्हणून तिला अशा शारिरिक व मानासिक

शक्तींचा सांठा असणारी पेटीच म्हटलें आहे तसेंच आकाश जसें व्यापकपणानें सर्वत्र पसरले आहे, तसे मायेपासून उत्पन्न झालेला संसाराचा आभास सर्वत्र पसरला आहे म्हणून हीला जगद्भ्रमाचें आकाश अशी संज्ञा दिली आहे. जगांत जितक्या म्हणून स्थावरजंगमात्मक वस्तु आहेत, त्या मायेपासूनच निर्माण झाल्या आहेत. म्हणून अशा वस्तूंच्या वस्त्राची घडी असें तिला नामाभिधान दिलें आहे सर्व वस्तु मायेच्या पोटांतच आहेत. **मांदुस**–पेटी. **घेडी**–घडी. येथे 'जगदभ्राचें' असा माडगांवकर व साखरे यांचा पाठ आहे. **ओ. ८३**—अशी ही माया परब्रह्माच्या (वस्तूंचा) ठिकाणीं, असून नसल्या सारखीच आहे. आणि ती परब्रह्माची प्रभा म्हणूनच प्रकट होते. माया ही असून नसल्यासारखी आहे, याचा अर्थ असा कीं अज्ञानी माणसाला ती आहे असे वाटते तर ज्ञान्याला ती नाहीं हें ठाऊक असतें. मायेला स्वतंत्र असें अस्तित्व नाहीं. हिऱ्याच्या तेजालाही स्वतंत्र अस्तित्व नसतें. त्याप्रमाणे माया ही परब्रह्माच्या आश्रयानें राहते. **ओ. ८४**–ज्यावेळीं आपणाला झोंप आली असतां, ती जशी आपणास निश्चेष्ट करते, किंवा काजळी ज्याप्रमाणें दिव्याच्या तेजाला मंद करते, त्याप्रमाणें माया परब्रह्मावर तात्पुरतें आवरण घालते. माणसाची झोंप किंवा दिव्यावरची काजळी ही थोडावेळ अनुक्रमें माणसाची व दिव्यांची दीप्ति क्षीण करते, त्याप्रमाणें मायादेखील परब्रह्मावर तात्पुरती राहून त्याच्याकडून व्यापार करविते.

**ओ ८५**–या ओवींत मायेच्या आभासावर आणखी एक व्यावहारिक दृष्टांत देतात. "स्वप्नामध्यें एकादी तरुणी एकाद्या तरुणाला खोट्या आलिंगनानेंच आलिंगून सकाम करते व त्याला जागें करून जाते" त्याप्रमाणें माया खरोखर नसून असल्याप्रमाणें परब्रह्माकडून संसारांतले खेळ खेळविते. **चेवउनि**—जागें करून. **आलंगितेन विण**--खरें आलिंगन न देतांच त्या तरुणाला आलिंगनाचा भास ती स्वप्नांतली तरुणी जशी निर्माण करते, त्याप्रमाणें माया या संसाराच्या खेळाचा भास निर्माण करते. **ओ. ८६** – त्याप्रमाणें हे धनंजया, त्या परब्रह्माच्या खऱ्या स्वरुपावर मायेचे पांघरुण पडणे व मग परब्रह्माचें निर्गुण निराकार स्वरुप झाकलें जाणें अथवा तें स्वरूपच न जाणणें, हेंच या संसाररूपीं झाडाचें पहिलें मूळ होय. मायेनें झाकलेल्या परब्रह्माबद्दल जें अज्ञान, तेंच संसाराचें मूळ असा भाव. परब्रह्माच्या खऱ्या स्वरूपाचा विसर, हेंच संसार-

तरूचें पहिलें आर घेणें. ( मागें ओ. ७८ पहा ) **ओ. ८७** या संसारवृक्षाचें मूळ वर म्हणजे ब्रह्माच्या ठिकाणीं वाढतें. ते प्रथम अंब्याच्या कोईप्रमाणें कसें मऊ असतें व नंतर तें कसें कठिण होतें ते वेदांताच्या परिभाषेंत येथें सांगतात. " परब्रह्माला आपल्या मूळच्या निर्गुण निराकार स्वरूपाचा मायेमुळे जो विसर पडतो, तोच या वृक्षाचा वर घट्ट झालेला गड्डा होय. वेदांतशास्त्रांत यालाच ' बीजभाव ' असें म्हणतात. " **वस्तु**--परब्रह्म. **अबोध**—स्वरूपाचा विसर. **आटुलैजे** – घट्ट झालेला. परब्रह्मावर मायेचा अंमल सुरू झाला कीं, ब्रह्माला आपल्या स्वरुपाचा विसर पडतो व हा विसर म्हणजे संसाररूपीं वृक्षाचें बी होय. जोपर्यंत स्वरूपाचा विसर पडण्याइतपतच ब्रह्माची मजल गेलेली असते, तोपर्यंत हें संसाररूपी झाड, बीजाच्या, बियाच्या स्वरूपांत असतें. **ओ. ८८** – यापुढील बीजांकुरभाव व बीजफलभाव अशा पायऱ्या येथे सांगितल्या आहेत. " पूर्ण वाढलेलें, गाढ झोपेसारखें ब्रह्माचें आपल्या मूळ स्वरूपाबद्दलचें जे अज्ञान, त्याला संसारवृक्षाच्या वरील बीजाची मोड फुटण्याची स्थिति म्हणतात. " **घन अज्ञान सुषुप्ति** – गाढ झोपेसारखें जें अज्ञान. या अज्ञानामुळेंच त्या वृक्षाच्या बीजाला अंकुर फुटूं लागतात. **पर** इ.-याशिवाय अर्धवट झोप व अर्धवट जागृति अशी जी स्वप्नसारखी, परब्रह्माची आपल्या स्वरुपाबद्दलची स्थिति या मायेमुळें होते ती, व परब्रह्माची आपल्या स्वरूपाबद्दलची पूर्ण जागृति, पूर्ण बोध, या दोन अवस्था त्या संसारवृक्षाला फळें येण्याचा प्रकार होय. **स्वप्न** – अर्धी झोंप व अर्धी जाग अशी स्थिति साधक ज्यावेळीं मुमुक्षुदशेंत असतो, त्यावेळीं तो अर्ध्या अज्ञानांत व अर्ध्या ज्ञानाच्या अवस्थेंत असतो. अशा वेळीं त्याला परब्रह्माचें अर्धवट ज्ञान झालेलें असतें. अशा मुमुक्षावस्थेला येथें स्वप्नदशा म्हटलें आहे. **जागृति**—पूर्ण ज्ञान, परब्रह्माचें संपूर्ण ज्ञान. हीच ज्ञानी पुरुषाची अवस्था होय. या दोनी अवस्था या संसारवृक्षाची फळें होत. या ओवीचा थोडक्यांत सारांश असा दिसतो. परब्रह्माबद्दलचें अज्ञान हें या संसाराला कारण असून, हें अज्ञान जसजसें वाढेल तसतशी या वृक्षाची वाढ होते. पण जसजसा ज्ञानाचा उदय होऊं लागतो, तसतशें ब्रह्माचें खरें स्वरूप लक्षांत येतें, व हेंच या वृक्षाचें अंतिम फल आहे. **हान**—निश्चयार्थ दाखविणारें अव्यय.

**ओ. ८९** – याप्रमाणें वेदांतशास्त्रांत निरूपण करतांना योजिलेली परिभाषा पद्धति आहे. या संसारवृक्षाची उगम वृद्धि व फळें याचें विवरण करतांना, याप्रमाणें भाषापद्धति योजली आहे. पण तूर्त तें कांहींही असलं, तरी या वृक्षाला अज्ञान हेंच मूळ आहे, एवढेंच लक्षांत घ्यावयाचें. **ओ. ९०** – आतां ही संसार. वृक्षाचीं मूळें कशीं फुटतात तें सांगतात. " वर जो निमल, निरंजन आत्मा, (परब्रह्म) आहे, त्याच्या भोंवतीं मायेच्या विस्ताराचें बळकट आळें बांधल्यानतर, त्याला खालीं वर मुळें फुटून तीं पसरूं लागतात. " परब्रह्म हें या वृक्षाचें मूळ आहे. याला मायेचें आळें बांधलं कीं, मग या मुळाला (ब्रह्माला) खालीं वर सर्वत्र मुळं फुटूं लागतात. ब्रह्माला मायेनं घेरलं कीं, या संसाररूपीं वृक्षाचा उगम होऊं लागतो असा भाव. **आत्मा**–(सप्तमी) आत्माच्या ठिकाणीं **बलिया** – बळकट. **बांधौनि आलें**––आळें तयार केल्यानंतर. **मायायोगाचें** – मायेच्या पसाऱ्याचें. **सूचीती** निघतात. मायेच्या स्पर्शामुळें परब्रह्मांतून संसाराची ही उत्पत्ति होते. **ओ. ९१** – मग या वृक्षाचा खालच्या मुळाला जे अनेक प्रकारचे देह निघतात, त्यांचे चार प्रकारचे अंकुर खालीं रुजतात. परब्रह्माभोंवतीं मायेचें आळें पडले कीं, त्याला खालच्या बाजूला चार प्रकारच्या देहांचे अंकुर फुटतात. **चौंपासि**—चार बाजूस, चार प्रकारचे म्हणजे स्वेदज, अंडज, जारज व उद्भिज अशा देहांचे अंकुर फुटतात. म्हणजे मूळ परब्रम्हापासून चार प्रकारचे प्राणिमात्र निर्माण होतात. **अगारें**–अंकुर. **खालाविती** – खालीं जातात. **ओ. – ९२** याप्रमाणें या संसाररूपी झाडाचें मूळ वर बळकट होतें, व मग त्याला खालीं अनेक अंकुरांची जुंबाडें फुटतात. **बेंचळ** – जुंबाड. येथे ' बेंबल ' हा राजवाड्यांचा पाठ घेतला तर त्याचा समाधानकारक अर्थ लागत नाहीं. शिवाय ' बेंबळ '= विव्हल अशा अर्थी राजवाड्यांनीं अर्थ दिला आहे, तोही येथें लागू पडत नाहीं. **आणियांचें**= अग्रांचे, अंकुरांचें. या संसावृरक्षाचें वर असणारें मूळ मायेच्या आळ्यांत एकदा घट्ट झालें कीं, मग त्याला खालीं अंकुरांचे आणखी जुंबाड कसे फुटतात तेंच पुढील ओव्यांत सांगितलें आहे. **अधीं** – खालीं. **ओ. ९३** – तेथें ज्ञानमय महत्तत्वाचें पहिले कोमल पान निघतें. या संसारवृक्षाला जें पहिलें पान येतें तें ' महत् ' या तत्त्वाचें येतें **महातत्त्व** – महत् तत्त्व हें सांख्यांच्या २४

तत्त्वांपैकीं पहिलें तत्त्व आहे. यालाच ज्ञान, मति, आसुरी, प्रज्ञा, ख्याति, अशीं दुसरीं नांवें आहेत. वेदांत्यांची माया किंवा सांख्यांची प्रकृति मोठी होऊं लागली, तिला गुणांमुळें श्रेष्ठता आली कीं, तिला ' महत् ' हें नांव दिलें जातें. मायेंत किंवा प्रकृतींत उत्पन्न होणार महान् किंवा बुद्धि हा गुण, सत्व, रज, तम या तिघांच्या मिश्रणाचाच परिणाम असल्यामुळें, मायेची किंवा प्रकृतीची ही बुद्धि दिसण्यांत एक दिसली, तरी पुढें तीं अनेक प्रकारचीं होऊं शकते. **चिद्वृत्ति**-ज्ञानमय. 'महत या तत्त्वाला ज्ञान किंवा बुद्धि असेंही म्हटलें आहे. यांचें स्वरूप ज्ञानमय आहे. परब्रह्माभोंवतीं माया पसरली कीं, त्याला अनेक अंकुर फुटून बुद्धीचें पहिलें पान येतें. अशी व्यवसायात्मक बुद्धि उत्पन्न होतांच सृष्टींतील भिन्न भिन्न पदार्थ गोचर होऊं लागतात. मागील ओवींत ' ब्रम्हाला मायेचे आळें ' अशी वेदात शास्त्राची परिभाषा ज्ञानेश्वरांनीं योजली, तर येथून ते संसारवृक्षाच्या किंवा विश्वाच्या उभारणीची सांख्यांची परिभाषा वापरीत आहेत. वेदांत्यांची माया व सांख्यांची प्रकृति ही एकच आहे. म्हणूनच या दोनी शास्त्रांच्या परिभाषा येथें एकत्र केल्या आहेत. या ओवींत परब्रम्ह व माया यांच्या संयोगानंतर किंवा प्रकृतिपुरुषांच्या संयोगानंतर जगदुत्पत्ति होतांना प्रथम ' महत् '= व्यवसायात्मक बुद्धि कशी उत्पन्न होते, तें स्पष्ट केलें आहे. **पान**—संसार-तरूचें पहिलें पान. येथे ' मान ' असा राजवाड्यांचा पाठ आहे. पण वृक्षाच्या रूपकाला धरून येथे ' पान ' हाच पाठ योग्य दिसतो. **वाल्हेदुर्ले**-अपूर्व. **निगे**-फुटतें. **ओ. ९४**-" मग यापुढें सत्व रज व तम असा त्रिगुणात्मक अहंकार नांवाचा तीन पानी एक अंकुर फुटतो. " वरच्या ओवींतील महत किंवा व्यवसायात्मक बुद्धि उत्पन्न झाल्यानंतर आतां त्रिगुणात्मक अहंकार उत्पन्न झाल्याचें येथें वर्णन केलें आहे. अव्यक्त प्रकृतीमध्यें अशारितीनें व्यवसायात्मक बुद्धि उत्पन्न झाली तरी प्रकृति अद्याप एक जिनसीच असते. हा तिचा एकजिनसीपणा मोडणें म्हणजेच तिला ' पृथक्त्व ' येणें होय. बुद्धीनंतर प्रकृतीला असा पृथक्पणा आल्याशिवाय प्रकृतीचे अनेक पदार्थ होत नाहींत. बुद्धीपासून पुढें उत्पन्न होणाऱ्या पृथक्पणाच्या या गुणालाच अहंकार अशी संज्ञा आहे. या अहंकारापासून मी मीपणा पासूनच भिन्न भिन्न पदार्थांची प्रतीति होते. बुद्धीशिवाय अहंकार निर्माण होत नाहीं. म्हणून अहंकार हा बुद्धीच्या मागून

होणारा दुसरा गुण असें सांख्यांचें मत आहे. बुद्धि जशी सात्विक, राजस, व तामस अशी त्रिगुणात्मक असते, तसा अहंकार देखील त्रिगुणात्मक असतो. म्हणुनच त्याला ज्ञानेश्वरानीं तिवना म्हटलें आहे. **तिवना**-तीन पानी. **डिरु**—अंकुर. **ओ. ९५**—या ओवींत त्याच अहंकाराची हालचाल वर्णिली आहे. तोच अहंकार बुद्धीचा ( महत् ) अंकुर घेऊन, तिच्या अंकुराच्या आश्रयानें पृथक्त्व निर्माण करतो, व पुढें मनरूपीं सुंदर डहाळी धरतो. महत् ( बुद्धि ) व अहंकार यांच्यानंतर मनाची उत्पत्ति येथे दिली आहे. अहंकार आपल्या शक्तीनें ज्यावेळीं भिन्न भिन्न पदार्थ निर्माण करूं लागतो, त्यावेळीं एका बाजूस सत्वगुणाचा उत्कर्ष होऊन पांच ज्ञानेंद्रियें, पांच कर्मेंद्रिये व मन मिळून ११ इंद्रियें व दुसऱ्या बाजूस तमोगुणाचा उत्कर्ष होऊन त्यापासून शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध अशीं पांच तन्मात्रें ( द्रव्यें ) निर्माण होतात. अशी हीं अहंकारापासून सांख्यांचीं १६ तत्त्वें निघालीं आहेत. **आगारी**—अंकुर, शेंडा, डिरी. बुद्धीचा ( महत् ) चा अंकुर धरून अहंकार, भेदांना अस्तित्वांत आणतो. बुद्धीच्या ठिकाणीं पृथक्त्व निर्माण करतो. **डाल धरणें**—डहाळी धरणें. **साजेपणा**—सुंदर रितीनें. ओ. ९३-९५ यांत मूल माया किंवा प्रकृति यापासून महत्, अहंकार व मन हीं कशीं निघतात, तेंच वर्णिलें आहे. **ओ. ९६**—या संसारवृक्षाला आणखी कोणत्या डाहाळ्या फुटतात, तें सांगतात. " अशा रितीनें मूळ घट्ट झालें म्हणजे, विकल्परूपी रसाच्या योगानें, त्याला चित्तचतुष्टय या चार कोंवळ्या डाहाळ्या फुटतात. " **गाढिका**—दृढता ( तृ. )-दृढतेनें. **विकल्परस** इ.-पांच ज्ञानेंद्रियें, पांच कर्मेंद्रियें व मन या अकरा पैकीं, मन, ज्ञानद्रियाचें ठायीं संकल्पविकल्पात्मक म्हणजे ज्ञानेंद्रियांनीं ग्रहण केलेल्या संस्कारांची जुळवाजुळव करून बुद्धीपुढें निर्णयार्थ मांडतें, व कर्मेंद्रियांच्या ठायीं व्याकरणात्मक म्हणजे बुद्धीच्या निर्णयाची कर्मेंद्रियांकडून अंमल बजावणी करतें. मनाच्या या उभयविध व्यापाराला संकल्प विकल्प म्हणतात. व असा व्यापार करणाऱ्या मनाला ' चित्त ' अशी परिभाषिक संज्ञा आहे. मुळांत घट्ट झालेल्या या संसाररूपी वृक्षाला या संकल्प विकल्पाचें पाणी मिळालें कीं, मग त्याला बुद्धि, अहंकार, मन व चित्त अशा चार प्रकारच्या चित्ताच्या डाहाळ्या फुटतात. बुद्धि, अहंकार, मन व चित्त यांना सांख्यांच्या परिभाषेंत

ाचित्तचतुष्टय म्हटलें आहे. या चित्तचतुष्टयरूपी डाहाळ्यांनीं हा संसारवृक्ष अंकु-रित होतो. **कोंभेजणें**– अंकुरित होणें. मूळ प्रकृतीला बुद्धि, अहंकार, मन व चित्त असे फाटे कसे फुटतात, ते येथे दाखविले आहेत. **ओ. ९७**–"मग आकाश, वायु, तेज, पाणी व पृथ्वी असे पंचमहाभूतांचे पांच फोक (डाहाळ्या.) सरळ वेगानें निघतात." **फोंक**–लहान डाहाळ्या. **सारोक**–चांगल्या (क्रि. वि.). लो. टिळकांनीं आपल्या गीतारहस्याच्या ८० या प्रकरणांत, "सेंद्रिय सृष्टींतील मूलभूत अकरा इंद्रियशक्ति किंवा गुण आणि निरिंद्रिय सृष्टींचीं मूलभूत पांच तन्मात्र द्रव्यें मिळून अनुक्रमें सात्विक व तामस अहंकारापासून याप्रमाणें निर्माण झाल्या-वर, पुढें त्यापैकीं पचतन्मात्र द्रव्यांपासून क्रमाक्रमानें स्थूल पंचमहाभूतें ( यास-विशेष असें हि नांव आहे ) व स्थूल निरिंद्रिय पदार्थ निर्माण होऊं लागतात, आणि या पदार्थांचा यथासंभव अकरा सूक्ष्म इंद्रियांशीं संयोग होउन सेंद्रिय सृष्टि बनते," असा सांख्यांचा विश्वाच्या उभारणीचा क्रम दिला आहे. मागील ३ ओव्यांत, महत्, अहंकार व मन यांची उत्पत्ति सांगितल्यावर, या ओंवींत वास्तविक पंचमहाभूतांची उत्पत्तिच दिली आहे. पण संसारावर हें वृक्षाचें रूपक प्रथमपासूनच करण्याचें धोरण असल्यानें, या पांच महाभूतांना त्याच्या पांच डाहाळ्या म्हटलें आहे. **सरले होंति** – जोरानें निघतात. **ओ. ९८**–"त्याचप्रमाणें या डाहाळ्यांच्या अंगाबरोबरच श्रोत्रादि पांच इंद्रियें व त्या इंद्रियांची पांच तन्मात्रें, ( त्यांचे विषय ) यांचीं गाभ्यांतून निघणारी कोमल आणि विचित्र पानें ( पालवी ) फुटतात." येथे कान, त्वचा, डोळे, जीभ व नाक अशी पांच ज्ञानेंद्रियें, व त्यांचे शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध, हे विषय कसे उत्पन्न होतात, तो क्रम दिला आहे. **आंगवसा**–सालींतून. **गर्भपत्रें**–आंतून निघणारी पालवी. **लुललुलितें**–कोमल. येथें सृष्टींतील पदार्थांच्या वर्गीकरणाचें सांख्यांचें तत्त्व मांडलें. त्यांच्या मते सृष्टींतिल सर्व पदार्थांचें ज्ञान मनुष्याला पांच ज्ञानेंद्रियांनीं होतें, व या ज्ञानेंद्रियांची रचना अशी कीं, एका इंद्रियाला एकच गुण कळतो. कानाला शब्द, त्वचेला स्पर्श, डोळ्यांना रूप, जिभेला रस व नाकाला गंध अशी योजना झाली असल्यानें, सृष्टींतील सर्व गुण या पांचां-पेक्षां अधिक मानतां येत नाहींत. **ओ. ९९**— या पुढील पांच ओव्यांत हीं ज्ञानेंद्रियें आपला विषय ग्रहण करतांना त्यांतून अनेक मनोव्यापारांचें आणखी

फाटे कसे फुटतात तें थोड्या विस्तारानें, पण वृक्षाच्या वाढीच्या परिभाषेंतच देतात. "तेथें शब्दांकुराच्या प्राप्तीसाठीं, कर्णेंद्रियाची वाढ मोठी झाली असतां, त्या कर्णेंद्रियाला आकांक्षेची कांडी फुटतात." तात्पर्य शब्द ऐकण्याबद्दल कान अत्यंत आतुर होतात व अशा शब्दाच्या आतुरतेतूनच त्या व्यक्तीबद्दल वासना निर्माण होते. **वरिपडी**-प्राप्तीसाठीं. **श्रोत्रा वाढि दटहाडि**-कानांची मोठी वाढ होते. कान लोलुप होतात, व मग त्याला आकांक्षांची कांडीं फुटतात. **कांडीं करणें**-वाढ करणें. उसाला जशी कांडीं फुटून त्याचीं वाढ होते, तशी आशांची, वासनांची वाढ होते. कानानें ज्याचा शब्द ऐकण्यांत येतो, त्या व्यक्तीबद्दल भिन्न भिन्न वासना, आसक्ती निर्माण होतात. **ओ. १००**—" आंगत्वचेच्या वेल पालवींतून स्पर्शांकुर जोरानें बाहेर पडतात. मग नवनवीन विकारांची गर्दी उडून जाते." स्पर्शेंद्रिय आपल्या विषयाकडे कसें आकर्षिलें जातें, तें येथें सांगितलें आहे. प्राणिमात्राच्या अंगाच्या त्वचेला ज्याचा स्पर्श होईल, त्याला अनुसरून अनेक सात्विक किंवा तामस विकारांची गर्दी मनांत उडून जाते. **धांव घेति**—धावत जातात. **बांबळ**—आधिक्य. **पडे**—होई. मऊ वस्तूच्या स्पर्शानें सुख होणें किंवा खरबरीत वस्तूच्या स्पर्शानें दुःख होणें, अशांसारख्या विकारांची मनांत खळबळ उडतें. **ओ १०१**—आतां नेत्रेंद्रिय आपल्या दृश्यविषयांकडे कसें धावतें तें सांगतात. " मग रूपरूपी पानांची वाढ झाली असतां, डोळे आपल्या बुद्धीनें लांबच लांब कांडें घालतात. डोळे मोठ्या उत्कंठेनें दूरवर दृष्टि फेकतात. त्यावेळीं भ्रम चांगलाच पसरला जातो." रूप हा डोळ्यांचा विषय असल्यामुळें, दृश्यविषयाकडे डोळे जोरानें आकर्षिले जातात. डोळा आपणहून आपल्या बुद्धीनें दृष्टीचें लांबच लांब कांडें घालतो. आपण व दृश्यवस्तु यांतील केवढेंही अंतर तो तोडतो व अशा रितीनें पहात असतांना, त्याच्या दृष्टीला भ्रम पडतो- **कांडें घाली**-वाढ करतों, डोळा आपली दृष्टि लांबवितो. हाच वाक्यप्रयोग मागें ओ. ९९ मध्यें आला आहे. **पाल्हेली जांपे**—पसरली जाते. **व्यामोहता**-मोह, भ्रम. **पेलोवेलि**—वाढीनें. **ओ. १०२**—रसनेंद्रियाचेंही असेंच वर्णन करतात " आणि रसाची साल जोरानें वाढता वाढतां त्यांतूनच जिभेच्या गोडीचीं अनेक पानांतलीं पानें फुटतात." या संसाररूपी वृक्षाची रसरूपी साल वाढतां वाढतां तिच्यांतून हा रस चाखण्याच्या जिभेच्या त्या त्या

रुचीचीं पानें फुटतात. तात्पर्य रस हा विषय उत्पन्न होतांच तो चाखण्याची जिभेची अनिवार इच्छा होते असा भाव. **आंगवसा**-साल. ( पहा ओ. ९८) **असोसे**-फार, अतिशय. **बेचें**-पानातलीं पानें, एका पानांतून दुसरीं पानें. एक रस चाखण्याच्या जिभेच्या इच्छेतून आणखी दुसरा रस चाखण्याची अनिवार इच्छा निर्माण होते. **ओ. १०३**-" त्याचप्रमाणे गंधाचा (वासाचा) कोंभ फुटून मग घ्राणेंद्रियाची लहान फांदी जोर धरते, व ती मोठ्या आनंदानें प्रलोभाच्या तळाला उडी घेते. " झाडाच्या डाहाळ्या वाढल्या म्हणजे त्या जशा जमीनीला येऊन खालीं पोंचतात, त्याप्रमाणें ही घ्राणेंद्रियाची डाहाळी लोभाच्या तळाला पोंचते. गंध विषयाचा, वासाचा मागमुस लागतांच, मग घ्राणेंद्रियाला त्या वासाच्या वस्तूचा लोभ उत्पन्न होतो. ती वासाची वस्तु, कोठेही असली, तरी तें घ्राणेंद्रिय त्यावर उडी घेतें, त्याच्या तळाळा जातें. **था ॐ बांधणें**—ठाव बांधणें,=जोर धरणें. **तळु घे**—बुडतो, तळाला जातो. पहा—" आवडिचां आवर्ती पडत। सिह्मणिवेचें तारूं तळु घेत ॥—नरेंद्र रु. स्व-६३०. याप्रमाणें पंच ज्ञानेंद्रियें आपापल्या विषयांशीं संलग्न झालीं असतां, तेथे अनेक विकार कसें उत्पन्न होतात, तें वृक्षाच्या वाढीच्या रूपकाच्या परिभाषेंत ९९—१०३ या ओव्यांत वर्णिलें आहे. ओ. १०४ मध्यें आतापर्यंत केलेल्या विवेचनाचे सार दिलें आहे.

**ओ. १०४**—" याप्रमाणें, महत्, अहंकार, मन व पृथ्वी, आप, तेज, वायु, व आकाश हा पंचमहाभूतांचा समुदाय, अशा या आठ पदार्थांनीं या संसाराच्या मर्यादेचें नियमन केलें आहे. **अवधी**—मर्यादा. **सासन**—नियमन. सर्व संसार या अष्टधा प्रकृतीचा किंवा आठ पदार्थांचा झाला आहे. या आठांच्या मर्यादेपलीकडे तो जात नाहीं. **ओ. १०५**—फार काय, या आठ अंगांनीं, हा संसारवृक्ष विस्तार पावतो. **फांदे**—पसरतो. पण शिंपल्यावर ऊन पडलें असतां, तेथे भासमान होणाऱ्या रूप्याचा आकार जसा त्या शिंपल्याएवढाच असणार, त्याहून कमी अधिक असत नाहीं, त्याप्रमाणें मूळ परब्रह्मावर भासमान होणारा हा संसार, परब्रह्माहून कमी अधिक असणार नाहीं. या ओवींत प्रतिपादलेल्या दोन गोष्टी लक्षांत घेतल्या पाहिजेत. एकाद्या वस्तूवर भासमान झालेली दुसरी वस्तु, पहिलीहून कमी अधिक असत नाहीं. त्यामुळें संसाराचा

विस्तार परब्रह्मा एवढाच असणार हें एक, व शिंपल्यावर रुप्याचा केलेला आरोप हा जसा एक आभास आहे, तसा परब्रह्मावर केलेला संसाराचा आरोपही आभासात्मकच होय, हें दुसरें. **उमटे**-भासमान होतें. **ओ. १०६**-यालाच आणखी एक दृष्टांत देतात. " किंवा समुद्राच्या विस्ताराला अनुसरूनच, त्यावरील लाटा पसरतात. त्याप्रमाणें ब्रह्मच हा अज्ञानमूलक संसारवृक्ष बनलें आहे." समुद्रावरील लाटा जशा समुद्राच्या विस्तारांहून कमी अधिक असणें संभवत नाहीं, तद्वत् अज्ञानमूलक संसार ज्या परब्रह्मापासून भासमान होतो, तो त्या मूळ परब्रह्माहून केव्हांही कमी अधिक असणार नाहीं. परब्रह्मच हा संसार होऊन बसतें. **पैसारें**-विस्ताराप्रमाणें. **आसारें**-पसरतें. **ओ. १०७** "-आतां ज्या परब्रह्माचा हा संसारवृक्षरूपी विस्तार आहे, तों त्याचाच (परब्रह्माचाच) पसारा होय. जसा स्वप्नांत दिसणारा परिवार आपणच एकट्यानें निर्माण केलेला असतो, त्याप्रमाणें परब्रह्मानें एकट्यानें हा संसार केवळ मायेमुळें उत्पन्न केला आहे. स्वप्न जसें खरें नव्हे, तसा संसारहीं कांहीं खरा नव्हें. **आपणपें**-आपणासून. **परिवारु**-स्वप्नांत दिसणारे निरानिराळे पदार्थ. **एकाकिय**-एकट्या. याचा संबंध ' आपणपें ' याकडे घ्यावा. ज्ञानेश्वरांनीं येथे ' ब्रह्मच वृक्षाकार होतें ' किंवा ' त्याला मायेचें आळें बांधलें जातें ' अशी वेदांताची परिभाषा वापरली असून, संसारवृक्षाची वाढ सांगताना वर जी अष्टधा ( ओ. १०४ ) प्रकृति सांगितली आहे, ती मात्र सांख्यांच्या मतानुसार आहे हें लक्षांत ठेवलें पाहिजे. असा वेदांत व सांख्य मतांचा समन्वय करण्याचा गीतेप्रमाणेंच त्यांनीं प्रयत्न केला आहे. **ओ. १०८**—" पण याप्रमाणें कांहींही असलें तरी हें संसाररूपी आभासात्मक झाड जोरानें फोफावतें व महत्, अहंकार, मन व पंचमहाभूतें इत्यादि त्याच्या खालच्या फांद्या अंकुररूपानें असतात." प्रकृतीपासून पुढें उत्पन्न होणाऱ्या सांख्यांच्या तत्त्वाचा क्रम खाली दिल्याप्रमाणें आहे:—१ पुरुष (हा स्वयंभू व अनादि आहे.) २ प्रकृति ( अव्यक्त व सूक्ष्म ). या प्राकृतीपासूनच महान् (बुद्धि) व अहंकार हे उत्पन्न होतात, व या अंहकारापासून सात्विक सृष्टीच्या बाजूनें ५ ज्ञानेंद्रियें, ५ कर्मेंद्रियें व मन व तामसृष्टीच्या बाजूनें ५ तन्मात्रें व पांच महाभूतें निघतात. याप्रमाणें पुरुषासहित, ब्रह्मांडाच्या या वृक्षाची सांख्यांचीं २५ तत्त्वें होतात. यापैकीं महान् किंवा बुद्धीपासून पुढले २३ गुण, हे

मूळ प्रकृतीचेच विकार होत. त्यांतही पुनः पंचमहाभूतांच स्थूल शरीर बनत असून, बाकीच्या महान् अहंकार, पांच ज्ञानेंद्रियें, ५ कर्मेंद्रियें, मन, व पंच तन्मात्रें अशा १८ तत्त्वांचे लिंग किंवा सूक्ष्म शरीर झालेलें आहे. सांख्यांच्या या २३ तत्त्वांनाच प्रस्तुत ओवींत मिहदादि अधोशाखा असें म्हटलें आहे. **कांवरें**— भ्रमात्मक, आभासात्मक. मागें ओ. ५२ मध्यें 'कावरुखें' असा उल्लेख आलाच आहे. **उससे**— प्रकट होतें. **महदादि**—महत्, अहंकार इ० तत्त्वें. **आरवसे**- अंकुर. **ओ. १०९**-येथून पुढील आठ ओव्यांत या संसार वृक्षाला 'अश्वत्थ' असें नांव कां पडलें तें सांगतात. ज्ञानेश्वरांनीं आतांपर्यंत या अध्यायाच्या पाहिल्या श्लोकांतील 'ऊर्ध्वमूलं' व 'अधःशाखं' या दोन पदांवर विवेचन केलें असून, आतां तें अश्वत्थं प्राहुरव्ययं' यावरील प्रवचनाला सुरवात करीत आहेत. पण ज्ञानेश्वरांनीं वास्तविक येथे ऊर्ध्वमूल व अधःशाख यावर व्याख्यान करतांना, दुसऱ्या श्लोकांत येणाऱ्या सांख्यांच्या २४ तत्त्वांच्या प्रक्रियेचा परामर्श येथे अगोदरच घेऊन टाकला आहे. **ओ. ११०**— येथे 'अश्वत्थ' या शद्वाची व्युत्पत्ति देण्याचा प्रयत्न केला आहे. अ म्हणजे नाहीं, श्वस म्हणजे उजाडेपर्यंत, दुसऱ्या दिवशींच्या उषेपर्यंत, प्रातःकालपर्यंत, त्थ=स्थिति ज्याची असा. ज्या संसारवृक्षाची आजच्यासारखी स्थिति दुसऱ्या दिवशींच्या प्रातःकालपर्यंत टिकत नाहीं. तात्पर्य ज्या संसाराचें आजचें स्वरूप उद्या टिकत नाहीं इतकें अस्थिर आहे, अशा या संसाराला 'अश्वत्थ' असें म्हटलें आहे. **उखा**—उषा, प्रातःकाल. **तंव वारि** इ.— दुसऱ्या दिवशींच्या पहाटेपर्यंत एकसारखा असा ज्याचा निर्वाह नाहीं असा. तात्पर्य सारखा पालटणारा, २४ तासदेखील एकसारखा न टिकणारा. **निर्वाह**- स्थिति, **रुंखा**—वृक्षास, प्रपंचरूपी, संसाररूपी या वृक्षास. **ओ. १११**—या संसारवृक्षाच्या अस्थिरतेला दुसरे दृष्टांत देतात. " ज्याप्रमाणें एक क्षण जातो न जातो इतक्यांत आकाशांतलि मेघ अनेक वर्णांचें होतात, त्यांचे रंग सारखे पालटतात, किंवा वीज जशी एक पूर्ण निमिषभर देखील टिकत नाहीं. **निमिष**- डोळ्याची उघड झांप. डोळ्यांची एकदा उघड झांप होण्याला जेवढा वेळ लागतो, तेवढा वेळ देखील आकाशांतली वीज स्थिर नसते. या मेघ विजेप्रमाणेच संसारवृक्ष अस्थिर आहे. **ओ. ११२**—आणखी दृष्टांत देतात. " कमलाच्या हल-

णाऱ्या पानावर जसें पाणी ठरत नाहीं, 'किंवा व्याकुल ( भयाकुल ) झालेल्या माणसाचें चित्त जसे स्थिर नसतें, ' तशीच या संसारवृक्षाची गत आहे. **कांपतेया**-हालणाऱ्या. **बैसका**-बैठक, आसन, स्थिरता. तुलनार्थ पहा- " नलिनीदलगतजलमतितरलं । तद्वज्जीवितमतिशयचपलं । इह संसारे खलु दुस्तारे । कृपयापारे पाहि मुरारे॥—चर्पटपंजरी—श्रीशंकराचार्य. **ओ. ११३**-या संसारवृक्षाची वर दिलेल्या दृष्टांतांतील वस्तूंसारखीच स्थिति आहे. त्याचें स्वरूप क्षणाक्षणाला बिघडतें, बदलतें. म्हणूनच याला 'अश्वत्थ' असें म्हणतात.

**ओ. ११४—** व्यवहारांत ' अश्वत्थ ' म्हणजे पिंपळ असें म्हणतात. परंतु श्रीहरीचा या ठिकाणीं तसा अभिप्राय दिसत नाहीं. ज्ञानेश्वरांचे म्हणणें असें कीं, अश्वत्थ=पिंपळ या लौकिक किंवा रूढ अर्थानें श्रीकृष्णांनीं तो शद्ब येथे योजलेला नाहीं. तर संसाराच्या अस्थिर स्वरूपाकडे पाहून, श्रीकृष्णांनी ' अश्वत्थ ' हा शद्ब वरील यौगिक अर्थानें योजलेला आहे, असा त्यांचा युक्तिवाद आहे. **ओ. ११५—** ज्ञानेश्वर म्हणतात कीं, " अश्वत्थ ' या शब्दाचा ' पिंपळ ' हा अर्थ करण्याच्या बाबतींत कोणती पद्धति स्वीकारावयाची, ती मी चांगली जाणतों. पण त्या लौकिक अर्थाशीं आपणास काय करावयाचें आहे ? ' अश्वत्थ ' शब्द ' पिंपळ ' या लौकिकें, रूढ अर्थानें कसा लावयचा हें आपण जाणतो, पण तो लौकिक अर्थ येथे प्रस्तुत नाहीं, असा ज्ञानेश्वरांचा अभिप्राय आहे. **घडता विखिं-** करण्याविषयीं. **नीकी-**चांगली. **ओ. ११६**-ज्ञानेश्वरांनीं मागील ओवींत ' अश्वत्थ ' याच्या लौकिक अर्थाशीं आपणास कांहीं कर्तव्य नाहीं असें सांगितलें. या ओवींत ते म्हणतात कीं, लौकिक अर्थ आपणास ग्राह्य नाहीं, म्हणुनच ' अश्वत्थ ' याचा अलौकिक किंवा यौगिक अर्थ ( ग्रंथ ) मी येथे लावला आहें, तो ऐका. म्हणून संसारवृक्षाचें क्षणिकत्व लक्षांत घेऊनच, याला अश्वत्थ ' असें नांव दिलें आहें. **ग्रंथ**--अर्थ. ग्रंथ लावणें म्हणजे अर्थ लावणें अशी म्हण मराठींत रूढ आहेच. ' ग्रंथ ' याचा हा विशिष्ट अर्थ लक्षांत न आल्यानें, साखरे इत्यादि टीकाकारांनीं ग्रंथ म्हणजे ज्ञानेश्वरी ग्रंथ, असा येथे चुकीचा अर्थ केला आहे. ओंव्या ११७--१२७ मध्यें, ' अव्ययम् ' या पदावर व्याख्यान केलें असून, संसाररूपी वृक्षाची अव्यय म्हणून प्रसिद्धी कां आहे, त्याचें कारण दिलें आहे. " आणिक देखील या संसारवृक्षाची अव्ययत्वाबद्दल, नित्यत्वाबद्दल मोठी प्रसिद्धी

आहे. पण त्याचा आंतला भाग असा ( खालीं दिल्याप्रमाणें ) आहे. **डगरु**— प्रसिद्धि. **भीतरु**—आंतला भाग. या संसारवृक्षाची 'अव्यय' म्हणून असलेली प्रसिद्धी वरवरची आहे, त्याचा आंतला भाग तसा नाहीं, हें पुढील ओव्यांतून दिलेल्या दृष्टांतानें स्पष्ट करतात. **ओ. ११८**— " ज्याप्रमाणें समुद्र एकाबाजूनें मेघांच्या तोंडानें ( आपले पाणी ) दवडतो, तर दुसऱ्या बाजूनें नद्या त्याला पाण्यानें भरीतच असतात. " मेघ समुद्राचें पाणी शोषून कमी करतात, तर नद्या समुद्रांत पाणी आणून सोडतात. अशी एकीकडून ओहोटी तर दुसरीकडून भरती चाललेली असते, त्याप्रमाणेंच या संसाराची स्थिति आहे. यांतील माणसें जितकीं मरतात तितकीं नवीन जन्मतात, त्यामुळें संसार आहे, तेवढाच आहे, अशी समजूत होते व आा अर्थानें त्याला अव्यय म्हटलें आहे. **एकें आंगें**—एका बाजूनें, एकीकडून. **घढे**— दवडतो. **एरीकडे**—दुसरीकडे. **ओ. ११९**—येथे वर वर्णिलेला समुद्र कमीही होत नाहीं किंवा वाढतही नाहीं, म्हणून तो नित्य परिपूर्ण भरलेला असा वाटतो. पण जोंपर्यंत त्याचा मेघांशीं व नदीशीं होणारा संयोग सुटत नाहीं, तोंपर्यंत त्याचें परिपूर्णत्व चालूंच असतें. कारण जुनें पाणी जात असतें व नवें येतच असतें. अशी वजाबाकीबेरीज जोपर्यंत चालू आहे, तोंपर्यंत समुद्रही परिपूर्णच म्हणावयाचा. तसाच प्रकार संसाराचा आहे. **आवडे**— वाटे. ज्ञानेश्वरींत हा शब्द अशा अर्थी अनेक वेळां आला आहे. **फुली नुघडे**— संयोग सुटत नाहीं. **ओ. १२०**—त्याप्रमाणें या संसाररूपी वृक्षाचें होणें जाणें सत्वर घडून येतें असें वाटतें, म्हणून लोक या वृक्षाला 'हा अव्यय आहे' असें म्हणतात. समुद्राच्या पाण्याप्रमाणें या संसारांतील वस्तूंची आवकजावक इतक्या त्वरेनें घडून येते कीं, लोकांना या आवकजावकेचा चाललेला व्यापार कळून न आल्यानें, संसारांत मरणाच्या व जन्माच्या अशा घडामोडी चालल्याचें लोकांच्या लक्षांतच येत नाहीं. त्यांना आपलें वाटतच असतें कीं, या संसारांत कमी अधिक कांहींच होत नाहीं, तो आहे तसा आहे. **वहिलेपणें**--त्वरेनें. **होणें जाणें**—या संसारांतील प्राण्यांचें उपजणें मरणें. **ओ. १२१**—ज्याप्रमाणें एकादा दानशील माणूस एकीकडे धर्मादायांत पैसा खर्च करतो, त्याचवेळीं दुसरीकडे पुण्यसंचय करीत असतो. एकीकडे त्याचा पैसा खर्च झाल्याप्रमाणें वाटतें,

पण त्याचवेळीं त्याला दानधर्माचें पुण्य लाभलेलें असतें. दानशूर माणसाची अशी बेरीज वजाबाकी होते. त्याप्रमाणें हा संसारवृक्ष देखील व्ययानेंच अव्यय दिसतो. या संसारांतील प्राण्यांची उत्पत्ति त्यांच्या लयाला कारणीभूत होते, तर त्यांचा लयही त्यांच्या आणखी उत्पत्तीला कारण होतो. अशा उपजण्यामरण्याच्या रहाटगाडग्यानें हा संसार अबाधित भासतो. **वेचकपणें**—खर्चिकपणानें. **संचकु**-पुण्यसंचय करणारा. **ओ. १२२** संसारवृक्षाची अशी उलटापालट चालली असतांना, तो वर वर पाहणाऱ्यांना अगदीं संथ व अव्याहत असा भासतो. यालाच व्यवहारांतला आणखी एक दृष्टांत देतात. " रथाचें चाक जोरानें फिरत असतां तें जमिनीवर रुतलेलेंच आहे, थोडा वेळ स्थिर आहे, असें भासत नाहीं कां ? त्याप्रमाणें हा संसार देखील त्यांत प्राण्यांच्या जन्ममरणाच्या अनंत उलाढाली होत असतांना आपणास स्थिरच वाटतो.—पहा-" उपजणें मरणें न चुके नरा । फिरत नित्य असे भवभोंवरा ।- " वामनपंडित. तें रथचक्र जसें वास्तविक स्थिर नसतें, तसा संसारही अव्यय नाहीं. **न वचे कां**— वाटत नाहीं कां ? पण ' वच् ' याचा वाटणें असा अर्थ, कोशांत सांपडत नाहीं. कदाचित् नुमजे—नुवचे—नवचे असें हें रूप झालें असेल. नुमजणें= उमगणें, वाटणें. **बहुवसें**-अतिशय. **ओ. १२३**-त्याप्रमाणें या संसारवृक्षाच्या प्राणिमात्ररूपी फांद्या कालांतरानें वाळून गळून पडल्या, तरी कोट्यावधि नवे अंकुर उत्पन्न होतातच. असा सारखा क्रम चालला असल्यानें, संसार, अथवा जग, अबाधित चाललें आहे असे वाटतें. **उमाले**—अंकुर. **ओ. १२४**—" पण एक खांदी केव्हां गळली व त्यानंतर कोट्यावधि खांद्या केव्हां फुटल्या, हे आषाढ महिन्यांत उदयास आलेल्या ढगाप्रमाणें ( केव्हां आले केव्हां गेले ) समजत नाहीं. " आषाढ महिन्यांत ढग येतात, ते गळतात, पुनः नवे ढग येतात, असें सारखें चाललेलें असते. त्याप्रमाणें या संसारांत प्राणिमात्र मरत असतात व नवीन जन्मास येतच असतात. आषाढांतले मेघ स्थिर नसतात. त्यावरूनच ' आखाडसासरा ' ही म्हण मराठींत पडली आहे. **शाखा— कोडि**- कोट्यावधि शाखा. **उमलणें**— उदित होणें. संसार हा वरून अव्यय भासला, तरी त्यांत ओहोटी व भरती चाललेलीच असतें, हें स्पष्ट करण्याकरितां ज्ञानेश्वरांनीं वरील ११९-१२३ ओव्यांत मेघ-नदी, दानशील पुरुषाचा

व्यय-संचय, रथचक्र व आषाढांतले मेघ, यांचे जे दृष्टांत दिले आहेत ते फारच अनुरूप व अचूक असे आहेत. यापुढें या संसारवृक्षांत कल्पांच्या प्रारंभीं व शेवटीं कशी घडामोड होत असते तें वर्णन करतात. **ओ. १२५**—" कल्पांताच्या, जगाच्या शेवटीं या संसाररूपी वृक्षाच्या देहरूपी शाखा उन्मळून पडतात, व जगदारंभीं पुनः त्या शाखांचें अरण्य माजून तें भरास येतें." **कल्प**— ब्रह्मदेवाचा दिवस. या दिवसाच्या शेवटीं पृथ्वीप्रळय होतो अशी समजूत आहे. **प्रकाटिया**—आस्तित्वांत असलेली. **सृष्टि**-सजीव निर्जीव वस्तु. **उमलती**- उखळून पडतात. पृथ्वीप्रलयाच्या शेवटीं सर्व सजीवनिर्जीव वस्तु नष्ट होतात, व पुनः सृष्टीच्या उत्पत्तीच्यावेळीं सर्व स्थावरजंगम वस्तूंचें नवें रान उठतें. **दांग**—अरण्य. **सांसीनलें**—प्रफुल्लित झालेलें. सारांश प्रत्येक वस्तूच्या मागें उत्पत्ति, स्थिति व लय या तीन अवस्था लागलेल्याच आहेत. **ओ. १२६**- " प्रलयकालीं संहार करण्यासाठीं सुटलेल्या भयंकर झंझावातानें या संसारवृक्षाची सालें गळून पडतात, तर सृष्टीच्या पुनरुत्पत्तीच्यावेळीं फांद्यांचें नवीन समुदाय पल्लवित होतात." मागील ओवींतलि वस्तुस्थितीचा येथे पुन: अनुवाद केला आहे. **पाल्हेजति**-बहरतात. **झुंबाडें**-समुदाय, झुबके. जुनी सृष्टि नाश पावून तेथे नवी उत्पन्न होते असा भावार्थ. **ओ. १२७**-एका मन्वंतरानंतर दुसरें मन्वंतर येतें व वंशामागून वंशांचे विस्तार होतात. ज्याप्रमाणें उसाची वाढ कांड्याकांड्यांनीं पुढें पाऊल टाकते, त्याप्रमाणें एका मन्वंतरांतून दुसरें, व एका वंशांतून दुसरा वंश विस्तार पावतो, असा सृष्टीचा क्रमच आहे. **मांडणें**-विस्तार पावणें. **जींके**—प्रगति करते. **ओ. १२८**—" कलियुगाच्या शेवटीं मागील चारी युगांची शुष्क सालपटें गळून पाडतात. इतक्यांत पुनः सुरु होणाऱ्या कृतयुगाची ओली साल पुनः दिसूं लागते. कृत, त्रेता, द्वापर व कलि अशीं हीं चार युगें असून, क्रमानें तीं एकामागून एक येतात. शेवटच्या कलियुगानंतर पुनः कृतयुग सुरू होऊन, नवीन सृष्टीला प्रारंभ होतो. **डालें**—डाहाळ्या. चारी युगांतलं प्राणिमात्र कलियुगाच्या शेवटीं नष्ट होतात, तों इतक्यात कृतयुगाच्या उदयानें नवीन सृष्टीला प्रारंभ होतो. **पली**—ओली साल, अर्थात् नवीन भूतसृष्टि. **देव्हडी**-मोठी. **पखे**—दिसत. कलियुगाच्या शेवटीं सृष्टि बुडाली म्हणावें तों कृतयुगारंभीं ती पुनः निर्माण होतेच. **ओ. १२९**-हाच नाशाचा व पुनरुज्जी-

वनाचा सृष्टीचा न्याय वर्ष व दिवस यांच्या बाबतींतही कसा खरा ठरला आहे, तें सांगतात. " चालू वर्ष पुढच्या वर्षाला बोलावणारें ठरतें. ज्याप्रमाणें दिवस मावळतांना जातो कीं येतो हें आपणास समजत नाहीं. वास्तविक दिवस मावळतो तो दुसऱ्या दिवशीं उगवण्यासाठींच होय. त्यामुळें मावळतांना दिवस जोतो कीं येतो याचा निर्णय लागत नाहीं. **मुऱ्हारी**-बोलावणारा, सासुरवाशिणीला माहेरीं बोलावण्यास आलेला गडी. **चोजवे**-जाणवे. एकवर्ष गेलें कीं दुसरें नवें येतें. ज्याप्रमाणें एक दिवस मावळला तरी तो दुसऱ्या दिवसाला कारणीभूत होतो. अस्तांतून उदय व उदयांतून अस्त हा क्रम चालूच आहे. पण तो नित्य घडत असल्यामुळें, आपल्या लक्षांत येत नाहीं. या अव्याहत क्रमाप्रमाणेंच प्राणी जन्मतात, त्यामुळें हा संसार अव्यय आहे असें भासतें.

**ओ. १३०**—" ज्याप्रमाणें वाऱ्याच्या झुळुकांना मध्यंतरीं सांधा ठाऊक नसतो; एक झुळुक जाते तों दुसरी येतच असते, त्यामुळें वारा सारखा वाहतो असेंच आपण म्हणतो; त्याप्रमाणें या संसारवृक्षाच्या प्राणिमात्ररूपी शाखा उत्पन्न होतात व गळतात. या क्रमामध्यें खंड म्हणून पडत नाहीं, त्यामुळें संसार अव्यय आहे, अबाधित अखंड चालला आहे, असें आपणास वाटतें. **नेणों काति**—किती त्या समजत नाहींत. **शाखा**—प्राणिरूप फांद्या. **ओ. १३१**— या संसारतरूच्या प्राणिरूप फांदीचा एक अंकुर गळतो, तो पर्यंत दुसरे अनेक अंकुर त्या झाडाला फुटतात. यामुळें हा संसारवृक्ष अव्यय आहे असें वाटतें, **डिरी**--अंकुर. **बहुवें**—पुष्कळ ( सप्तमी. ) **भवतरु**-संसारवृक्ष. या वृक्षाच्या अव्ययत्वावर ज्ञानेश्वरांनीं अनेक दृष्टांत देऊन ती गोष्ट स्पष्ट केली आहे. राजाची गोष्ट अशीच आहे. एक राजा मेला कीं त्याच्या जागीं दुसरा बसतोच. त्यामुळें राजा ही संस्था कायमच असते. राजाला मरण नाहीं म्हणतात, तें राजा या संस्थेच्या अव्याहतपणामुळेंच होय. " The King is dead ! God save the King " या इंग्रजी म्हणींत हेंच अव्ययत्वाचें सत्य सांठविलेलें आहे. वास्तविक एका राजाच्या मरणाची व दुसऱ्याच्या राज्यारोहणाची घटना होतच असते. पण त्याकडे लक्ष न देतां, राजा ही संस्था जशी कायम आहे असें आपण मानतों, त्याप्रमाणें अनेक प्राण्यांच्या मरणाची व दुसऱ्या

प्राण्यांच्या जन्माची घडामोड नित्य होत असली, तरी ‘ संसार ’ ही संस्था अबाधित, अखंड चाललेली आहे असें आपण मानतो. **ओ. १३२**—यालाच वाहत्या पाण्याचा आणखी दृष्टांत देतात. आपण नदीतीरावर उभे राहिलों असतां आपल्या पुढून पाण्याचा एक प्रवाह वाहत जातो, व त्याच्या मागून येणारा दुसरा प्रवाह त्याला मिळतो. तोही आपल्या पुढून जातोच. या एकामागून दुसऱ्या जाणाऱ्या प्रवाहांनाच आपण नदीचें पात्र म्हणतो. वास्तविक हे प्रवाह जर सर्व जाणारेच आहेत, तर त्यांना आम्हीं पात्र अशी संज्ञा कां द्यावी ? पण हे प्रवाह आमच्या पुढून जातांना एकामागून एक अशा अखंड क्रमानें जात असल्या-मुळेंच, आपण त्या प्रवाहांना स्थिर मानून त्यांचे पात्र बनलें आहे अशी आपली समजूत करून घेतो. तशीच स्थिति या जगाची आहे. तें नसून देखील आहे असेंच आपण मानतों. एकीकडून पहावें तों जग नाहींसें होत असतें, तर दुसरीकडून तें नवीन अस्तित्वांत येत असतें. जुने पाणी जातें व नवे येतें, त्याप्रमाणें जुने प्राणी जातात व नवे येतात. **ओ १३३**—किंवा डोळ्याचें पातें लवतें न लवतें इतक्यांत कोट्यावधि प्राण्यांची घडामोड होते. एवढ्या थोडक्या अवकाशांत अनेक प्राणी मरतात तसे जन्मतात. पण समुद्राच्या जाणाऱ्या व येणाऱ्या लाटांप्रमाणेंच अज्ञानी माणूस या जगाला नित्य मानतो. अज्ञान्याला त्या लाटा जशा नित्य भासतात, तसें जगही त्याला नित्य भासतें. वास्तविक त्या लाटही जशा नित्य नव्हेत, तसें हें जग ही नित्य नव्हे. **लागोनि डोला इ०**-डोळा लागून तो उघडतो, डोळ्याची होणारी उघड झांप. **नेणतियां**-अज्ञानी माणसास. **आवडे**-वाटे. या अर्थी हा शब्द ज्ञानेश्वर अनेकदा उपयोगतात. पहा – ओ. ११९. **ओ. १३४**–कावळा आपलें एकच बुबुळ एका क्षणांत दोनी डोळ्यांतून फिरवितो, आणि त्यायोगानें त्याला एक बुबुळ असतानां, दोन आहेत असें लोकांना भासतें. त्याप्रमाणें वास्तविक जग अनित्य असतां तें नित्य आहे असा आपणास भास होतो. **वायसा**-कावळ्यानें. **डोला चालिता इ०**-डोळ्याची चाळवाचाळव सारखी केल्यानें. कावळ्याला दोन डोळ्यांत मिळून एकच बुबुळ असतें पण तो हें एकच बुबुळ एकदा एका डोळ्यांत तर एकदा दुसऱ्या डोळ्यांत जोरानें फिरवितो, व मग त्याला दोन डोळे आहेत, असा भ्रम माणसाला पडतो. अज्ञान्याला असाच भ्रम जगाच्या नित्यत्वा-

बद्दल पडतो. **ओ. १३५**-किंवा अतिशय वेगानें फिरविली गेलेली भिंगरी, फिरत असूनही जशी जमिनीला चिकटली आहे असें भासतें, ती स्थिर आहे असा भ्रम होतो. येथे त्या भिंगरीला दिलेला वेगातिशयच या भ्रमाला कारणीभूत होतो. त्याप्रमाणें हें जग अनित्य असूनही अज्ञान्याला तें नित्य आहे असा भ्रम होतो. **भिंगोरी**-भोंवरा. **निधिये इ.**-अतिशय वेगानें केलेल्या भ्रमणांत सांपडली. **निधि**-अतिशय वेगानें भ्रमण. **भुली**-भुलीला ( चतु. ) भ्रमाला. **भूमीसि-जडली**—जमिनीला चिकटलीच आहे, निश्चल. आहे. **ओ. १३६**-फार कशाला! एकादी कोलती अंधारांत वेगानें चक्राकार फिरविली, तर ती जशी एक लांबचलांब, विस्तृत रेघ दिसते. **झडिती**-लवकर ( सं. झटिति ). **भवं-डितां**-चक्राकार फिरविली असतां. **आइती**--आयत, लांब. **रेखा**-अग्निरेखा. **सैंभ**—स्वयमेव, आपणहून. पहा-" कीं ते सुखाची सैंभ। कीं परिमळाची अक्षोभ। कीं रूपासि आली भांभ। शृंगाराची ॥ '—नरेंद्र-रु. स्व. ८७. ही फिरविलेल्या कोलतीची चक्राकार अग्निरेखा, जशी खरंचि आहे असा आपणास घटकाभर भ्रम होतो, त्याप्रमाणें हें जगही अनित्य असता आपणास अज्ञानानें नित्य भासतें. **ओ. १३७**-त्याप्रमाणें हा संसाररूपी वृक्ष एकीकडून नाश पावत असतां, त्याचवेळीं दुसरीकडून तो उत्पन्न होतो हें न समजल्यामुळें, वेडे, अज्ञानीलोक त्याला नित्य समजतात. **मोडतु मांडतु**-एकीकडून नाश पावणारा व दुसरीकडून जन्म पावणारा. **पांसा**--अज्ञानी, वेडा. **ओ. १३८**—पण या वृक्षाचा हा मोडण्याचा व मांडण्याचा वेग ज्याच्या लक्षांत आला, जो या वृक्षाला क्षणिक, अनित्य असा ओळखतो, व एका निमिषांत तो नाश पावतो व उत्पन्न होतो, हें जो जाणतो." **जो**—या व पुढील ओवींतील जो. जेणें या संबंधीं सर्वनामाचा संबंध, ओ. १४० मधील ' तेयातें ' या दर्शक सर्व-नामाशीं आहे. **वेग**—संसारांतील प्राणिमात्रांच्या उपजण्यामरण्याचा हा लगबगीनें होणारा क्रम. **ओ. १३९**—" आज्ञानावाचून या संसारवृक्षाला दुसरें मूळ नाहीं, याचें अस्तित्वही खोटें आहे, व असें हें झाडच मुळीं साल झडलेलें, क्षणिक आहे, हें ज्यानें जाणलें." **आसिलपण**--अस्तित्व. **टवाळ**—खोटें. **सीनसाल**—जीर्णसालाच ( शीर्णसाल ) अतएव नाश-वंत, क्षणिक. **देखिलें जेणें**— ज्यानें हें लक्षांत घेतलें, जाणलें.

**ओ. १४०—**" त्यालाच हे अर्जुना ! मी सर्वज्ञ व ज्ञानी म्हणतो. शिवाय वेदांचें सिद्धांत जाणण्यास तोच पात्र आहे " **तयातें**— वर १३८, १३९ ओवींत सांगितल्याप्रमाणें ज्यानें संसारवृक्षाचा मोडण्यामांडण्याचा क्रम, त्याचें अनित्यत्व इत्यादि जाणलें आहे त्याला. **सर्वज्ञु**— सर्व जाणणारा. श्रीकृष्ण स्वतः सर्वज्ञ असतां, संसारवृक्षाचे खरें स्वरूप ओळखणाऱ्यास ते सर्वज्ञ म्हणतात, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. **वाग्ब्रह्म**— वेद. पण येथे उपनिषदें यांचाहि 'वेद' यांत अंतर्भाव होतोच. उपनिषदें हीं वेदांच्या शेवटीं असल्यानें, त्यांना वेदान्त म्हणतात. वेदांत शास्त्राचे सिद्धांत, ( 'ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या जीवो ब्रह्मैव नापरः' असे सिद्धांत ) जाणण्यास असा माणूसच योग्य आहे, असं श्रीकृष्णांचें म्हणणें. **ओ. १४१**— संसाराच्या खऱ्या स्वरूपाची ओळख झालेल्या ज्ञानी माणसालाच योग शास्त्रानें मिळणाऱ्या फलाचा म्हणावा तसा उपयोग होतो. फार काय ! त्याच्यामुळेंच ज्ञानाला जिणें प्राप्त होतें. " **योगजात ६.**—पातंजल योगाशास्त्रापासून मिळणारें फल. संसाराचें खरें ज्ञान झालेल्या माणसासाच योगशास्त्राची खरी प्रक्रिया, म्हणजे चित्तशुद्धीसाठी त्याचें आचारण कसें करावयाचें तें समजतें. म्हणजे हें योगशास्त्र त्याच्या ज्ञानमार्गाला पूरक किंवा सहाय्यक होतें. शिवाय अशा ज्ञानी माणसामुळेंच असें वेदांतज्ञान टिकून राहतें. असा माणूसच वेदांतांतील श्रेष्ठ ज्ञानाला खरा आधार आहे. **ओवी १४२**— सारांश हा संसारवृक्ष मिथ्या आहे हें जो जाणतो, त्याचें वर्णन कोण करूं शकेल ? अशा माणसाचें वर्णन करावें तेवढे थोडेंच असा अर्थ. **वानिजैल**— वर्णन केला जाईल. **उखि**—मिथ्या, खोटा. पहा– " आरिसा आणि मुखीं । मी दिसे हें उखी ॥– " अमृतानुभव २।६५.

( **श्लोक २** )– " सत्वरजतमादि तीन गुणांनीं पुष्ट झालेल्या व ज्यांच्यापासून शब्द, स्पर्श, रूप, रस व गंधरूपी विषयांचे अंकुर फुटलेले आहेत अशा त्याच्या फांद्या, खालीं आणि वरही पसरलेल्या आहेत. आणि कर्माचें रूप पावणाऱ्या त्याच्या मुळ्या खालींही मनुष्यलोकांत पसरत लांब गेल्या आहेत. " **ओ. १४३**- " मग या संसाररूपी वृक्षाच्या फांद्या खालीं येऊन, त्या भूमींत जातात, व त्यानांच पुनः डाहाळ्या फुटून त्या सरळ वर

जातात " **उमपा**-अमूप, असंख्य. **उजू**-सरळ. **ओ. १४४** " आणि ज्या डाहाळ्या खालीं पसरतात, व ज्यांचीं मुळं वरच असतात, त्यांनाच खालीं वेल व पानें फुटतात. " **डाले**-डाहाळ्या **पघले**-विस्तार पावे. **वेलुपालों**-वेल व पल्लव. **ओ. १४५**-" याप्रमाणें आम्हीं आरंभींच जें म्हटलें, तेंच, सोप्या शद्बांत सांगतो, तें ऐक. " **उपक्रम**-प्रारंभीं पहा.—ओ. ९२ **ओ. १४६**- या वृक्षाच्या मुळाशीं घट्ट बसलेल्या अज्ञानांतून महदादि तत्त्वांचे नियम वेदांच्या थोर नांवाखालीं बाहेर पडतात." यांतील ' महदादिकीं सासनें ' या कर्त्याला ' उठिति ' हें पुढील ओवींतील क्रियापद येथे अध्याहृत घेतलें पाहिजे. या संसारवृक्षाच्या बुडाशीं माया किंवा प्रकृति आहे, तीच या वृक्षाचें पहिलें मूळ आहे, असें मागें ( ओ. ८६ ) सांगितलेंच आहे. ही माया किंवा प्रकृति अज्ञानमय अथवा आभासात्मक असून, तिच्या पासूनच महत, अहंकार, मन व पंचमहाभूतें अशा अष्टधा प्रकृतीच्या तत्त्वांचें नियम निघतात व तेच मग वेदांच्या किंवा शास्त्रांच्या मोठ्या नांवानें प्रसिद्धि पावतात. मागें ओंव्या ९३-१०४ मध्यें मायेपासून अथवा प्रकृतीपासून सांख्यांची २४ तत्वें कशी निघालीं याचें विवचन आलेंच आहे. त्याचाच अनुवाद येथे पुनरपि केला आहे. **महदादिकीं**—महत्, अहंकार, बुद्धि व पंचमहाभूतें अशी अष्टधा प्रकृति. **सासनें**-नियम. पहा—ओ. १०४. तेथेही हा शद्ब आला आहे. **थोरवणे**-मोठीं पानें. वेदांच्या मोठमोठ्या पानावर. शासनें किंवा आज्ञापत्रें हीं कागदावरच निघावयाचीं. येथे ही अष्टधा प्रकृतीचीं शासनें किंवा नियम वेदांच्या अधिकारसंपन्न पानावर प्रसिद्ध होतात. वेदाच्या मोठ्या नांवावर त्यांचा अंमल चालतो. सांख्यशास्त्राप्रमाणें प्रकृति व पुरुष हीं दोनच तत्त्वें आरंभीं असून पुरुषापुढें त्रिगुणात्मक प्रकृति आपला पसारा मांडू लागली, म्हणजे महदादि २४ तत्त्वें उत्पन्न होऊन त्यांचा हा संसारवृक्ष बनतो. परंतु वेदान्तशास्त्रांत प्रकृति ही स्वतंत्र मानली नसून ती परब्रह्माचा एक अंश अशी समजली गेल्यामुळे, त्रिगुणात्मक प्रकृतीचा हा पसारा स्वतंत्र वृक्ष न मानतां, ऊर्ध्वमूल अश्वत्थाचा शाखारूप एक भाग आहे, असें समजलें गेलें आहे. या वेदांतशास्त्राच्या प्रक्रियेप्रमाणें 'पहिल्या श्लोकांत वाणलेल्या अधःशाख वृक्षाच्या फांद्या खालींच नव्हे, तर वरही पसरल्या आहेत

असें या श्लोकांत सांगून, भूतसृष्टि व त्यांच्या कर्मांचा संबंधही येथे जोडण्याचा प्रयत्न केला आहे. संसारवृक्षाचें निव्वळ सांख्यप्रणीत वर्णन पुष्कळ ठिकाणीं केलें आहे. पण गीतेच्या या अध्यायाच्या पहिल्या दोन श्लोकांत, दृश्यसृष्टिरूप वृक्ष या नात्यानें परब्रह्माचें जें वर्णन वेदांत आलें आहे, तें व सांख्यशास्त्रोक्त प्रकृतीच्या पसाऱ्याचें किंवा संसारवृक्षाचें वर्णन, यांची सांगड येथे घालण्यांत आली आहे. **ओ. १४७—** " पण प्रथम या झाडाच्या मुळापासून स्वेदज, जारज, उद्भिज व अंडज अशा चार प्रकारच्या मोठ्या फांद्या फुटतात. " या संसाररूपी वृक्षाला चार प्रकारच्या प्राणिमात्ररूपी मोठ्या शाखा निघतात. या संसारांत , अथवा विश्वांत जी जीवसृष्टि निर्माण होते, ती चार प्रकारची असते. **स्वेदज—** घामापासून उत्पन्न झालेले, ( कृमि, कीटक इ. ) **जारज—** गर्भाशयापासून झालेली सृष्टि, ( मनुष्य व चतुष्पादादिक सृष्टि ). **उद्भिज—** भूमीपासून उत्पन्न झालेली वृक्षादिक सृष्टि. **अंडज—** अंड्यातून उत्पन्न होणारी पक्ष्यादि· सृष्टि. या चार प्रकारचे प्राणी या जगांत वावरत आहेत, व त्यांचीच उत्पत्ति प्रथम येथे सांगितली आहे. **माणिज—** अंडज. अशा या चार प्रकारच्या जीवसृष्टीची वाढ कशी होते ते आणखी सांगतात. **ओ. १४८–** " या चार-प्रकारच्या जीवसृष्टीच्या एकेका अंकुरापासून ८४ लक्ष योनीरूप लहान लहान फांद्या फुटतात, व मग अशा जीवरूपी शाखेला किंवा फांदीला असंख्य फाटे फुटतात. " वर जी स्वेदज, जारज, उद्भिज व अंडज अशी चार प्रकारची प्राणिसृष्टि दिली आहे, त्यांपैकीं प्रत्येक प्रकारांतून पुनः ८४ लक्ष प्रकारचे भिन्न भिन्न प्राणी निर्माण होतात, व अशारितीनें असंख्य प्राण्यांची या जगांत उत्पत्ति होते. **चोरासी लक्ष—** चौऱ्यांशी लक्ष. मनुष्ययोनि, पशु-योनि, पक्षियोनि, अशा ८४ लक्ष योनि किंवा जन्म आहेत अशी समजूत असून, प्रत्येक प्राण्याला इतके जन्म घ्यावेच लागतात. असे एकामागून एक जन्म चुकविण्यासाठीं मनुष्यानें आत्मपरमा-त्मैक्याचें ज्ञान प्राप्त करून घेतलें पाहिजे. ८४ चा फेरा चुकविणें म्हणजेच जन्ममरणाच्या रहाटगाडग्यांतून सुटणें होय. ' पुनरपि जननं पुनरपि मरणं । पुनरपि जननीजठरे शयनम् ' हा क्रम ८४ लक्ष जन्म होईपर्यंत चाललेलाच असतो. सारांश प्राण्यांचे ८४ लक्ष इतके प्रकार आहेत, व अशा रीतीनें हा

प्राण्यांचा पसारा जगांत पसरलेला आहे. **ओ. १४९**-या संसारवृक्षाच्या ज्या सरळ शाखा आहेत, त्यांना विविधप्रकारच्या सृष्टीच्या डाहाळ्या फुटतात व त्यांनाच पुन: अनेक प्रकारच्या जातींचे आडवे फांटे ही निघतात. म्हणजे जगांत असंख्य प्राणी उत्पन्न होतात व त्यांच्या पुनः असंख्य पोटजातीही निर्माण होतात. **आडफांटती**—आडव्या फुटतात. **माळिया**—मालिका, जातींच्या मालिका. असा हा प्राण्यांच्या व त्यांच्या जातींच्या गुंतागुंतीचा प्रकार येथे वर्णिला आहे. **ओ. १५०**- येथे प्राणिमात्रांत लिंगभेद कसा निर्माण होतो तें सांगतात. " या संसारवृक्षाला ज्या नानासृष्टिरूप डाहाळ्या फुटतात, त्यांनाच स्त्री, पुरुष व नपूंसक अशीं व्यक्तिभेदाची टोकें निघून तीं अंगच्या विकाराच्या ओझ्यानें हालतात, कंपित होतात." प्राणिमात्रांत स्त्री, पुरुष व नपूंसक असे लिंगभेद पडून प्रत्येकाच्या व्यक्तिविषयक विकारामुळें, आशानिराशादि विकारामुळें, त्यांच्यांत खळबळ उडते. परस्परांमध्यें प्रत्येकाच्या आशाआकांक्षानुरूप संघर्ष उत्पन्न होऊन, जागतिक व्यापार अगर हालचाल सुरूं होते असा भाव. **टकें**—टोकें,अग्रभाग. **आंगिक**— आंगच्या. **आंदोलति**—कंपित होतात.

**ओ. १५१**— " ज्याप्रमाणें वर्षाकालीं आकाशांत मेघ पल्लवित होतात. त्याचप्रमाणें अज्ञानामुळें अनेक प्रकारची शरीरें विस्तार पावतात." **पल्हैजे**-पल्लवित केलें जातें. **आकारजात**— नामरूपात्मक जग. **अज्ञानें** — जग खरं आहे अशा अज्ञानामुळें. **वलि जाए**--विस्तार पावे. हे सर्व जग खरं आहे असें आपण मानतो, म्हणून त्याचें अस्तित्व भासतें. तें मिथ्या आहे असें ज्ञान झाल्यावर, त्याचें अस्तित्व आपोआपच नाहींसें होतें. **ओ १५२**- " मग गुणांच्या खळबळीचें वारें सुटल्यावर संसारवृक्षाच्या या प्राणिरूप शाखा आपल्याच भारानें लवून परस्परांत अडकतात." प्रकृति, सत्व, रज, तम, अशा त्रिगुणांनीं युक्त असल्यानें, तिच्यापासून उत्पन्न झालेली प्राणिरूप-सृष्टि त्रिगुणात्मकच असणार. याप्रमाणें या सृष्टींतले, सात्विक राजस व तामस प्राणी देखील आपापल्या गुणांच्या प्रकर्षांत परस्परांशी संघर्ष पावतात. **शाखांचेनि**-प्राणीरूप फांद्यांच्या. **आंगभरें**—आंगच्या भारानें. प्रत्येक प्राण्यामध्यें असलेल्या त्या त्या गुणप्रकर्षानें, त्या प्राण्यांत संघर्ष उत्पन्न होतो.

**गुणक्षोभ**—सत्व, रज, तम, या तीन गुणांचा क्षोभ, प्रकर्ष. येथे पहिल्यापासूनच वृक्षाची परिभाषा वापरलेली असल्यामुळें, प्राण्यावर शाखांचें, व गुणक्षोभावर वाऱ्याचें रूपक कल्पिलें आहे. **ओ. १५३**—ते त्रिगुण अतिशय वाढल्यामुळें, या उर्ध्वमूल वृक्षास ऊर्ध्व ( वर ), मध्यें व अधस् ( खालीं ) अशा तीन भेदांचे फांटे फुटतात. शिवाय हे तिन्ही भेदही अनुक्रमें सत्व, रज, तम या गुणावरच अवलंबून आहेत. **तिहीं ठांइं**— तीन ठिकाणीं. **तेणें** गुणक्षोभामुळें. **झडझडाटें**— सोसाट्याच्या वाऱ्यानें. **ऊर्ध्वमूल**— ज्याचें मूळ वर आहे, असा ' अश्वत्थ ' वृक्ष. **ओ. १५४**— यापैकीं रजोगुणाची झुळूक सुटून तो अधिक जोरानें वाहूं लागल्यावर मनुष्यजातिरूपी शाखा थोरावते. " सत्व, रज व तम यापैकीं रजोगुणाचें आधिक्य झालें असतां, मनुष्यजातिरूपी शाखा वाढतात, मानवसृष्टि वृद्धि पावते असा अर्थ. विविध जीवसृष्टीच्या उत्पत्तीची उपपत्ति सांगतांना त्यापैकीं मानवसृष्टीला कोणत्या गुणाचें आधिक्य कारण होतें, याचेंच विवेचन येथें केलें आहे. **झडाडितां**— झड झड आवाज करीत वाहत असतां. **आगालिका**- अधिक. **ओ. १५५**- या मानवसृष्टीचेच पुनः ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र असे वर्ग कसे पडतात तें वृक्षाच्याच रूपकांत सांगतात. " संसारवृक्षाच्या वर ज्या मनुष्यशाखा वर्णिल्या, त्यांनाच वर किंवा खालीं नव्हे तर मध्यभागींच दाटीवाटीनें चातुर्वर्ण्याच्या चार फांद्या आडव्या फुटतात." मनुष्यांचे, ब्राम्हण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र असे जे चार वर्ग पडतात, ते अखिल ब्रम्हांडाच्या स्वर्ग, मृत्यु, पाताळ या भागांपैकीं मध्यभागच्या मृत्युलोकांतच पडत असल्यानें, संसारवृक्षाच्या या फांद्या वर किंवा खालीं जात नाहींत, तर मध्येंच फुटतात असें म्हटलें आहे. मानवांचेंच हे चार पोट वर्ग पडत असल्यानें, त्यांना " गर्दीनें आडव्या तिडव्या फांद्या फुटतात " असें म्हणावें लागलें आहे. सारांश मानवसृष्टि निर्माण होऊन गुणकर्मविभागशः त्यांचीं ब्राम्हण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र अशा चार वर्णांत विभागणी होते, असाच येथे भावार्थ आहे. **माझारि**—मध्यें. **चतुर्वर्णांचा**—ब्राम्हण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र या चार जातींच्या. **कोंदाकोंदि**—दाटीने, खेचाखेचीनें. **ओ. १५६**—" त्या फांद्यांनाच पुनः विधिनिषेधरूपी पानाबरोबरच वेदवाक्यांची नवीन पालवी फुटून, ती त्या

वृक्षाला शोभा आणते." वर जे मनुष्यांचे चार वर्ग सांगितले, त्यांच्या आचरणाचे नियम जे श्रुतिस्मृतींत दिले आहेत, त्यांना येथे वरील शाखांची पालवी असें कल्पिलें आहे. मानवजात व त्यांचें चातुर्वर्ण्य, या जर संसारवृक्षाच्या मध्यंतरींच्या फांद्या, तर त्या फांद्यांना ही श्रुतिस्मृतिप्रणीत आचारनियमांची पानें व पालवी फुटतें, असा हा रूपकाचा एकंदरीनें प्रकार आहे. **विधिनिषेधीं**—कसे वागावे हे सांगणारे जे नियम त्यांना विधि, व कसें वागूं नये हें सांगणारे जे नियम त्यांना निषेध असें म्हणतात. मनु अगर याज्ञवल्क्यस्मृतीसारख्या ग्रंथांत आचाराचे जे नियम दिले आहेत, ते असेच विधिनिषेधात्मक आहेत. अशा नियमांना या मानवजातींच्या शाखांचीं पानें म्हणणें सार्थच आहे. **वेदवाक्यांचें**—वेदांत विशेषतः ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलांत, विराट पुरुषाचें वर्णन करतांना ' ब्राह्मणोस्य मुखमासीद्बाहू राजन्यः कृतः " इत्यादि जें त्याचे अवयव दिले आहेत, त्यांत देखील या चातुर्वर्ण्यांतील चार वर्गांची अधरोत्तरव्यक्तीच दर्शविली आहे. त्यामुळें ऋग्वेदाचे असे भाग, या मनुष्यरूपी शाखांची अभिनव पालवी ठरत. तात्पर्य या जगांत मानवजात निर्माण होऊन तिची चार वर्णांत विभागणी होते व त्यांच्या आचारांचे श्रुतिस्मृतिप्रणीत विधिनिषेधात्मक नियमही केले जातात, एवढेंच प्रतिपादण्याचा येथे आशय आहे. **बरव**—शोभा. अशा विधिनिषेधात्मक नियमांना मग स्मृतिश्रुतिपुराणोक्त मंत्रांची ऐट येते.
**ओ. १५७**—" आणि अर्थ व काम यांचा विस्तार होऊन त्यांना मग इहलोकीच्या क्षणिक सुखप्रसंगांचे कोंभ फुटतात. " वर मानवजात व त्यांच्या चार जाती यांची उत्पत्ति सांगितल्यावर तिच्या मनांत अर्थसंपादनाचा व कामविकारांचा प्रसार होतो, व त्यामुळें मनुष्याला तात्पुरत्या उपभोगाचे क्षणिक प्रसंग येतात, असा जगाच्या मानवव्यापाराचा व्यापच येथे वर्णन केला आहे. वास्तविक धर्म अर्थ, काम व मोक्ष असे मनुष्याला कर्तव्यप्रवण करणारे चार अर्थ आहेत. पण मृत्युलोकांत मानव हे या चतुर्वर्गापैकीं अर्थ व काम यांकडेच आपलें सारें लक्ष देतात व त्यामुळें क्षणिक सुखाचे व उपभोगाचे जे प्रसंग त्यांना अनुभवावयास मिळतात, तेच त्यांना जन्माचें सारसर्वस्व असें वाटतात. माणसं धर्माच्या किंवा मोक्षाच्या पाठीमागें न लागतां, अर्थाच्या व कामाच्या मागें धांव घेतात व त्यामुळें मिळणाऱ्या तात्पुरत्या सुखांना भुलतात, अशी ही मानवी व्यापाराची इहलोकांतील

रीत आहे. **अग्रवणें**-टोकाचीं पानें. झाडाच्या फांद्याच्या टोकाला येणारीं पानें, शेंडे. **इहभोगाचीं**-इहलोकांतील, मृत्युलोकांतील उपभोगाची, सुखाचीं. **पदांतरें**—अन्यस्थानें. सुखाचीं निरनिराळीं स्थळें. स्वर्गादि स्थानें, यज्ञासारखीं कृत्यें करून स्वर्गप्राप्ति करून घ्यावी अशी मनुष्यांना हाव सुटते. **ओ. १५८**—" त्यानंतर प्रवृत्तिमार्ग वाढावा या मानवांच्या लोभामुळें, या जगांत कितीतरी चांगल्या व वाईट कर्माचे आणखी किती अंकुर या मनुष्यजातीशाखेला फुटतात, ते कांहीं समजत नाहीं! " जगांत मानवजात निर्माण झाल्यावर, तिला आपण कांहीं तरी केले पाहिजे अशी बुद्धि उत्पन्न झाली. आणि या बुद्धीमुळेंच तिच्या हातून अनेक चांगल्या-वाईट घटना, कर्में, होऊं लागलीं. मनुष्यांच्या हातून विविधप्रकारची बरीं वाईट कर्में होतात, व याला त्यांची उपजत कर्मप्रवृत्तीच कारणीभूत होते. असा हा कर्मविपाकच येथें कथन केला आहे. **प्रवृत्तिचेनि**—प्रवृत्तिमार्गाच्या, कर्ममार्गाच्या. **खांखरैजति**-उत्पन्न होतात. **शुभाशुभें**—मंगल अमंगल, बरींवाईट कर्में. **खांबें**—अंकुर. **ओ. १५९**—या ओंवींत पूर्वकर्मांचा भोग संपल्यानंतर जुने देह कसे पडतात, व नवीन कर्मांमुळें मानवांना पुनः नवे देह कसे प्राप्त होतात, ती उपपत्तीच दिली आहे. " पूर्वकर्मांचे भोग संपले कीं, तीं कर्में भोगलेल्या देहाचीं शुष्ककाष्टें, गळून पडतात; तों पुनः नवीन कर्मांमुळें नवीन देहांची वाढ होते. प्राण्याला त्याच्या कर्माप्रमाणें जन्म मिळतो. या कर्माचा भोग जसजसा संपेल, तसतसा एक जन्म संपून त्याला पुढचा जन्म मिळतो. अशा या चक्रनेमिक्रमांन मागील जन्मातील कर्मांचा भोग या जन्मांत, या जन्मांतील कर्माचा भोग पुढील जन्मांत, अशा हप्त्यानें मनुष्याला ही कृतकर्मांचीं फलें भोगावीं लागतात. त्यामुळें प्रत्येक माणसाला संचित, ( मागील जन्मांत केलेलें, ) प्रारब्ध ( चालू जन्मात होत असलेलें ) व क्रियमाण ( पुढील जन्मीं होणार असलेलें ). अशीं कर्में करावीच लागतात. मागील जन्मांत जी कर्में मनुष्यानें केलेलीं असतात, ती भोगण्यासाठींच हा चालू जन्म त्याला प्राप्त होतो, व ती कर्में भोगल्यावरच हा देह पडतो. मग पुनः या जन्मीं या देहानें त्यानें केलेलीं कर्में भोगण्यासाठीं पुनः नवा जन्म, नवा देह त्याला घ्यावा लागतो. अशी कर्माची व देहाची सांखळी चालूच राहते. **मागिले**-मागील जन्मांतील कर्मांचे, पूर्वकर्मांचे. **बुडखुले**—

शुष्ककाष्टें. **वाढु पेलें**— वृद्धि होते. **नवेया देहांची**-- कृतकर्माप्रमाणें मिळणाऱ्या नव्या शरीरांची. **ओ. १६०**— आणि वर सांगितल्याप्रमाणें जे नवे देह वृद्धि पावतात, त्यानाच सुंदर व शोभिवंत रंगांचे शद्वादि पंचविषयरूपी नवे पल्लव नित्य येतात. कृतकर्माप्रमाणें नवीन जन्म व नवा देह प्राप्त झाला कीं, मग त्याला शब्द, स्पर्श रूप, रस व गंध असें पांच विषय संलग्न होतातच. देह म्हटला कीं, हे पांच गुण प्राप्त व्हावयाचेच; असा हा पंच विषयात्मक देह प्राण्याला कृतकर्मानुरूप नवीन नवीन मिळत जातो. **सुहावें**- आल्हादकारक, मधुर. **हवांव**-शोभेनें, स्वाभाविक रंगाच्या शोभेनें. **नींच**— नित्य. **ओवी-१६१**-" याप्रमाणें, रजोगुणाचा सोसाट्याचा वारा सुटला असतां, मनुष्यरूपी ज्या फांद्यांचे जे समुदाय वाढतात, त्यानांच मनुष्यलोक, किंवा मृत्युलोक असे म्हणतात." सत्व, रज व तम अशा त्रिगुणांनीं युक्त असणाऱ्या प्रकृतींत ज्यावेळीं रजोगुणाचे आधिक्य होतें, त्यावेळीं तिच्यांतून मानवसृष्टि उत्पन्न होते, असे सांख्यांचें मत आहे. रजोगुणाच्या प्रकर्षानें संसाररूपी वृक्षाला मनुष्यशाखा येतात, याचाच अर्थ असा कीं, रजोगुणामुळेंच मानवसृष्टि उत्पन्न होते. **मांदोडे**—जुंबाड, **ओ. १६२**— त्याचप्रमाणें हा रजोगुणरूपी वारा क्षणभर थांबल्यावर, मग तमोगुणरूपी वारा सपाट्यानें वाहूं लागतो. मागील ओवींत मनुष्यसृष्टीला रजोगुण हा आधार आहे हें सांगितलें, यापुढें तमोगुण हा मानवांच्या कुकर्मांना, पापांना कसा कारणीभूत होतो तें विशद करतात. **वोसरा धरी**—कमी होतो, वोहटतो. **नावेक**-क्षणभर. **तमाचा**-तमोगुणाचा. **वाजों लागे**—वाहूं लागतो, सुरू होतो. पहा—' वाजीतया वायूतें जरी होकारी ।'-ज्ञानेश्वरी. ९।१२५. " अहंकृतवायो वाजतां थोरू । अवघाचि खवळे भवसागरू ।'-एकनाथी भागवत २।९५. **ओ. १६३**—" असा तमोगुणांचा प्रचंड झंझावात सुटल्यावर या संसारवृक्षाच्या मनुष्यरूपी शाखांना वाईट वासनांमुळें खालीं दुष्ट कर्मांच्या डाहाळ्या फुटतात." तमोगुणामुळें माणसांना वाईट वासना होऊन ते मग दुष्कृत्यें आचरूं लागतात. वाईट वासना उत्पन्न झाल्या कीं, हांतून पापाचरण होण्यास वेळ काय? **डालुका**-डाहाळ्या. **ओ. १६४**—" अप्रवृत्तीच्या बळकट व सरळ अशा आणखी लहान लहान डाहाळ्या फुटून त्यानांच पुन: प्रमादाची, पापाचरणाची पानें, पालवी व डाहाळ्या निघ-

तात. **अप्रवृत्तिचें**-वाईट मार्गाचे. **खनुवालें**-कठिण. **फोंक**—लहान फांद्या. वाईट मार्गाच्या आचरणानें प्रमादिंचा, पापाचरणाचा कसा सुळसुळाट होतो, तें येथें विशद केलें आहे. रजोगुणाने मानवसृष्टि उत्पन्न होते, तर तमोगुणाचा प्रादुर्भाव झाला असतां, तेथ नचि वासनामुळें वाईट कर्मे करण्यास माणसें प्रवृत्त होतात, एवढेंच सांगण्याचा येथें मथितार्थ आहे. **ओ. १६५**--यानंतर या संसारवृक्षाच्या मनुष्यशाखेला तमोगुणानें याप्रमाणें कुकर्माच्या डाहाळ्या व पानें फुटल्यानंतर पुनः येथेही या कुकर्माच्या नियमनासाठीं श्रुतींचें विधिनिषेधात्मक नियम केले जातात, असें सांगतात. " ऋग्वेद, यजुर्वेद, व सामवेद या तीन वेदांत कर्मासंबंधीं जे विधिनिषेधात्मक नियम दिले आहेत, त्यांचा पाला या कुकर्माच्या डाहाळ्यांच्या टोकावर शब्द करूं लागतो, घुमूं लागतो. " कुकर्माचें बंड जगांत माजूं लागले कीं, श्रुतिस्मृतींसारख्या प्रमाणभूत ग्रंथद्वारा अमुक कर्मे करणें चांगलें, अमुक करणें वाईट असें सांगणारे नियम घालून द्यावे लागतात, व अशा नियमांचा बोलबाला सर्वत्र होतो. **ऋग्यजुसामें**-ऋग्वेद, यजुर्वेद व सामवेव. **घुमे**-शब्द करतो. **टकेयांवरि**-टोंकावर. वरच्या ओंवींत सांगितलेल्या प्रमादाच्या डाहाळ्यांच्या टोकावर. **ओ. १६६**—शिवाय जारणमारण-विधीसारखे दुसऱ्याचा घात करणारे नियम सांगणाऱ्या अथर्ववेदादि ग्रंथांच्या वासनावेलीही आपलीं पानें पसरूं लागतात. " माणसं वाईट आचरण करींत असतांना, दुसऱ्याचा घात करण्याचीही त्यांना इच्छा होते. हा घात सहज घडवून आणण्यासाठीं मग जारणमारणासारख्या चेटुकांचे विधि अस्तित्वांत येतात. ऋग्वेदादि वर सांगितलेल्या तीन वेदांत आचरणाचे विधिनिषेधात्मक नियम दिलेले असतात, तर अथर्ववेदासारखे नंतर रचलेले वेदग्रंथ जारणमारणासारख्या दुसऱ्याचा घात करण्याच्या वासनेंतूनच निर्माण होतात. वाईट कर्मे करण्याची बुद्धि झाली कीं, ती दुसऱ्याचाही घात करण्यापर्यंत कशी मजल मारते तेंच येथे प्रतिपादन केलें आहे. **अभिचार**— जारणमारण, दुसऱ्याला दुखापत किंवा नाश करणें. पहा– " या लागीं रिघे अभिचारीं । ते ममता खरी तामस ।'-- एकनाथी भागवत- २५। १३२. **आगम**- अथर्ववेद हा चौथा वेद असून याचीं २० कांडें आहेत. यांत जारणमारण यांसंबंधी मंत्र आहेत. **परमार**— दुस-

ऱ्याचा घात करणारे. अशा वेदांच्या वासनारूपी वेली आपल्या पानानीं पसरतात. अशा जारणमारण मंत्रांचा फैलाव होतो.

ओ. १६७-अशा कुकर्मांच्या डाहाळयांचें खालचें बुंधे जसजसे मोठे होत जातात, तसतशा त्यांतून आणखी प्राण्यांच्या शाखा झपाट्यानें वाढूं लागतात. **अकर्मांची**—कुकर्मांचे. **तळबुडे**-खालचे बुंधे. **थोरांडे**—मोठे. **जन्मशाखा**—प्राणिमात्रांच्या फांद्या. **घांवा घेति**-जोरानें वाढतात. माणसांच्या हांतून अधिकाधिक वाईट कर्में, पापाचरण होऊं लागलें कीं, मरणोत्तर त्यांना जे नवीन जन्म मिळतात, तेही तसेच नीच किंवा निकृष्ट प्रकारचेच मिळतात, असें हें दुष्कृत्याचें अंतिम फल आहे. वाईट कृत्यांचें पर्यवसान वाईट जन्मांत, योनींत होतें, असा हा कर्मविपाकाचा विशेष येथे कथन केला आहे. **जन्मशाखा**—हीन योनिरूप फांद्या. मूळ संसारतरूला रजोगुणामुळें साध्या मनुष्यशाखा, तर पुढें तमोगुणामुळें कुकर्मांच्या द्वारा नीच प्राण्यांच्या शाखा कशा फुटतात, त्यांचेच पुढें वर्णन केलें आहे. **ओ १६८**—वरच्या ओंवीत ज्या जन्मशाखा वाढतात म्हणून सांगितलें, त्यांचाच उल्लेख करतात. " त्या जन्मशाखांच्या फांद्याचाच एक असा, चांडालादि नीच जातींचा फांटा फुटतो व तो कर्मभ्रष्टांना भुलवून आपल्या जाळ्यांत आडकवितो. " माणसं, कोणत्या तरी आशेला भुलून वाईट कृत्यें करतांत व अशीं वाईट कृत्यें केलेली माणसं, मग मरणोत्तर चांडालासारख्या हीन जातींत जन्म घेतात. कर्मभ्रष्टांना अस्पृश्यासारख्या नीच जातींत जन्म मिळतो असा भाव. **भुलौनियां**-भुलवून, भुरळ पाडून. **जाल पडों लागे**—जाळ्यांत पाडूं लागतात. **कर्मभ्रष्टा**—कर्मानें भ्रष्ट झालेले असे.

ओ. १६९-अशा कर्मभ्रष्टांना आणखी पशु, पक्षी व जीवजिवाणूंचें जन्म कसे मिळतात तें सांगतात. " अकर्मानें या ज्या जन्मशाखा झपाट्यानें वाढतात, त्यानांच आणखी पशु, पक्षी, विंचू सर्प इत्यादि प्राण्यांच्या आडशाखांचे समुदाय फुटून तो वाढतात. " कुकर्मांमुळें कांहींना चांडालांचा जन्म मिळतो तर त्याहूनही जे कर्मभ्रष्ट आहेत, त्यांना पशु, पक्षी, डुक्कर, वाघ, विंचू व सर्प असे हीन जन्म प्राप्त होतात. **आडशाखानिकर**—आडव्या फांद्याचे समुदाय. संसारवृक्षाच्या मनुष्यशाखा, चांडालशाखा या कमी अधिक मुख्य मानल्या,

तर पशुपक्ष्यादिकांच्या या शाखा आडव्या, दुय्यमच मानल्या आहेत. **विखार**--सर्प. **वृश्चिक**-विंचू. **ओ. १७०**-" हे अर्जुना ! याप्रमाणें या संसारवृक्षाला वर पासून खालींपर्यंत सर्वांगाला नित्य नवीन नवीन फांद्या फुटून त्यांनाच नरकभो - रूपीं फळें येतात. " आतापर्यंत या संसारवृक्षाच्या खालच्या फांद्यांचें जें [illegible] करण्यांत आलें आहे, त्यांत रजोगुणामुळें मनुष्यशाखा वाढल्यानंतर, तमोगुणा-मुळें दुष्कृत्यें वाढून, चांडालादि हिनजातींच्या शाखा व पशुपक्ष्यादि हीन प्राण्यां च्या शाखा कशा वर्द्धिगत होतात, याची उपपत्ति दिली आहे. यानंतर अशा हीन पशुयोनींत जन्म मिळाल्याचा परिपाक म्हणजे नरकवासाची प्राप्ति होय. **यावा**— प्राप्ति. अशाप्रकारची हीन पशुयोनि मिळणें म्हणजे नरकवासच होय. **ओ. १७१**—" आणि वाईट कृत्यें करण्याची संवय लागली असतां, हिंसेचे निरनिराळे विषय पुढें येतात व असे अंकुर जन्मभर वाढतच असतात. **घुरूं धरी**-पुढें येतात. **अगारी**-अंकुर. माणसं दुष्कृत्यें करूं लागलीं कीं, दुसऱ्याचा नाश करण्याचीं साधनें, प्रसंग व विषय त्यांना सहज सांपडूं शकतात. अशाप्रकारें या हिंसाविषयांचे अंकुर जन्मभर वाढतच असतात. एकदा हिंसेची संवय लागली कीं, जन्मभर ती वाढतच जाते. **ओ. १७२**—जन्मभर असे हिंसाविषयाचे अंकुर वाढल्यावर, त्यांच्याच तरु, तृण, लोह, पाखाण-रूपी फांद्या बनतात, व त्यांना मग तसलींच फळें येतात. हिंसा करण्याची संवय लागलेल्या प्राण्यांना झाडें, गवत, लोखंड, पाषाण अशा निर्जीव, स्थावर वस्तूंचे जन्म मिळतात असा भाव. **ओ. १७३**—" अर्जुना ! मनुष्यशाखांसारख्या सजीव शाखापासून, पाषाणासारख्या स्थावर, अथवा निर्जीव शाखांपर्यंत, या संसारवृक्षाच्या खालच्या फांद्यांचीच वाढ झाली आहे. मनुष्यापासून पाषाणासारख्या स्थावर पदार्थांपर्यंत हा संसार खालीं सारखा वाढतच आहे जगांतील स्थावरजंगमात्मक वस्तूंची उत्पत्ति सांगतांना माणसा-पासून खालीं पाषाणापर्यंत, कर्मानुरूप कसा जन्म मिळतो, हेंच दाखविण्याचा येथे प्रमुख उद्देश दिसतो. **ओ. १७४**-" म्हणून मनुष्यरूपी खांद्याच खालीं जाणाऱ्या खांद्याचीं मुळें असून, यांच्यापासूनच हा संसारवृक्ष वाढतो. " संसाराला किंवा जगाला खरा प्रारंभ मानवसृष्टीपासुनच होत असून, तेथूनच पुढें पशु, पक्षी, कीटक व खनिज द्रव्यें यांची उत्पत्ति झाली आहे. नंतरची

ही सर्व सृष्टि मानवासाठींच असल्यामुळें, या सर्व स्थावरजंगम सृष्टीचें मूळ मानव असें मानण्यांत आलें आहे. **पथौनि**—मनुष्यशाखांपासून. **पघले**—विस्तार पावतो. **ओ. १७**—" येन्हवीं वरच्या शाखांचें मूळ जर मुख्यत्वें-करून पाहिलें, तर वरच्या व खालच्या फांद्याच्या मध्यभागीं असणाऱ्या शाखा म्हणजे या मनुष्यशाखा होत. " या संसाररूपी अश्वत्थ वृक्षाच्या मधल्या शाखा म्हणजे मनुष्य शाखा होत. असें सांगतांना वास्तविक या त्रिगुणात्मक संसाराचा मधला व खालचा भाग अनुक्रम रजोगुण व तमोगुण यांनीं व्यापला असून, वरचा भाग सत्त्वगुणात्मक अत एव देवगंधर्वशाखांचा किंवा स्वर्गलोकाचा द्योतक आहे असें म्हणण्याचाच येथे रोख आहे. **मुदल**—मुख्यत्वेंकरून. **ओ. १७६**—पण या मधल्या मनुष्यशाखेच्या खालीं तमोगुणानें व दुष्कृत्यांनीं वाढलेल्या फांद्या, तर वर सत्त्वगुणानें व सत्कृत्यांनीं वाढलेल्या फांद्या, अशा रितीने संसारवृक्षाच्या या फांद्या खाली व वर वाढतात. मध्यभागीं रजोगुणाची मनुष्यशाखा, व त्याच्याखालीं तमोगुणी, दुष्कृत्यात्मक खालच्या शाखा, तर या मधल्या मनुष्य-शाखांवर सत्त्वगुणी सुकृतात्मक वरच्या शाखा, अशी या संसारवृक्षाची वाढ किंवा व्यवस्था आहे. **ओ. १७७**—' आणि वेदत्रयीचीं पानें या मनुष्यशाखाशिवाय इतरांना लागतच नाहींत. कारण त्यांचीं अंमलबजावणी करायला मनुष्याशि-वाय दुसरा विषयच नाहीं. **वेदत्रयी**-- ऋग्वेद, यजुर्वेद व सामवेद. यांतील विधिनिषेधात्मक नियम माणसाशिवाय दुसऱ्या कोणाला लागूंच करतां येणार नाहींत. मनुष्य हा बुद्धिवान् प्राणी असल्यामुळें, वेदांच्यां विधिनिषेधात्मक आचारनियमांची अंमलबजावणी अथवा अवलंबन त्याच्यावांचून दुसऱ्या पशुपक्ष्यादि जातींकडून होणार नाही. म्हणून वैदिक नियमांना मनुष्यांशिवाय दुसरा विषय नाहीं. **विधाना**—कर्माच्या अनुष्ठानाला. **विषो**—विषय, आधार. **ओ १७८**—"म्हणून मनुष्यरूपी खांदी ही जरी संसाररूपी अश्वत्थाच्या वरच्या मुळाहून खाली वाढत आली आहे, तरी कर्म-वृद्धीच्या शाखेला हीच ( मनुष्यशाखा ) मूळ होऊन बसली आहे. मनुष्य-शाखेपासुनच कर्मवृद्धीची शाखा वाढली, याचा अर्थ इतकाच कीं, मानवसृष्टी पासुनच कर्मांना खरें अस्तित्व प्राप्त झालें. मनुष्यें नसतीच तर कर्में करणार

कोण व त्यांचीं बरीं वाईट फले तरी भोगणार कोण ? म्हणून मानवसृष्टि हिच सर्वांचें मुळ होय. **तनु मानुषा**-मानव शरीराची शाखा. **ओ. १७९**- " आणि दुसऱ्या झाडांची तरी हीच रीत कीं, फांद्या वाढत्या म्हणजे मुळ घट्ट होतें व मुळे जसजशीं बळकट होतात तसतसा त्यांच्या फांद्यांचा विस्तार वाढतो. **पैसु आथि**— विस्तार होतो. मनुष्यशाखा जरी या संसारवृक्षाच्या वरच्या मुळापासून फुटल्या असल्या, तरी या मनुष्यशाखा, कर्मवृद्धीच्या, कर्म विपाकाच्या मूळ होत, हें वर ओ.१७८ मध्यें प्रतिपादलें आहे. आतां पुढील ओवींत या मनुष्यशाखारूप मुळापासून कर्मे, व पुनः कर्मापासून देह व या देहापासून पुनरपि कर्मे, असें हे रहाटगाडगे करें निर्माण होतें, तें वर्णन करतात. **ओ. १८०**— " त्याप्रमाणेच ( इतर वृक्षाप्रमाणेच ) या मनुष्यशरीराची गोष्ट असून, कर्मांमुळेंच देह प्राप्त होऊन संसार सुरु होतो, व देह आहे तोपर्यंत कर्मांच्या व्यापाराला नाहीं म्हणतां येत नाहीं तात्पर्य कर्मामुळें देह व देहामुळें कर्म, असा चक्रारपंक्तिक्रम सारखा चालू असतो. **नां म्हणों नेए**-नाहीं म्हणतां येणार नाहीं. देह आहे, तर कर्मांचा व्यापार चुकवितां येणार नाहीं **ओ १८१** -' म्हणूनच मनुष्य देह ही कर्मरूपी दुसऱ्या फांद्यांचीं मूळें होत, असें निश्चितपणानें भगवंतानीं मागें सांगितलेंच आहे. भगवद्गीतेच्या तिसऱ्या अध्यायांत कर्मयोगाचे विवेचन करतांना, ' नहि कश्चित्क्षणमपि जातु तिष्ठत्यकर्मकृत ' असे श्रीकृष्णानीं अर्जुनाला जें निक्षून सांगितलें आहे, त्याचाच ज्ञानेश्वरांनीं येथें उल्लेख केला आहे **इयें मूळें**- मनुष्यदेह हींच कर्मांचीं मुळं होतात. मनुष्य-देह जरी संसारवृक्षाच्या शाखा म्हणून असल्या, तरी या शाखाच कर्मरूपी इतर शाखांची मुळे होत. मनुष्यशाखेपासुनच कर्मांच्या शाखा फुटतात असा अर्थ. **ओ, १८२**— अशा रितीनें तमोगुणाचे वादळ संपल्यावर सत्वगुणाची वाहुटळ कशी उठते तें सांगतात. आतापर्यंत त्रिगुणात्मक प्रकृतीच्या रज व तम या दोन गुणांचा प्रभाव वर्णन केला. आतां येथून सत्वगुणामुळे या संसारवृक्षाला कोण-कोणत्या शाखा व कसली कसलीं फलें येतात, त्याचे विवेचन येते. वर वर्णन केलेलें तमोगुणाचें भयंकर वादळ थांबल्यावर, मग सत्वगुणाची जोराची वाहुटळ सुटते. एका युगामागून दुसऱ्याचें, याप्रमाणे परिवर्तन घडतें. **वाउधाण**-वादळ. **सत्राण**—जोराची, बळकट. **वाहुटळ**— हा लहान वादळ या अर्थी शब्द

येथें वापरला आहे. **ओ. १८३**—" तेव्हां मात्र या मनुष्याकाररूपी मुळाला सुवासनारूपी मोड फुटून, त्याला सुकृतांचे कोंभ येतात. " सत्वगुणाचा प्रादुर्भाव झाल्यावर वर सांगितलेल्या मनुष्याकार मुळांना जे सुवासनांचे मोड व सुकृतांचे कोंभ फुटतात म्हणून वर्णन केलें, त्याचा अर्थ इतकाच कीं, सत्त्वगुणामुळें माणसांना चांगल्या वासना सुचून त्यांना सत्कर्म करण्याची प्रवृत्ति होते. माणसं सदाचारसंपन्न होतात असा अर्थ. वर तमोगुणाच्या प्रभावानें माणसं जशी दुराचारी होतात, त्याच्या उलट येथे सत्वगुणाच्या सामर्थ्यानें तीं सदाचारी होऊं लागतात, असा हा गुणागुणांतला फरक आहे. **आरा**-अंकुर, मोड. **ओ.१८४**-यानंतर हळुहळु प्रादुर्भूत होणाऱ्या ज्ञानामुळें, बुद्धिकौशल्याच्या तीक्ष्ण अशा डिऱ्या लवकरच जोराजोरानें येऊं लागतात. प्रथमपासुनच येथें वृक्षाचें हें रूपक कल्पिल्यामुळें त्याला अनुरूप अशी आर, अंकुर, कोंभ, डिऱ्या अशी वृक्षवृद्धीची परिभाषा येथेंही वापरली आहे. माणसं सदाचारी बनली कीं, त्यांच्या मनांत ज्ञानाचा खऱ्या खोट्या गोष्टीं जाणण्याच्या सामर्थ्याचा उदय होतो- अशा ज्ञानामुळें मग त्यांच्या ठिकाणीं बुद्धिकौशल्याचा प्रकर्ष होतो. सत्प्रवृत्तीमागून सदाचार, सदाचारानंतर ज्ञान व ज्ञानापासून सद्बुद्धि अशा क्रमानें सत्वगुणाचा हा प्रभाव जाणवूं लागतो. **उकलतेन उन्मेखें**—उदय पावणाऱ्या ज्ञानानं. **प्रज्ञाकुशलतेचां डिऱ्या**—बुद्धिकौशल्याचे अंकुर. बुद्धीचा प्रकर्ष होऊं लागतो. **तिखें** -तीक्ष्ण. **बांबलजौनि**-( बांबळजणें = विस्तार पावणें, ). विस्तारून. **ओ. १८५**-वर ओ. १८३ मध्ये सुवासना कशा उत्पन्न होतात तें सांगितले. येथें सद्बुद्धींतूनच श्रद्धा व सत्प्रवृत्ति कशी निर्माण होतें, तेंच प्रतिपादलें आहे " बुद्धिरूपीं रस ज्यांत अंतर्गत आहे असे, व श्रद्धारूप पानांनीं सुशोभित असे सवृत्तीचे कोंभ त्या मनुष्याकार मुळांतून सरळ निघूं लागतात. सद्बुद्धि, श्रद्धा, सत्प्रवृत्ति या सात्विक भावना आहेत, व सत्वगुणाच्या राज्यांतच अशाचा उत्कर्ष होतो. **सगर्भ**—ज्यांच्यांत बुद्धीचा रस वाहत आहे. बुद्धीच्या रसानें रसरशीत. **आस्थापात्रिं**— श्रद्धेच्या पानांनीं. **सयांव**— सुशोभित. **सद्वृत्ती**— दया, क्षमा, त्याग या सद्वृत्ति होत. अशांचा उगम होऊं लागतो. **ओ. १८६**— " या सद्वृत्तींच्या कोंभांतून व

सदाचाराचे टोकदार अंकुर फुटतात, व मग तो वृक्ष वेदरूपी पक्ष्यांच्या किलबिलाटानें दुमदुमून जातो." सदाचार बळावला कीं, मग वेद-उपनिषदासारख्या सदाचारांचा गौरव करणाऱ्या ग्रंथांची उभारणी होते, व अशा ग्रंथांतील सदाचारविषयक शिकवणुकीचाच सर्वत्र बोलबाला व फैलाव होता. **टक**-- अंकुर. **बहुवसा**— पुष्कळ. **घोसां**— घोषानें. वेदांचा घोष तेथे दुमदुमूं लागतो. **ओ. १८७**— यापुढें सत्वगुणाखालीं या संसारवृक्षाला कसलीं पानें येतात तें सांगतात. "चांगल्या लोकांच्या आगमनप्रसंगीं करण्याच्या विधींचीं व अनेप्रकारच्या यज्ञयागांचीं पानावर पानें येऊन तीं त्या वृक्षाला घेरून टाकतात." सत्वगुणाच्या साम्राज्यांत चांगल्या वैदिक कर्माचा प्रसार होतो. शिष्ट म्हणजे वेदशास्त्रसंपन्न अशा माणसांच्या आगमनप्रसंगीं करावयाचे 'मधुपर्क' विधीसारखे विधी. व इतर पुत्रकामेष्टि, प्राजापत्य, यांसारखे याज्ञयागही मग सर्वत्र केले जातात. **शिष्टागमनविधानें**— शिष्ट म्हणजे मोठ्या ज्ञानसंपन्न अथवा शास्त्रसंपन्न अशा माणसांच्या आगमनप्रसंगीं 'मधुपर्क' विधीसारखे विधी. यजमानानें ऋत्विज, साधु इत्यादींचें आदरातिथ्य करतांना त्यांना दही, मध इ० समर्पण करून त्यांचा वस्त्रादिकांनीं करावयाचा पूजाविधि. कधी कधीं आलेल्या श्रोत्रियाला मोठा बैल अथवा कालवड देखील समर्पण करीत असत. पहा- 'श्रोत्रियाय अभ्यागताय वत्सतरीं महोक्षं वा निर्वपंति गृहमेधिनः।" **विविधयागवितानें**-अनेकप्रकारच्या यज्ञांचा प्रसार. अनेक प्रकारचें यज्ञ करून देव, पितर इत्यादिकांना संतुष्ट करणे. देवयज्ञ, पितृयज्ञ इत्यादि विधि, अथवा पुत्रकामेष्टि, प्राजापत्य अशा प्रकारचे यज्ञ. अशा कांहीं चांगल्या हेतूनें केलेलीं वैदिक कृत्यें, सत्वगुणाचा उदय झाला असतांच घडून येतात. **पांजराति**-आच्छादून टाकतात. संसारवृक्षाला वरील शिष्टागमनविधिचीं व यज्ञयागाची पानें झांकून-टाकतात. **ओ. १८८**-याप्रमाणें यमदमांनीं घोंसदार झालेल्या तपाच्या डहाळ्या फुटून त्यांना वैराग्याच्या विस्तृत कोंवळ्या फांद्याही येतात." सत्वगुणामुळें सदाचरणांचा व वैदिक कर्माचा जसा प्रसार होतो, तसाच यम, नियम, प्राणायाम इत्यादि मार्गांनीं तपाचरण घडून वैराग्याचाही उदय होतो. वैराग्य झालें तरी तो सत्वगुणाचाच एक परिपाक आहे. **यम**- इंद्रिय-

नियमन, इंद्रियांचा निरोध करणें, त्यांना ताब्यांत ठेवणें. विशेषतः मने, बुद्धि इत्यादि अंतरींद्रियांना आवरून धरणें. **दम**- बाह्येंद्रियनिग्रह, पांच कर्मेंद्रियांना आवरणें. **घोंसालियां—** घोंसदार. हें ' डाहालिया ' याचें विशेषण. अशा यमदमांनीं घोसदार बनलेल्या तपाच्या डाहाळ्या. यानांच पुढें वैराग्याच्या कोंवळ्या फांद्या फुटतात. म्हणजे यमदमानें तपाचरण साधल्यावर मग सहजच वैराग्य प्राप्त होते. **वैराग्यशाखा**-वैराग्यरूपी शाखा. **वैराग्य—** इहामुत्रफलविराग, ऐहिक व पारलौकिक फलाबद्दल अनासक्ति. **वेल्हाळपणें**- विस्तृतपणानें. **ओ. १८९—**धैर्याचे तीक्ष्ण अंकुर फुटलेल्या व्रतांच्या फांद्या सहज जोरानें फोफावून वर उंच जातात. " वरच्या ओवींत तपाचरण व वैराग्य यांचा उल्लेख आला आहे. येथे तसाच व्रताचरणाचा भाग सांगतात. सत्वगुणाने तपाचरणाबरोबरच अनेक प्रकारची व्रते आचरण्याची बुद्धि बळावते. **व्रतें—** स्वतःला लावून घेतलेला एकादा धार्मिक नियम; देहदंडाचा नियम. एकादशी, ऋषिपंचमी, अनंतव्रत अशीं व्रतें प्रसिद्ध आहेत व अशा व्रतांत अमुक अमुक खावयाचें नाहीं, किंवा अमुक अमुकच खावयाचें असें नियमन घातलेले असतें. अर्थातच असे कठिण नियम पाळण्यास मनोधैर्य लागतें. म्हणुनच व्रताच्या फांद्याना हे धैर्याचें तीक्ष्ण अंकुर कल्पिले आहेत. **धीराचां अणगाळें**-धैर्याच्या अंकुरांनीं युक्त. **जन्मवेगें**-जन्मतःच वेगाने, जोरानें. **उंचावती**- उंच जातात. **ओ. १९०—**तात्पर्य हा सत्वगुणरूपी वारा जोंपर्यंत जोराने वाहत असतो, तोंपर्यंत वर सांगितलेल्या तपांच्या व व्रतांच्या फांद्याचा वेदरूपी दाट पाला, अनेक विद्यांच्यारूपाने झडझडाट करतो. तपाचरण व व्रताचरणामुळें अंगीं वैराग्य बाणलेलीं ज्ञानसंपन्न माणसें मग वेद व वेदांगासारख्या अनेक विद्यांची रचना करतात व असे ग्रंथ सर्वत्र ख्याति पावतात. सत्वगुणाच्या प्रकर्षानें वेदवेदांगादि अनेक शास्त्रांचा उदय होतो, सर्व विद्यांना उत्तेजन मिळतें, असें सांगण्याचा मथितार्थ आहे. **विद्या—**ज्ञान, ब्रह्मज्ञान असा अर्थ आहे. पण येथें १४ विद्यांचा संबंध असेल असें वाटतें. **झडझडाट—**घोष, गर्जना. अनेक विद्यांचा घोष सुरू होतो. **सत्वानिळु—**सत्वगुणाचा एका विशिष्ट दिशेचा वारा सुटला, म्हणजे झाडांना पालवी, अंकुर फुटतात. त्याच न्यायानें, या संसारवृक्षाला एकदा रजोगुणाचा

नंतर तमोगुणाचा व शेवटीं सत्वगुणाचा वारा लागल्यानें, कसे कसे अंकुर फुटतात तें सांगतांनाच, हें वाऱ्याचें रूपक कल्पिण्यांत आलें आहे. **वाजे**—वाहतो. या ओवीपर्यंत सत्वरूपी वारा वाहूं लागल्यानंतर मनुष्यदेहरूप मुळाला सदाचाराच्या व व्रताचरणाच्या कशा अनेक शाखा फुटतात, ते वर्णन केलें आहे. पुढील १९१-१९७ या ओव्यांत हा सत्वगुणरूपी वारा असाच वाहत असतां, मनुष्यदेहरूप मुळाला आणखी धर्माच्या, उत्तम जन्माच्या, रविचंद्रादि ग्रहांच्या, ऋषिगंधर्वांच्या व इंद्रपदाच्या, एकाहून एक वरचढ अशा फांद्या फुटून शेवटीं त्यांना ब्रह्मलोक व शिवलोकांची फळें कशीं येतात, तें विस्तारानें दाखविलें आहे. सत्वगुणानुरोधानें सदाराचार, तप, व्रतें यज्ञ इत्यादींचें ज्ञानवैराग्यपूर्वक आचरण झाल्यावर, मनुष्याला स्वर्गलाभ, रविचंद्रलोकलाभ, इंद्रपदलाभ, व शेवटीं ब्रह्मदेवपद व शिवपदही मिळण्यापर्यंत मजल जाते, असा हा मानवलोकांतील सत्कृत्यांचा चढता फलानुक्रम येथे दिला आहे. तथापि सत्वगुणानुसार आचरलेल्या सत्कृत्यांचा, ब्रह्मदेवपद हा शेवटचा परिपाक असला, तरी मोक्षाची शाखा यासर्वांहून उंच गेल्याचें १९२ ओवींत सांगताना, येथे मोक्षपद हें वरील सर्व पदांहून श्रेष्ठ असल्याचें ध्वनित केलें आहे. **ओ. १९१** – "तेथे धर्मरूपी डाहाळीच्या विस्तारांतून उत्तमोत्तम जन्मरूपी शाखा, पालवीनें युक्त अशा दिसतात व त्या फांद्यांनाच पुनः आडव्या फांद्या फुटून त्यांना स्वर्गादि लोकांची फळें येतात." सत्वगुणामुळें माणसांच्या हातून अधिक धर्माचरण झाल्यावर त्यांना मग कुलीन, पवित्र अशा श्रीमंत कुलांत जन्म मिळतो, व कांहींना पुन: स्वर्गादि लोकांत वसति प्राप्त होउन, तेथील स्वर्गीय वैभव व सौख्य अनुभवितां येतें. **धर्मडाहाल इ०**—'धर्मरूपी डाहाळयांच्या विस्तारांतून. **बाहळ**— विस्तार. **जन्मशाखा**— चांगलीं पुण्यकृत्यें करणाऱ्याला उत्तम श्रीमंत कुलांत जन्म घडतो. अशा जन्मरूपी शाखा धर्माचरणांतून निघतात. पहा—"शुचीनां श्रीमतां गेहे योगभ्रष्टोऽभिजायते-" भगवद्गीता. **आडफुटती**-या जन्मांच्या फांद्याना ज्या पुनः आडव्या फांद्या फुटतात, त्यांनाच स्वर्गादि फळें येतात. कांहीं पुण्यवंतांना उत्तम श्रीमंत कुलांत जन्म, तर कांहींना स्वर्गसुख अशी फळें मिळतात, असा भाव. **ओ. १९२** – "याहून दुसरी वैराग्यप्रेमामुळें तांबडी झालेली, धर्मप्राप्त

मोक्षाची सरळ शाखा, लुसलुशीत नवीन जोमानें वाढतच असते. " **उपरतिरागे**— वैराग्याच्या प्रेमानें तांबडी. कारण प्रेमाचा रंग तांबडा असा कविसमय आहे. वैराग्यप्रेमानें नटलेली. **धर्ममोक्षाची**— धर्मानें प्राप्त होणाऱ्या मोक्षाची. सत्वगुणाच्या प्रकर्षानें कांहींच्या अंगांत वैराग्य बाणून त्यांच्या हांतून धर्माचरण घडल्यानें त्यांना सहजच मोक्ष प्रात्प होतो, असा अर्थ. **लोहिवें**-तांबडी. **मोक्ष**-जन्ममरणांतून सुटका. मोक्षाचें सुख स्वर्गसुखाहून अधिक आहे, असें येथें सूचित करण्यासाठीं ही धर्ममोक्षाची शाखा वर वाढत गेल्याचें मुद्दाम सांगितलें आहे. **लाहात लाहात**-लुसलुशीत. **नीचनवी**-नित्य नवी, टवटवीत. कांहींना स्वर्ग, तर कांहींना मोक्ष, त्यांच्या तपाच्या, व्रताचरणाच्या अधिकाराप्रमाणें मिळतो, हें प्रतिपादल्यावर कांहींना त्यांच्या सत्कृत्यानुरूप इतर लोक कसे प्राप्त होतात ते सांगतात. **ओ. १९३**—" पुढें या संसारवृक्षाच्या मनुष्यशाखारूप मुळांतून रवि, चंद्र इ. ग्रह, पितर, ऋषि, गंधर्व इत्यादिकांच्या लोकांच्या आडव्या फांद्यांचे समूह विस्तार पावतात." मनुष्यलोकावर सत्वगुणाचें वारें असेंच वाहत राहिलें असता, माणसांच्या हांतून जें पुण्याचरण घडतें, त्यास अनुसरून त्यांना रविचंद्रादिलोकांची, त्याचप्रमाणें पितृलोक, ऋषिलोक, गंधर्व लोक, अशा उच्चतर लोकांची प्राप्ति होते. पुण्यवंतांना त्यांच्या अधिकाराप्रमाणें अशा उच्चतर लोकांच्या विश्वांत राहण्यास संधि मिळते. **ओ. १९४**— " या शाखापेक्षांही थोड्या उंचावर फळांच्याखालीं दडलेल्या इंद्रादि लोकांच्या मोठ्या शाखांचे समुदाय आहेत. " कांहीं सात्विक व अधिक पुण्याचरणी लोकांना इंद्रलोकाची प्राप्ति होते असा भाव. शंभर यज्ञ केले असतां इंद्रपद मिळतें, असा समज आहे. अशा शतयज्ञ करणाऱ्याच्या आचरणाचाच येथें उल्लेख केला आहे. **उंचपडे**-थोड्या उंचावर **गुढले इ.**—फळाच्या बुडीं दडलेल्या. म्हणजे त्या फांद्या फळांनीं दबल्या लहडलेल्या कीं, आंतील फांद्या मुळीं दिसू नयेत. **इंद्रादि**—इंद्रपद. **मांदोडे**—समुदाय. सत्वगुणाचा वारा सुटला असता, स्वर्ग, रविचंद्रादि लोक, इंद्रपद, अशीं श्रेष्ठतर फळें मानवांना केवळ सदाचरणानें, तपोबलानें व व्रतनियमांनीं सहज मिळवितां येतात असा भाव. **ओ. १९५**—" मग याही फांद्यांच्यावर, तप व ज्ञान यांनीं उंच झालेल्या

मरीचिकश्यपादि ऋषींच्या दुसऱ्या उंच शाखा आहेत. " वर ज्या इंद्रपद, रवि-चंद्रलोक अशा शाखा सांगितल्या, त्यांच्याही वर या मरीचिकश्यपऋषींच्या शाखा आहेत. यावरून मरीचिकश्यपादि ऋषींचीं हीं स्थानें, इंद्रपदाच्या वरचीं आहेत, असें ध्वनित केलें आहे. मरीचिकश्यपादि ऋषींचीं हीं अत्युच्च स्थानें, त्यांनीं आपल्या उग्र तपश्चर्येनें व ब्रह्मज्ञानानें मिळविलीं आहेत. अशीं स्थानें सत्वगुणाखालीं, तपाचरण व ब्रह्मज्ञान यानींच मिळतात. कोणाही साध-कालाहीं तशा मरीच्यादि ऋषींच्या आचरणानें मिळवितां येण्यासारखीं आहेत. **तपोज्ञानिं** -- इ. उग्र तपश्चर्या व ब्रह्मज्ञान यांनीं अत्युच्च झालेल्या. **ओ. १९६**—" याप्रमाणें एकावर एक अशा वरच्या फांद्यांच्या पसाऱ्यानें विस्तारलेला हा संसारवृक्ष, बुडाशीं लहान असला, तरी फलसंपन्नतेमुळें शेंड्याला मोठाच झाला आहे. " मनुष्यशाखारूप मुळापासून वर ज्या स्वर्गाच्या, धर्ममोक्षाच्या, रविचंद्रादिकांच्या, इंद्रादिकांच्या व मरीचि-कश्यपादिकांच्या एकावर एक उंच अशा फांद्या व त्यांना जीं स्वर्ग, मोक्ष, रविचंद्रलोक, इंद्रपद व मरीचिकश्यपादि ऋषींचीं स्थानें यांचीं फलें आलेलीं वर्णन केलीं त्यावरून मनुष्यशाखेच्या मुळापासून वर वाढलेला हा वृक्ष मुळांत लहान असला, तरी वरील मोठमोठ्या पदांच्या व स्थानांच्या लाभाच्या दृष्टीनें तो केवढा मोठा वाढला आहे हें दिसून येईल. याचा भावार्थ इतकाच कीं, अंगीं सत्वगुणाचा प्रकर्ष बाणला असतां, माण-साला उत्तरोत्तर उच्चप्रतीच्या आचरणानें, तपानें व ज्ञानानें स्वर्गादि उच्च प्रतींची फलें प्राप्त करून घेतां येतात. सत्वगुणाच्या वातावरणांत तपोज्ञानाची वृद्धि होऊन सुखाची समृद्धि करणारीं स्वर्गादि पारलौकिक फलें, साधकाला सहज शक्य होतात. **फलाढ्यपणें**— स्वर्ग, मोक्ष, रविलोक, चंद्रलोक इत्यादि उच्च प्रतीच्या फलाच्या संपन्नतेनें. **बुडिं साना इ०**—ही मनुष्यशाखा मुळांत कितीं जरी लहान असली, तरी सत्वगुणामुळें तिला फळांच्या दृष्टीनें एकापेक्षां एक वरचढ अशा ज्या फळयुक्त फांद्या फुटतात, त्यामुळें वर टोकाला हा संसारवृक्ष मोठा संपन्न झालेला आहे. **ओ. १९७**— " त्यावरही ज्या आणखी फांद्या फुटतात व त्यांना हें अर्जुना! ब्रह्मदेव व ईश यांच्या पदापर्यंतच्या शाखांचें अंकुर फुटून, त्यांना ब्रह्मलोक व शिवलोक यांची फलें येतात." वर ओ.

१९५ मध्यें मरीचिकश्यपादिकांच्या ज्या फांद्या सांगितल्या, त्यांच्याही वर आणखी ब्रह्मेशांत, ब्रह्मदेव व शिव यांच्यापर्यंत वाढत गेलेल्या फांद्या असून, त्यांना ब्रह्मलोक व शिवलोक हीं फळें लागलेलीं आहेत. म्हणजे सत्वगुणाचा प्रसार झाला असता, हा संसारवृक्ष, मनुष्यशाखेपासून वर ब्रह्मदेव व शिव यांच्या शाखपर्यंत वाढतो. सत्वगुणाच्या प्रभावानें व सदाचार, तप ज्ञान इत्यादींमुळें, मनुष्याला ब्रह्मलोक व शिवलोक यांची देखील प्राप्ति करून घेतां येते, असा भावार्थ ब्रह्मा व शिव ही मनुष्याच्या अध्यात्मिक परिणतावस्थेची परा कोटी, अगदी शेवटची पायरी होय. फार फार तर सत्वगुणामुळें माणसाला ब्रह्मा किंवा शिवही होतां येईल, त्यांच्या पदवीला जातां येईल. **ओ. १९८—** " या फळांच्या भारानें, वर गेलेल्या फांद्या वांकून दुमडतात, व अशा रितीनें फलभारानें वांकलेल्या झाडाच्या वरच्या फांद्या, मुळालाच येऊन टेकतात. " **फळाचेनि इ०—** फळांच्या, वर सांगितलेल्या इंद्रपदादि फळांच्या ओझ्यानें. **ॐझोलपणें—** ओझ्यानें, भारानें. **ऊर्ध्व—**वर गेलेल्या या यमदमाच्या, वैराग्याच्या, व्रतांच्या इत्यादि शाखांनीं व्यापलेला या संसारवृक्षाचा वरचा भाग. **ॐबांडैल दूणें**-दुप्पट उलटतो. दुप्पट खालीं वांकतो. **जंव इ०—**याप्रमाणें या वृक्षाची स्थिति पुनः मूळ पदाला येते. वर झपाट्यानीं गेलेल्या त्याच्या वरच्या फांद्यांचीं टोकें, फलभारामुळें वाकून पुनः मुळालाच चिकटतात, स्पर्श करतात. तात्पर्य ज्या मुळापासून त्या फांद्या वर गेल्या, त्या मुळाकडेंच त्यांना येणें भाग पडलें. **बैसणें**–स्थिति. **ओ. १९९ –** " आणि इतर सामान्य वृक्षांची देखील अशीच स्थिति होतें कीं, त्यांची जी फांदी फळानी भरगच्च होते, ती वांकून मुळालाच स्पर्श करण्यास येते. " फलभारानें वांकलेल्या झाडांचा शेंडा, बुडख्याला भेटतो. **ओ. २००–** त्याचप्रमाणे हा संसारवृक्ष ज्या मुळापासून उत्पन्न झाला, त्या मुळालाच हे अर्जुना ! त्याच्या वाढत्या ज्ञानाच्या फांद्या येऊन टेकतात. **वाढतीं ज्ञानें—** वर ज्या यमदमाच्या, वैराग्याच्या, विशिष्ट व्रताच्या, फांद्या सांगितल्या व वेदांच्या पाल्याचा व विद्यांच्या झड-झडटाचा जो उल्लेख केला, तोच या वाढत्या ज्ञानाचा द्योतक आहे. अशा वाढत्या ज्ञानाच्या फांद्यांना जी उपरिनिर्दिष्ट स्वर्गादि फळें आलीं, त्यामुळेंच

हा वृक्ष वांकून मुळाला टेकला. तात्पर्य हा संसारवृक्ष ज्या परब्रह्मरूपी मुळापासून उत्पन्न झाला आहे, त्या मुळालाच सर्व ज्ञाने येऊन मिळतात. जगांतील सर्व ज्ञानाची परिसमाप्ति, परिसीमा परब्रह्माला मिळण्यातच होते. **उठावा**—उठाव, उगम. **तिये मूळिं**— त्या परब्रह्मरूपी मुळाच्या ठिकाणीं. **ओ. २०१**—सत्वगुणाचा वारा सुटला असता, मनुष्यशाखेला सदाचरण, तप, व्रत, ज्ञान इत्यादिकांच्या फांद्या फुटून, त्यांना शेवटीं ब्रह्मदेव व ईशपदें हीं फलें लागल्याचें वर्णन आतापर्यंत करण्यात येऊन, ब्रह्मपद व ईशपदांचे हे संसारवृक्षाचे खांड फलभरानें शेवटी वाकून ब्रह्मरूपी मुळाला कसे टेकतात, त्यांचेही प्रतिपादन करण्यात आलें. " ब्रह्मदेव व ईशान यांच्या पलीकडे मनुष्याची परिणति होणें शक्य नाहीं. कारण या ब्रह्मेशान स्थितीच्या वर, मग जिकडे तिकडे परब्रह्मच व्यापून राहिलें आहे. " मनुष्याच्या उत्कर्षाची परमावधि म्हणजे त्याला ब्रह्मदेव व शंकर ही पदवी प्राप्त होणें. त्यानें कितीही तप केलें, किंवा सदाचरण केलें, तरी या दोन स्थितीच्या पुढें त्याची मजल जावयाची नाहीं. फार फार तर तो ब्रह्मदेव तरी किंवा शंकर तरी होऊं शकेल. कारण ब्रह्मदेव काय किंवा शंकर काय, हीं उच्चकोटीचीं माणसेच होत. तेव्हां सामान्य मनुष्यप्राणि तपोज्ञानबलानें ज्यास्तींत ज्यास्ती ब्रम्हदेव किंवा शंकर होईल. या दोन अवस्थांच्या पलीकडे परब्रह्माचा विस्तृत प्रांत पसरला आहे. **ओ. २०२**—' तथापि हे काहीं असले, तरी ब्रह्मदेव किंवा ईशान हे उंचीच्या दृष्टीनें संसारवृक्षाच्या त्या परब्रह्मरूपी मुळाशीं तुलना करण्यासारखे नाहींत. ब्रम्हदेव व शंकर हे मनुष्याच्या दृष्टीनें केवढेही मोठे असले, तरी मूळ परब्रह्माच्या थोरपणाशीं त्यांची तुलनाच करता यावयाची नाहीं. **आंगवसें**— उंचीच्या दृष्टीनें, थोरपणाच्या दृष्टीनें. **ओ. २०३**—आणखीही सनकादि नावानीं प्रसिद्ध अशा ज्या वैराग्यशील पुरुषाच्या शाखा आहेत, त्यांना फळामुळाचा स्पर्श न होतांच, त्या परब्रह्मानें पूर्ण भरलेल्या आहेत. मागें ओ. १९७ मध्यें जी उपरतिरागानें तांबडी झालेली धर्ममोक्षाची वर वाढत गेलेली नित्य नवी फांदी सांगितली आहे, तीच ही सनकसनंदनादि ब्रह्मदेवाच्या मानस पुत्रासारख्या विरक्त पुरुषांची शाखा असून, अशांनीं कोणत्याच फलाची अपेक्षा न केल्यामुळे, ते मूलतः परब्रह्मात मिळून गेल्याचें येथें स्पष्ट करण्यात आलें आहे. सनकसनंदनासारखे पुरुष मूळचेच विरक्त-

वृत्तीचे अगल्यामुळें, त्यांच्या ठिकाणीं कोणत्याच फलाची अथवा जन्माची अपेक्षा संभवत नाहीं. तसेच ते मूलत:च ब्रह्मैक्य पावलेले असल्यानें, त्यांना दुसऱ्या कोणत्या मुळाचीही अपेक्षा नाहीं. अशी ही विरक्त पुरुषांची स्थिति, फलाशेनें कर्मे करून स्वर्ग, ब्रह्मलोक, शिवलोक, मिळविणाऱ्या सकाम माणसांहून अगदीं भिन्न व उच्चकोटींतलि आहे, असें येथे ध्वनित केलें आहे. **नाडलतां**—न स्पर्शतां. **भरलियां ब्राह्मीं**—परब्रह्मांत भरून गेल्या आहेत. **ओ. २०४**—" याप्रमाणे सामान्य माणसापासून अखेर ब्रह्मदेवापर्यंत या संसारवृक्षांच्या फांद्यांची वाढ वर वर होत जाते " **ब्रह्मादि शेष**—ब्रह्मदेव शिल्लक उरेपर्यंत, अर्थात् ब्रह्मदेव अखेर. **ओ. २०५**—" हे पार्था ! वरचे ब्रह्मदेव, ईशान वगैरे जे सांगितले, तीं प्रथम माणसंच होतीं. म्हणुनच या मनुष्यत्वाच्या शाखेला त्या ब्रह्मेशानपदांची खालचीं मुळें म्हटलीं आहेत."वास्तविक प्रदीर्घ तपोबलानेंच मनुष्य ब्रह्मदेव झाला आहे. आज जा ब्रह्मदेव आपण म्हणतो, तो प्रथम एक सामान्य मनुष्यच होता. त्यानें तप:सामर्थ्यानें हें ब्रह्मदेवाचें श्रेष्ठ पद मिळविलें. तात्पर्य मनुष्याचाच ब्रह्मदेव झाला असल्याने, ब्रह्मदेवाचा उगम मनुष्यच होय. या वस्तुस्थितीस अनुलक्षून वर ब्रह्मदेवाच्या फांदीचें मूळ, मनुष्यशाखा असें म्हटलें आहे. **ओ. २०६**— " याप्रमाणें वर खालीं फांद्या असणारा व वर मूळ असणारा हा अलौकिक संसारवृक्ष, तुला वर्णन करून सांगितला. " **ओ. २०७**— " आणि या संसारवृक्षाचीं खालचीं व उफराटीं वरचीं मुळें, तुला सविस्तर दाखवून दिलीं. आतां हा वृक्ष कोणत्या उपायानें उपटून टाकतां येतो तें ऐक. " **उपरातें**—उफराटीं. **सविवळें**-- सविस्तर.

( **श्लोक ३** )— " पण आतापर्यंत केलेल्या वर्णनाप्रमाणें या वृक्षाचें स्वरूप इहलोकांत पहावयास सांपडत नाहीं. किंवा त्याचा शेवट, उगम व आधारस्थानही कोठे मिळत नाहीं. असा हा खोल मुळयांचा अश्वत्थ वृक्ष अनासक्तिरूपी बळकट शस्त्रानें तोडून " **ओ. २०८**— " पण हे अर्जुना ! एवढे प्रचंड असे हें संसाराचें झाड तोडणारें साधन तरी जगांत कोणतें आहे, अशी शंका कदाचित तुझ्या मनांत आली असेल." **ओ. २०९**—

" कारण ज्याच्या वरच्या फांद्याची उंची ब्रह्मदेवापर्यंत पोंचला आहे व ज्यांचीं मुळें निराकार अशा परब्रह्मांत वर आहे. " **ओ. २१०**–हा संसारवृक्ष आपल्या खालच्या फांद्यांनीं स्थावराच्या तळापर्यंत पसरला असून, मध्यभागीं मनुष्यरूपी दुसऱ्या मुळ्यांनीं हा पुढे सरसावतो. " तमोगुणाच्या वाऱ्यानें या वृक्षाच्या फांद्या खालीं जाऊन, त्यांना स्थावर वस्तूंचीं फळें येतात, तर मधली मनुष्य-शाखा सत्वगुणाच्या भरांत वर जाऊन, तिला ज्या तपोव्रतादि दुसऱ्या डाहाळ्या फुटतात, त्यांनाच स्वर्गादिफळे येतात, हें आपण वर पाहिलेंच आहे. अशा रितीनें मनुष्यशाखा ही इतर तपोव्रतादि शाखांच्या अपेक्षेनें त्यांचें मूळ होय. **ओ. २११**— " अशा या बळकट व अफाट वृक्षाचा नाश कोण करणार असा हलका भाव तूं मनांत कदाचित धरशील." **झनें**—कदाचित्. **हलुवट**— हलका. **ओ. २१२**—हा संसारवृक्ष उपटून टाकण्यास श्रमच मुळीं लागत नाहींत, हें अनेक दृष्टांतांनीं पटवून देतात. " तर हा वृक्ष उपटण्यास श्रम तरी कसले लागणार ! बागुलबोवा लहानमुलापुढें कधीं तरी वांकडा चालतो काय ?" बागुलबोवाच मुळीं खरा नसल्यानें, त्याचें वाकडें चालणें जसें खरें नव्हे, तद्वत् हा संसारवृक्ष खरा नसल्यानें, याला तोडण्याचे मग श्रम कसले ? **दोखें**— कारणें. पहा– " श्रीकृष्ण पावावेआं दोसें । मुनीं षट्पदु जाले ॥ १६१ ॥– वच्छहरण. दोषें–दोसें हें अव्यय, ' उद्देशें ' करितां, साठी, या अर्थी ज्ञानेश्वरींत व महानुभावी वाङ्मयांत येतें. **बागुलु**,—बागुलबोवा. **देखों**–पुढें. **देव्हडा वाहे**– वांकडा चालतो. **ओ. २१३**– " आकाशांतले किल्ले तरी मग कां पाडून टाकतां येऊं नयेत ? तसें सशाच्या शिंगाला काय मोडावें लागतें ! मुळांत आकाशपुष्प असेल तर तें तोडतां येईल ! " आकाशांतील मेघांत दिसणारे किल्ले मुळांत असते, तर ते पाडून टाकतां आले असते. पण ते कल्पनेचेच असल्यामुळें, मग पाडून टाकण्याचा प्रश्नच संभवत नाहीं. तसेंच सशाला शिंगच मुळांत नसल्यानें, तें मग मोडणार कोठून, किंवा आकाशाला मुळांत फूलच नसल्यानें, मग तें तोडणार तरी कसें ? तात्पर्य गंधर्व-दुर्ग, शशाचें शिंग व खपुष्प हीं केवळ काल्पनिकच असल्यानें, त्यांना जसा नष्ट करण्याचा प्रश्नच उद्भवत नाहीं, तद्वत् हा संसारवृक्ष देखील खोटा काल्पनिक असल्यानें, याला तोडण्याचे श्रम करण्याचें कारण नाहीं. गंधर्वनगरी, शशवि-

षाण, व खपुष्प हे सर्व काल्पनिक प्रकार आहेत, तसाच संसारवृक्षही खोटाच आहे. तुलनार्थ पहा– " प्रयत्नें वाळूचें कण रगडितां तेहि गळे । तृषार्ताची तृष्णा मृगजळ पिउनीहि वितळे । सशाचें ही लाधे विपन फिरतां श्रृंगहि जरी । परंतु मूर्खाचें हृदय धरवेना क्षणभरी ।।—नीतिशतक, हरिपंडित. **गंधर्वदुर्ग**— आकाशांत दिसणारे ढगांचे किल्ल्यासारखे आकार. **खपुष्प**– आकाशपुष्प. **ओ. २१४**—" त्याचप्रमाणें हे वीरा ! हा संसारवृक्ष देखील खरा नव्हे. मग तो उपटून टाकण्यास भीति तरी कसली ? " ज्या वृक्षाला मुळीं अस्तित्वच नाहीं, तो उपटणार तरी कसा ? मग तो उपटून टाकण्याची भीति तरी काय म्हणून बाळगायची ? **साचोकारा**–खरा. **ओ.२१५**–"आम्हीं जो या संसारवृक्षाच्या मुळाच्या व फांद्यांच्या विस्ताराचा प्रकार सांगितला, तो वांझेच घर मुलाबाळांनीं भरलेलें आहे अशाप्रमाणेंच होय." संसारवृक्षाच्या मुळांचें त्याच्या फांद्यांचें, जें वर वर्णन करण्यांत आलें, तें वांझेला मुलें आहेत असें म्हणण्याप्रमाणेंच काल्पनिक होय.वांझेला मुलें असणे ही कल्पनाच जशी संभवत नाहीं, त्याप्रमाणें या संसारवृक्षाच्या मुळाची व फांद्यांची कल्पनाच अशक्य कोटींतील आहे. **परी**—प्रकार. **उजिरी**–विस्तार, उदय, उत्कर्ष. **ओ. २१६**–" किंवा स्वप्नांत बोललेलं, ज्याप्रमाणें आपण जागेपणीं आचरणांत आणींत नाहीं, किंवा दुबळ्या माणसाच्या वल्गना जशा फोल असतात. " स्वप्नांत केलेली भाषा जशी निरर्थक, खोटी, किंवा दुर्बल माणसांच्या वल्गना जशा निरुपयोगी, तद्वत् हा संसारवृक्षाच्या फांद्यांचा विस्तारही खोटा व निरर्थक आहे. **चेइलेपणीं**–जागेपणीं . **दुबलेयाची**–दुर्बळ माणसाची. दुर्बळ माणसाचे बेत " उत्पद्यंते विलीयंते दरिद्राणां मनोरथाः " अशा स्वरूपाचे असतात. या ओवीपुढें माडगांवकर व साखरे यांनीं दिलेल्या दोन ओंव्या निःसंशय प्रक्षिप्त आहेत. **ओ. २१७**–" म्हणून हे अर्जुना ! आम्हीं जें या संसारवृक्षाच्या स्वरूपाचें वर्णन केलें, ती सर्व माया असून, कासवीच्या तुपानें राजाला मेजवानी देण्यासारखाच तो प्रकार होय. " कासवीला दूध नसतें. ती आपल्या पिलांना केवळ दृष्टीनें पोसतें. मग जिथं दुधाचा पत्ता नाहीं, तिथं तूप कुठलं येणार ? व अशा कासवीच्या तुपानें राजाला मेजवानी देणें जसें असंभवनीय, तद्वत् या संसारवृक्षाचें स्वरूपही असंभाव्य, मायिक, लटकें आहे.

**वानिली**- वर्णिली **रुपमाया**- मायेचे रूप. **ऊगारिलें**-- वाढलें. **ओ. २१८**- " अगोदर अज्ञान हेंच लटकं, खोटं आहे. मग त्यापासून उत्पन्न होणारें कार्य कसें असेल ? म्हणून हा संसारवृक्ष, खरं पाहिलं, तर खोटाच आहे. " हा संसारवृक्ष अज्ञानांतून निर्माण झाला असल्यानें, व अज्ञान पुनः लटकें असल्यानें, अज्ञानांतून उत्पत्ति पावलला हा संसारवृक्ष देखील लटकाच निघणार. " जें कार्य तें गुणोचि घेईल कारणाचा " या न्यायानें अज्ञानाचा लटकेपणा संसारवृक्षांत उतरला. **सतिकें**— खरेंपणानें **वाऊ**— मिथ्या **मा तयाचें** इ०-- मग त्याचें जें कारण तें किती लटकें असेल ? मूळ अज्ञानच जर खोटें आहे, तर मग त्या अज्ञानापासून निघालेला, उत्पन्न झालेला हा कार्यरूप संसार, किती खोटा असेल बरं ! कारणच खोटें असल्यावर कार्य खोटें असणारच. **ओ. २१९**— " आणि या संसारवृक्षाला अंत नाहीं असें जें म्हणतात, तेंही एका प्रकारानें खरेंच आहे. " **एकी परी**- एका प्रकारानें, एका अर्थानें. हा संसार खोटा असला, तरी एका अर्थानें तो खरा कसा तें पुढें सांगतात. **ओ २२०**— " तर जोंपर्यंत मनुष्य जागा झाला नाहीं, तोंपर्यंत झोपेचा शेंवट होतो काय ? किंवा प्रभात होण्यापूर्वी रात्र कधीं संपते काय ? ती जोंपर्यंत संपत नाहीं, तोंपर्यंत ती चालूंच असते. त्याप्रमाणें विवेकाचा उदय होईपर्यंत या संसाररूपी ( अज्ञानमय ) वृक्षाला आस्तित्व आहे. ज्ञानाचा उदय होईपर्यंत हा अज्ञानजन्य वृक्ष अबाधित चालू राहतो. या अर्थानें तो अव्यय, अविनाशी असें वर ओ. २१९ मध्यें ह्मटलें आहे. **प्रबोध**— जागृति. **नीद**—निद्रा, झोप. **पाहे तेया**— पहाटेच्या. **आरौते**— अलीकडे, पूर्वी. हेंच पुढील ओवींत सांगतात. **ओ. २२१**-" त्याचप्रमाणें हे पार्था ! जोपर्यंत विवेक, सारासार विचार, आपलें डोकें वर काढीत नाहीं, तोंपर्यंत या संसाररूपी अश्वत्थ वृक्षाला अंत नाहीं. " **विवेकु**—सारासार विचार, कोणती वस्तु खरी, कोणती खोटी याचा विचार. **नुधवी**— न उचली. नुधवणें= न उचलणें. सारासार विचार जागृत झाला कीं, या अज्ञानजन्य अत एव खोट्या संसारवृक्षाचा अंत झाला असें समजावें. तो खोटा आहे असें एकदा निश्चित केलें, कीं तो संपलाच. या ओवींनंतर माडगांवकर व साखरेप्रतींत संसारवृक्षाच्या खोटे-

पणावर दृष्टांत देणाऱ्या आणखी तीन ओव्या अधिक दिल्या आहेत. त्या निःसंशय मागाहूनच्या आहेत. कारण ओ. २२१ मध्यें, "तेवि जंव पार्था" असे म्हणून आपण देत असलेल्या दृष्टांतांचा ज्ञानेश्वरांनीं शेवट केला आहे. यानंतर आणखी तशाच दृष्टांताच्या ओव्या येणें अप्रासंगिक आहे. **ओ. २२२**— वर एक प्रकारें या वृक्षाला 'अव्यय' म्हणतात ते कसें खरें आहे, हें सांगितलें. आतां येथ त्याला 'अनादि' असें जे म्हणतात, तेंही कसें खोटें नाहीं, ते भगवान् अर्जुनाला सांगतात. "त्याचप्रमाणें हा संसारवृक्ष अनादि आहे अशी ख्याति आहे, तीही कांहीं खोटी नव्हे. म्हणून अशा ख्यातीला अथवा प्रवादाला विरोध करूं नको." **शाब्दी**--ख्याति. **आलुकी**— ( सं.--अलीक )- खोटी. **नुरोधि**—निषेध करूं नको. **बोलातें पया**— अशा शाब्दिक ख्यातीला. 'अनादि' असें जें या संसारवृक्षाला म्हणतात, तेंही एका अर्थानें खरें आहे, असें श्रीकृष्ण येथे 'अनादि' या शब्दावर कोटी करून स्पष्ट करतात. वास्तविक "अनादि' = अबाधित, अखंड चालत आलेला, असा आपण अर्थ नेहमीं घेतो. पण या वृक्षाचें खोटेपण सिद्ध करण्यासाठीं, श्रीकृष्ण 'अनादि' या शब्दाचा यौगिक अर्थ घेऊन, या संसार-वृक्षाचें मुळीं अस्तित्वच पुढील ओवींत असिद्ध करतात. यानंतरही इतर प्रतींत अशाच अधिक दृष्टांत देणाऱ्या ओव्यांचा घोळ घातला आहे. तो विचारांत घेण्यासारखा नाहीं.

**ओ. २२३**— "जो जन्मतच नाहीं किंवा उत्पन्न होत नाहीं, अशाची आई म्हणून तरी कोण सांगायची? म्हणून वृक्षाला अस्तित्वच नसल्यामुळें, या अनादि म्हटलें आहे." ज्याला आदि=जन्म किंवा अस्तित्व नाहीं, तो अनादि, असा कोटिबाज अर्थ घेऊन, संसाराचें खोटें स्वरूप अथवा अभाव स्पष्ट केला आहे. **ओ. २२४**— "या वृक्षाला जन्म, अंत व अस्तित्व नाहीं, किंबहुना ज्याला कांहीं रंग रूपही नाहीं, त्याला उपटून टाकण्यास श्रम तरी काय करायचे? श्रमाची तरी जरूरी काय?" जो वृक्ष केवळ कल्पनेंतच आहे, ज्याला भावरूप अस्तित्वच नाहीं, त्याला उपटून टाकण्यास खटाटोप करण्याचें कारण नाहीं. ज्या ज्या वस्तूला अस्तित्व आहे, तिला उत्पत्ति, स्थिति व लय या तीन अवस्था असतात असा न्याय आहे. पण

या संसारवृक्षाला या तीन अवस्थाच नमल्यामुळें, तो आहे असें म्हणताच येत नाहीं, असा श्रीकृष्णाच्या सांगण्याचा भावार्थ आहे. **कुंथाकुंथी**—खटपट. **ओ. २२५**-तर असा हा संसारवृक्ष कोणत्या शस्त्रानें तोडावा तें येथून सांगतात. " हे अर्जुना ! हा वृक्ष आपल्याच अज्ञानामुळेंच बळावला नव्हता काय ? तर मग याला आत्मज्ञानाच्या तरवारीनेंच तोडून टाक. " **अज्ञान**— जगत, संसार हा खरा आहे या अज्ञानानें. **आत्मज्ञान** – आत्मानात्म विचार, ब्रह्म हेंच सत्य आहे हें ज्ञान. **खांडेनि**- ( सं. खड्ग )- तरवारीनें. **लोटी**— तोड. एक परमात्मा तेवढाच सत्य आहे, बाकी सर्व जग खोटें, अशा ज्ञानानें या संसारवृक्षाचा म्हणजे जगाचा शेवट होतो. **थांवला**--बळावला. **ओ. २२६**- पण या एका ज्ञानाशिवाय, जितके म्हणून दुसरे उपाय या संसारवृक्षाला तोडण्यासाठीं तू करशील, तितक्यांनीं उलट या संसारवृक्षांत तूं अधिकच गुंतशील मात्र. " या संसारांतून सुटण्यास आत्मज्ञानाशिवाय इतर सर्व उपाय अथवा मार्ग निरुपयोगी असून, उलट ते मनुष्याला संसारांत अधिकच गुंतून पाडणारे आहेत, असें येथें स्पष्ट केलें आहे. आत्मज्ञान न होता स्नान, संध्या, टिळे, माळा हीं परमार्थाचीं बाह्य साधनें, साधकाला अहंकारांत पाडून त्या योगें संसारांत अधिकच गुंतविनात. **गुंपसि**—गुंतसी. **ओ. २२७**—" आणि एकदा या संसारवृक्षांत गुंतलास कीं, मग तुला त्याच्या किती फांद्याफांद्यावरून वर खालीं हिंडावें लागेल तें काय सांगावे ! म्हणून संपूर्ण ज्ञानानें, या वृक्षाचें मूळच अगोदर तूं तोडून टाक. " संसारांतून सुटण्यासाठीं ज्ञानाशिवाय इतर बाह्य मार्गांनीं जों खटपट करावी, तों मनुष्य त्याच्या मोहांत अधिकच गुंतत जातो. म्हणून आत्मज्ञान मिळवूनच या संसाराचें मूळ जें अज्ञान, तें नष्ट केलें पाहिजे त्याशिवाय दुसरा उपाय नाहीं असा भाव. हा संसारवृक्ष तोडण्यास इतर बाह्य उपाय केलेले कसे फुकट जातात, तें नेहमीच्या पद्धतीनें दृष्टांत देऊन स्पष्ट करतात. **ओ. २२८**—" एरवीं दोरीच्या सापाला मारण्यासाठीं काठ्या जमविल्या असतां, तो सर्व केलेला प्रहार व्यर्थच होतो. " कारण दोरीलाच आपण सर्प मानतो, व तो कांहीं खरा नसतो. **डांगा**– काठ्या. **फारू**- प्रहार. हा शब्दार्थ न समजल्यामुळें इतर प्रतींत ' भारू, ' ' वाउ ' असे दुसरे पाठभेद निर्माण केले आहेत.

पण ज्ञानेश्वरींत ' फारु ' हा शब्द आणखी आला आहे. पहा- ओ. १७८. **ओ. २२९**— मृगजळाची नदी तरून जाण्यासाठीं नांव तयार करण्यास अरण्यांत धांवावे, तो खऱ्या नदीच्या पाण्यांत वाहून बुडून जावें. " त्याप्रमाणें हा संसार नष्ट करण्याचे दुसरे बाह्य उपाय जों अवलंबावे, तितके ते, माणसाला अधिकच त्यांत बुडवून मारतात. संसारांतून सुटण्यासाठीं हठयोग, संन्यास इत्यादि मार्ग आचरावे तों, त्यांच्यापासून प्राप्त होणाऱ्या अणिमादि सिद्धींच्या लोभानें, साधक अधिकच त्या संसारांत अहंकारानें रुतला जातो, व ज्यासाठीं त्यानें एवढा खटाटोप केला, तें ब्रह्मैक्य किंवा संसाराचा खोटेपणा पटणें हें ज्ञान, त्याच्यापासून दूरच राहतें. हेंच पुढलि ओंवींत सांगतात. **मृगजलाची** १०–उन्हाळ्यांत सूर्याच्या किरणांनीं हरिणांना भर दुपारीं उघड्या माळजमिनीवर पाण्याचा भास होतो, तो खोटा असतो. त्याप्रमाणें हा संसारवृक्ष देखील निवळ भासमान होणारा मिथ्या असाच- आहे. **डोणी**–नाव.(सं. द्रोणी) **दांग**- अरण्य. **ओ. २३०**-"त्याप्रमाणें नसत्या संसाराच्या नाशाचे दुसरे उपाय योजण्याचे श्रम सायास करण्याऱ्याला हे अर्जुना! स्वतःलाच नामशेष व्हावें लागतें, व त्याचा हा ज्ञानावांचून अन्यमार्गानें संसार नष्ट करण्याचा खटाटोप अथवा उत्साहही मग थंड पडतो. " **नाथिलेया**- नसलेल्या, असत्य. **उपाइं**— ज्ञानावाचून दुसरे उपासनांचे बाह्य उपाय. **जाचतया**— नाश करण्याचा श्रम करणाऱ्यास. **वारा**–उत्साह. **विकोपि जाए**— नाशाला जातो, थंड पडतो. **ओ. २३१**— " म्हणून हे धनंजया ! स्वप्नांत झालेल्या जखमेला जागृति हेंच औषध होय. त्याप्रमाणें अज्ञानमूल अशा या संसाराच्या वृक्षाला तोडणारी ज्ञान हीच तरवार होय. " **चेऊ**- जागृति. जागें होणें. **ओ. २३२**- ' पण तीच ज्ञानरूपी तरवार अगदीं सहज वावडतां येइल, असें बुद्धीला वैराग्याचें ताजें व बळकट बळ अथवा साह्य पाहिजे." बुद्धीला वैराग्याचें पाठबळ असल्याशिवाय ज्ञानाचा प्रकाश पडावयाचा नाहीं असा अर्थ. जग मिथ्या आहे, असे ज्ञान होण्यास जगाबद्दलचा म्हणजे जगांतलि सर्व पदार्थांबद्दलचा लोभ अथवा आसक्ति नष्ट झाली पाहिजे. ही आसक्ति नष्ट झाली नाहीं, तर जग खोटें आहे हा सिद्धांतच पटणार नाहीं. म्हणून ज्ञान होण्यास प्रथमतः साधकाची बुद्धि वैराग्ययुक्त, अनासक्त झाली पाहिजे. **लीला**-

लीलेनें, सहज. **परजणें**—धारण करणें, वावडणें. **ओ. २३३**—" धर्म, अर्थ, काम अशा त्रिवर्गानीं युक्त असा हा संसार, वैराग्यानें कसा टाकायचा म्हणशील तर जणुकाय एकादें कुत्रें नुकतेंच ओकून गेल्याप्रमाणें." कुत्रें ज्याप्रमाणे आपल्या पोटांतली घाण झटकन् ओकून मोकळें होतें, त्याप्रमाणें साधकानें देखील वैराग्ययुक्त होऊन, हा संसार वमनाप्रमाणें टाकला पाहिजे. **सुणें**-कुत्रें. **आतांचि गेलें**—झटकन् जाणाऱ्या. पण कित्येकांच्या मतें, ज्ञानेश्वरांनीं हा कुत्र्याचा दृष्टांत, आपल्या प्रवचनाच्या वेळीं ओकणारें एक कुत्रें पाहून त्याला अनुलक्षून तेथल्या तेथे दिला आहे. **त्रिवर्गु**--धर्म, अर्थ व काम-असे तीन. सर्व संसार या तिघांनीं व्यापला आहे. प्राणिमात्रांची, सर्व हालचाल या तीन वर्गाच्या अनुरोधानेंच होते, हें आपण पाहतोच. म्हणून 'त्रिवर्गु' याचा ' संसार ' असाच अर्थ येथे घेतला पाहिजे. **वमोनियां**— ओकून. **ओ. २३४**— " हे पांडवा ! अशी परिस्थिति उत्पन्न करणारा, व सर्व पदार्थांबद्दल वीट आणणारा वैराग्याचा जोर प्रथम आणला पाहिजे. " **हा ठाव**—ही संसार सोडण्याची परिस्थिति. **विटंबी**— वीट, उबग उत्पन्न करी असा. **लोटु**— जोर, सामर्थ्य. तरवार उपसून जाण्यापूर्वी अंगांत प्रथम जोर आणावा लागतो. येथे ज्ञानरूपी तरवार संसारवृक्षावर घालतांना, प्रथम वैराग्याचा असाच आवेश आणला पाहिजे असें सांगतात. यापुढील ४ ओंव्यांत हत्यार उपयोगतांना रूढ असलेली योध्यांचीच परिभाषा वापरली आहे. **ओ. २३५**— " मग देहअहंतारूप असें जें ज्ञानरूप तरवारीवरील म्यान, तें काढून टाकून, विषयापासून परावृत्त झालेली बुद्धिरूपी तरवार हस्तगत करून घ्यावी. " **दलें**— म्यान. **देह अहंतेचें**—देहावरील आसक्ति. हा माझा देह अशी आपुलकी हें अज्ञान असून, ती खऱ्या आत्मज्ञानाला झांकून टाकते. म्यान जसें तरवारीला झांकून टाकतें, तसें " शरीर माझें, आहे, तें शाश्वत आहे ! " अशी आसक्ति दर्शविणारें अज्ञानही, खऱ्या आत्मज्ञानाला आवरण घालणारें आहे. तरवार परजतांना म्यान जसें बाजूला टाकावें लागतें, तसेंच संसार असार आहे, हें पटविणाऱ्या ज्ञानाचा उपयोग करतांना, वरील अज्ञानही बाजूला सारलें पाहिजें. **एके वेळे सांडूनि**— एकदम खाडकन् बाजूला सारून. **प्रत्यक्बुद्धिकरवालें**— जागतिक विषयांपासून

परतलेली आहे, विरक्त झाली आहे अशी बुद्धिरूपी तरवार. अशी अनासक्तबुद्धि म्हणजेच ज्ञानाची प्रथमावस्था होय. वर 'असंगशस्त्रेण' या गीतेच्या पदाचा हा अनुवाद आहे. **हातवसणें** — हस्तगत करून घेणें. **ओ. २३६**—" मग विवेकरूप साहाणेवर पाजवून, 'ब्रह्मास्मि' या बोधानें तें तीक्ष्ण केल्यावर पुरत्या विचाराने आपण एवढ्यानेंच प्रहार करण्यासाठीं उठाव करावा." वर जी प्रत्यक्‌बुद्धीची तरवार सांगितली, ती विवेकाच्या साहणेवर घासली पाहिजे. साहणेवर घासून शस्त्राला धार देतात. तशी प्रत्यग्बुद्धीला विवेकाची धार दिली पाहिजे. वैराग्यबुद्धि आत्मानात्मविचारावर घासली पाहिजे. अशी ही आत्मानात्मविचाराच्या संघर्षाने साधकाची वैराग्यबुद्धि 'अहं ब्रह्मास्मि' या प्रतीतीनें तीक्ष्ण होते. साधनाची बुद्धि सर्वत्र सम होते असा अर्थ. अशी समबुद्धि किंवा बुद्धीची साम्यावस्था फक्त साधकाने स्वतःच वैराग्य व आत्मनात्मविचाराने मिळवावयाची आहे. अशी साम्यावस्था प्राप्त होणें म्हणजेच खरें ज्ञान होणें. अशा ज्ञानानें मग साधकानें अज्ञानावर चाल करावी. **निसलें**— घासलें. **सणाणें**— तीक्ष्ण होतें. **उठणें**— चालून जावे. **ओ. २३७**— घाव घालण्यापूर्वी वीर आपली तरवार आपणास कितपत पेलते तें पडताळून पाहतो. त्याचेंच रूपक या ओवींत केलें आहे. "पुढें बळ आजमावण्यासाठीं तें निश्चयाच्या मुठीनें धरून मननपूर्वक एक दोन वेळ पडताळून पहावें." घाव घालण्यापूर्वी वीर आपलें बल आजमावण्यासाठीं आपली तरवार मुठींत धरून ती पडताळून पाहतो. येथे साधकानें निश्चयाची मूठ धरून आपली प्रत्यग्बुद्धिरूप तरवार मननपूर्वक पडताळावी. याचा अर्थ इतकाच कीं, साधकानें आपली वैराग्यबुद्धि ठाम निश्चित करून आतां आपल्या मनाची ज्ञानाच्या बाबतींत कितपत तयारी झाली आहे, हें त्यानें मननाच्या साह्यानें पहावें. जगांतील सर्व वस्तूबद्दल साधकाला अरुचि, विरक्ति उत्पन्न झाल्यावर, ती त्यानें निर्धारानें टिकविली पाहिजे. हा निर्धार किंवा निश्चय हीच या प्रत्यग्बुद्धि तरवारीची मूठ होय.

**ओ. २३८**— यानंतर या ज्ञानरूपी हत्याराशीं निदिध्यासानें आपण एकरूप झाल्यावर, मग आपल्यापुढें घाव घालण्यास तो संसारवृक्ष मुळीं उरणारच नाहीं. **निदिध्यास**— चित्ताची एकाग्रता, ऐक्य. ज्ञानाशीं ऐक्य झाल्यावर मग

अज्ञान राहणार कोठून ? प्रहार करतांना योद्धा आपल्या हत्याराशीं समरस होतो, तसेच साधकानें आपल्या आत्मज्ञानाशीं समरस, एक झाल्यावर, त्याचें अज्ञान उरणारच नाहीं. वरील २३२-२३८ ओव्यांत ज्ञानाचीं, वैराग्य, विवेक, ब्रह्मास्मि बोध, निश्चय, मनन व निदिध्यास इत्यादि साधनें, चित्तशुद्धीच्या दृष्टीनें सांगितलीं आहेत. या साधनांनीं चित्त शुद्ध झाल्यावरच आत्मज्ञान सुलभ होतें. **पुढे नुरैल**– मग पुढं घाव घालण्यापुरतं देखील कांहीं उरणार नाहीं. **ओ. २३९**-- असें हें आत्मज्ञानरूपी खड्ग अद्वैताच्या प्रभेनें, तेजानें उत्कर्ष पावल्यावर, तें त्या संसारवृक्षाला कुठंच उरूं देणार नाहीं. **आत्मज्ञान**– अहंब्रह्मास्मि, तें ब्रह्म मीच आहे असें ज्ञान, व **अद्वैत**—तें ब्रह्म किंवा परमात्मा व आत्मा एकच आहेत असें ऐक्य. आत्मज्ञानाला पुन: अद्वैताच्या तेजाची जोड मिळाल्यावर इतर सर्व वस्तु शाश्वत आहेत, हें अज्ञान राहत नाहीं. **खांडें**-तरवारीनें. **वाढें**—वृद्धीनें, प्रभावानें. **ओ. २४०**—त्यावेळीं म्हणजे असें आत्मज्ञान झाल्यावर मग या संसारवृक्षाचा वरचा भाग किंवा वरचें मूळ, किंवा खालचा शाखासमूह, चांदण्यांत मृगजल न दिसावें त्याप्रमाणें दिसत नाहीं. चांदण्या रात्रीं मृगजल जसें दिसणें अशक्य, तद्वत् ज्ञानाचा स्वच्छ प्रकाश सर्वत्र पडल्यावर अज्ञानमूल अशा या संसाराचें अस्तित्व भासणें शक्य नाहीं. मग वर संसारवृक्षाचें 'उर्ध्वमूल' व 'अधःशाखं' असें जें वर्णन केलें आहे, तसा तो दिसणेंच असंभाव्य. **चांदिणा**—चांदण्यात.

**ओ. २४१**— "याप्रमाणें हे वीरश्रेष्ठा! आत्मज्ञानरूपी तरवारीनें हा संसाररूप वर मूळ असलेला अश्वत्थ वृक्ष तोडून टाकून" **ओ. २४२**— "मग ही अमुक एक वस्तु आहे, असा भास ज्याच्या ठिकाणीं लुप्त झाला आहे, व अहंपणाविरहित अशी ज्याची प्रसिद्धि आहे, त्या आत्मस्वरूपाला, परब्रह्मस्वरूपाला आपण पाहिलें पाहिजे." **इदंता**—परब्रह्माशिवाय जगांतील इतर या, त्या अशा वस्तूंचें अस्तित्व. परब्रह्माच्या ठिकाणीं अशा आभासात्मक वस्तूंचा संभव नाहीं. **अहंता**–मी परब्रह्माहून निराळा आहे असें मानणाऱ्याचा अहंभाव. असा अहंभाव 'अहं ब्रह्मास्मि' या ज्ञानाच्या प्रतीतीनें परब्रह्मातच मिळून जाऊन लुप्त होतो. म्हणून परमात्मा हा मीपणाविरहित आहे अशी

प्रसिद्धि आहे. ज्याच्या ठिकाणीं इदंभाव व अहंभाव संभवत नाहीं, अशा परब्रह्माच्या स्वरूपाचें आकलन केलें पाहिजे. **वाळलें**— वर्ज केलें. **डाहारलें**— प्रसिद्धीस आलें. **आपलें रूप**— परमात्मस्वरूप. आत्मा व परमात्मा यांचें ऐक्य अनुभविलें पाहिजे असा अर्थ. **ओ. २४३**—" पण अज्ञानी लोक आरशाच्या साह्यानें, आपलें तोंड एकच असतां, तेथे दुसरें आहे असें मानतात, तसें मात्र तुम्ही करूं नका. " मुळांत आपलें तोंड एक असतां अज्ञाणी लोक आरशाच्या साह्यानें तेथे प्रतिबिंबरूपानें आणखी दुसऱ्याचें अस्तित्व मानतात, त्याप्रमाणें तुम्हीं देखील मूळ परमात्मा एक असतां, अज्ञानीपणानें त्याचीं अनेक स्वरूपें आहेत असें मानू नका. " एकं सद्विप्रा बहुधा वदंति ' अशी वस्तुस्थिति असल्यामुळे, प्रत्येकाचा आत्मा हाच परमात्मा होय, असें अद्वैत मनांत बाणून घ्या, असें श्रीकृष्णाचें अर्जुनास सांगणें आहे. **गावारें**- अज्ञानी लोक. हे लोक आपलें तोंड एक असतां येथे दोनीचीं, द्वैताची कल्पना करतात. तशी अज्ञानानें द्वैतकल्पना परमात्म्याच्या ठिकाणीं करूं नका असा भाव. **ओ. २४४**—" अद्वैतबुद्धीनें आपलें आपणास पाहणें तें याप्रमाणें असतें, हें आता सांगणार आहे. " **आपणाचि आपणेयातें**-आत्मा व परमात्मा यांचें ऐक्य पाहणें. सर्वाभूतीं एकच परमेश्वर पाहण्याची साम्यबुद्धि. **निरुतें**— निश्चित.

(**श्लोक ४**)-" नंतर सृष्टिक्रमाची ही पुरातन प्रवृत्ति ज्यापासून निघाली त्या आद्य पुरुषाला मी शरण जातो, अशा भावनेनें जेथें गेलें असतां कोणी पुनः परत येत नाहींत, तें स्थान शोधून काढावें. " **ओ. २४५**-" ज्याला पाहिल्याशिवाय पाहावयाचें असतें, व जाणल्याशिवाय जाणावयाचें असतें, अशा ज्या स्थानाला आद्यपुरुष किंवा परब्रह्म म्हणतात. " परब्रह्माचें स्वरूप चर्मचक्षूनीं पाहतां येत नाहीं, किंवा बुद्धीनेंही त्याचें आकलन होणें शक्य नाहीं. परमात्म्याचें स्वरूप अद्वैतभावनेनें, प्रतीतीनें जाणावयाचें असतें. जें स्थान केवळ ज्ञानदृष्टीनेंच पाहतां येण्यासारखें आहे, त्याला ' परब्रह्म ' म्हणतात. **ओ. २४६**—" तेथे उपाधीचा आश्रय घेऊन, वेद त्या स्थानाचें वर्णन करण्यास आपल्या जिभा घेऊन धावतात, व मग नांवारूपाचा व्यर्थ

कोलाहल करतात." परब्रह्माचें वर्णन करण्याचा प्रयत्न करतांना, वेद त्याला निरनिराळीं विशेषणे चिकटावितात, व त्याला निरनिराळीं नांवें देण्याचा व त्याचें स्वरूप असें आहे, तसें आहे, असें वर्णन करण्याचा कोलाहल करतात. पण इतकें करून वेदांना परब्रह्माच्या खऱ्या स्वरूपाचें आकलन मुळींच न झाल्यामुळें, त्यांना 'नेति नेति' असें म्हणत माघार घ्यावी लागली आहे. **वोथंबा**–आश्रय. **घेउनी श्रुती ६०**— वेद आपल्या जिभा लांब करतात. **बडंबा**— कोलाहल. **ओ. २४७**-- "पण स्वर्ग व संसार यांना कंटाळलेले, व योगज्ञानाचा आश्रय करणारे मुमुक्षु लोक, 'आम्हीं तेथून परत येणार नाही,' अशा प्रतिज्ञेनें जिकडे जाण्यास निघतात." "तें परब्रह्माचें स्थान असें आहे कीं, तेथून आम्हीं परत फिरणार नाहीं" अशा प्रतिज्ञेनें मुमुक्षु तेथें जातात. मुमुक्षु हे मोक्षाची, जन्ममरणाच्या फेऱ्यांतून सुटण्याची, इच्छा करणारे असल्यानें त्यांना संसाराची अथवा स्वर्गाची किंमत वाटत नाहीं. मुमुक्षूंना जन्म नको असल्यामुळें, त्यांना जेथून च्युति नाहीं, असें ब्रह्मपद हवें असतें. पहा— यद्गत्वा न निवर्तंते तद्धाम परमं मम "— भगवद्गीता. **उबगले**—कंटाळले. **योगज्ञान**- हठयोग व आत्मज्ञान. **वळघणें**— आश्रय करणें. **ओ. २४८**—" संसाराविषयीं विरक्त झालेले योगी, संसार मागें टाकून पैजेनें पुढें धाव घेतात व ब्रह्मदेवाच्या पदाचा लाभ करून देणाऱ्या कर्ममार्गाचा कडाही ओलांडून मागें टाकतात." परब्रह्मपद इतक्या महत्वाचें व योग्यतेचें आहे कीं, योगी लोक तें मिळविण्यासाठीं संसारच काय पण ब्रह्मदेवाचें स्थानही सोडण्यास तयार असतात. **कर्मकडा**- कर्ममार्गाचा कडा. अनेक प्रकारच्या बाह्यकर्मांनीं ब्रह्मदेवाचें पदही मिळूं शकतें. पहा- "कां शत एक जन्मां। जो जन्मौनि बाह्यकर्मा। करी तो चि ब्रह्मा। आनु नोहे ॥ ३१ ॥ अ. १५. ज्ञानेश्वरी. **होडां**- पैजेनें. **ओ. २४९**-" ज्या मूळच्या घरासाठीं ज्ञानी लोक आपल्या सर्व अहंतादि भावांचा झाडा देऊन पत्र घेतात." ज्ञानी पुरुष आपले अहं मम इत्यादि सर्व भाव टाकून, आपले मूळचे घर जें ब्रह्मपद त्याची सनद घेतात. **झाडा देउनि**—टाकून. अहंभाव टाकणें म्हणजेच परमात्मैक्य बाणणें होय, यानंतरच परब्रह्मपद प्राप्त होतें असा अर्थ. तात्पर्य या

एका ब्रह्मपदासाठीं मुमुक्षु, वीतराग, व ज्ञानी सर्वच आपापल्यापरी झटतात. **मूलघर**—परब्रह्मपद. जेथून सर्वांची उत्पत्ति आहे.

**ओ. २५०**–"ज्या परब्रह्माच्या अज्ञानामुळें जगांत अन्यथा ज्ञान उत्पन्न झालें, व ज्या अज्ञानानें नसतं 'मी तूं' जगांत रूढ केलं." परब्रह्माच्या खऱ्या स्वरूपाचा विसर पडल्यामुळें, माणसं विज्ञानाच्या, शास्त्रीय ज्ञानाच्या मागें लागलीं, व हेंच विज्ञान त्यांना खरें ज्ञान असें वाटूं लागलें. वास्तविक हें विज्ञान नाशिवंत आहे, व तें मिथ्या होय. शिवाय परब्रह्माच्या खऱ्या स्वरूपाचें म्हणजे आत्मापरमात्मैक्याचें ज्ञान विसरल्यामुळें, जगांत मी, तूं, असं द्वैत माजलं. वास्तविक प्रथम 'अहंब्रह्मास्मि' असं अद्वैतच होतं. पण याची विस्मृति झाल्यामुळें द्वैताचं बंड माजलं, असा भाव. **वस्तुचें**–परब्रह्माचें. **नेणणें**—अज्ञान. **ओ. २५१**—"किंवा जेथून या विश्वाची एवढी मोठी परंपरारूपी वेली एकाद्या दैवहीन माणसाच्या कोरड्या आशेप्रमाणें व्यर्थ वाढली." ज्या परब्रह्मापासून एवढा विश्वविस्तार एकाद्या दैवहीनाच्या वाढत्या आशेप्रमाणें वाढला. दैवहीनाची आशा जशी कोरडी व्यर्थ असते, तद्वत् परब्रह्मापासून झालेला हा जगविस्तार, फोल व मिथ्या आहे. **वेलांडी**–विस्तार. **ओ. २५२**–"ती पहिली वस्तु, परब्रह्म आपण एकट्यानेंचं जाणलं पाहिजे. परब्रह्म ही ज्याची त्यानेंच जाणण्याची वस्तु आहे, ज्याप्रमाणें थंडी, थंडीनेंच जाणावी लागते, त्याप्रमाणें परब्रह्म आपणच जाणावें लागतें." **हिंवणें**—थंड होणें. **ओ. २५३**—"हे पार्था! तें निजपद, आत्मस्वरूप, ओळखण्याची आणखी एक खूण आहे ती अशी कीं, ज्या वस्तूची भेट झाली असतां, तेथून परत येण्याचें कारणच नाहीं." ब्रह्मनिर्वाण किंवा ब्रह्मांत मिळून जाण्याचा मोक्ष मिळाल्यानंतर तेथून परत येण्याचा प्रश्नच उरत नाहीं. ब्रह्मांत मिळून गेल्याकारणानें जन्म मरण ही यातायात थांबते, मग परत येण्याचें कारण तरी काय? **ओ. २५४**—"महाप्रलयाच्या वेळचें पाणी जसें सर्वत्र सारखेंच भरलेलें असतें, तद्वत् आत्मज्ञानानें जे सर्वांना सारखे झाले आहेत, तेच त्या ब्रह्मपदाला जाउन मिळतात." अशा आत्मज्ञानी माणसांनाच ब्रह्मनिर्वाण प्राप्त होतें, असा भाव. यापुढें त्या शाश्वत ब्रह्मपदाला जाण्याची कोणाची पात्रता आहे, तें अनेक दृष्टांतांनीं स्पष्ट करतात.

(श्लोक ५)-" मान व मोह यांनीं जे विरहित आहेत, ज्यांनीं आसक्ति-दोष जिंकला आहे; अध्यात्मज्ञानाचे जे नित्य सेवन करतात, जे निष्काम व सुख-दुःखरूपी द्वंद्वापासून मुक्त झालेले आहेत, ते ज्ञानी पुरुष त्या शाश्वत पदाला जाउन पोंचतात." ओ. २५५-- ' वर्षाऋतूच्या अखेरीस ढग आकाशाला जसे सोडून जातात, तसें मोह व मान या विकारांना ज्यांच्या मनानें सोडलें आहे. " मोहमानातीत पुरुषांना ही पावसाळ्यानंतरच्या मेघांची सृष्टिविषयक उपमा दिली आहे. **वरिखा**— वर्षाऋतु, पावसाळा. **ओ. २५६**— निर्धन व निष्ठुर असा माणूस ज्याप्रमाणें आपल्या आप्तेष्टांकडून सोडला जातो, त्याप्रमाणें आपल्या विकारांच्या वेटाळ्यात जे सांपडत नाहींत. " आप्तेष्ट जसे त्या निर्धन निष्ठुर माणसाला सोडतात, तसे हे ज्ञानी देखील विकारांना सोडतात. **निकवड्या!**— ज्याच्याजवळ कवडीही नहीं. अशा माणसास, निष्कांचनास. **निष्ठुर**-- कठोर-हृदयी. पैसे जवळ असूनही आप्तेष्टांच्या उपयोगी न पडणारा. **उबगिजे**-कंटाळा केला जतो सोडला जातो. **नांगवते**- न सांपडती. **विकारा वेटाळीं जे नांगवाति**-विकाराच्या मिठींत जे सांपडत नाहींत. ओ. **२५७**-विणारी केळ ज्या-प्रमाणें उन्मळून पडते, त्याप्रमाणे आत्मज्ञानाच्या लाभानें ज्यांची क्रिया हळुहळु थांबते. केळ व्याली कीं, तिचे कार्य संपलें, त्याप्रमाणें आत्मज्ञान झालें कीं, आपलें कार्य संपलें असें समजून, हे ज्ञाते आपले जागतिक व्यापार, कामें, करण्याचे थांब-वितात. **फलती**— घड पडलेली **आत्मलाभें**-ब्रह्मसाक्षात्काराच्या लाभानें. **ढाळें ढाळें**- हळूहळू. **गळती**—थांबणारी. ओ. २५८- " वृक्षाला आग लागली असतां, त्यावरचे पक्षी ज्याप्रमाणें त्याला सोडून जातात, तद्वत, विकल्पांनी ज्यांना ( ज्या ज्ञात्यांना ) सोडलें आहे." **विकल्पीं** -विकल्पानीं. अध्यात्मविचाराबद्दलच्या नसत्या शंकाकुशंकानीं. ज्यांच्या मनांत अध्यात्मज्ञाना-बद्दल नसते तर्ककुतर्क नसतात. **सैरा**— आजूबाजूला. ओ. २५९— हे अर्जुना आणखी एक कीं, " ज्या द्वैतबुद्धिरूप भूमीवर सकल दोषरूप गवत वाढतात त्या भेदबुद्धीचें नांवही ज्यांना ठाऊक नसतें. **भेदबुद्धि**— हें माझें, हें तुझें ही द्वैतबुद्धि. इच्या मुळेंच माणसांत लोभ, राग, द्वेषादि विकारांचे दोष उद्भवतात. म्हणून भेदबुद्धीच्या जमिनीवर अशा विकारांचें गवत उगवतें असें म्हटलें आहे. **अंकुरैजति**-अंकुर

फुटलें जातात. **काह्राणी**-- गोष्ट. ज्या ज्ञात्या पुरुषांना भेदबुद्धीचें नांवच माहित नाहीं, त्यांच्यांत मग विकारदोष कुठलें उत्पन्न होणार ? **ओ. २६०**–' सूर्योदयाबरोबर रात्र जशी आपोआप नाहींशी होते, त्याप्रमाणें आत्मज्ञानाचा उदय झाल्यामुळें, ज्यांचा देहाभिमान अज्ञानासह नष्ट झालेला आहे." आत्मा हा अविनाशी व देह हा विनाशी, नाशवंत आहे, हें ज्ञान झाल्यामुळें, ज्या ज्ञानी पुरुषाची देहाबद्दलची आसक्ति अज्ञानासह नाहीशी झालेली आहे. देह हा शाश्वत आहे, असें वाटणें हेंच अज्ञान होय. असें अज्ञानही, आत्म्याचें खरें अविनाशी स्वरूप कळलें असतां, राहत नाहीं. **सरिसि**–बरोबर. **ओ २६१**-- " आयुष्यहीन प्राण्याला ज्याप्रमाणें शरीर अकस्मात् सोडतें, त्याप्रमाणें अज्ञानांतल्या द्वैतबुद्धीनें ज्यांना सोडलें आहे. " ज्याचें आयुष्य संपलं आहे, अशा प्राण्यांचें शरीर तात्काळ गळून पडतें. तद्वत या ज्ञानी माणसांनांही त्यांची द्वैतबुद्धि सोडते. त्यांच्या ठिकाणीं द्वैत राहतच नाहीं. असा भाव. **निदसुरें**- झोपेंतलें, अज्ञानांतलें. हें सुख हें दुःख अशी द्वैतबुद्धि, अज्ञानांतच उत्पन्न होते. पण ज्ञानीमाणसांत सर्वत्र समबुद्धीचें ज्ञान सांठलेलें असल्यानें, त्याच्या ठिकाणीं हे द्वैत राहतच नाहीं. **ओ. २६२**—वरील गोष्टच आणखी दुसऱ्या दृष्टांतानें सांगतात. " लोखंडाला भेटण्याचें परिसाला जसें संकट पडत, किंवा रवि जसा अंधाराला भेटत नाहीं, तसाच या ज्ञानी लोकांना द्वैतबुद्धीचा दुःष्काळ असतो. " लोखंडाचें सोनें करणारी परिस ही एक धातु आहे. तिच्या नुसत्या स्पर्शानें लोखंडाचें सोनें होतें. पण ही धातु दुर्मिळ असल्यानें, परिसाला लोखंड भेटणें जसें कठीण, तद्वतच ज्ञान्यांनादेखील द्वैतबुद्धीचा स्पर्श होणें मुष्कील. **दुकलु**- दुष्काळ. दुष्काळांत पदार्थ जसे दुर्मिळ होतात, त्याप्रमाणें ज्ञान्यांना द्वैतबुद्धि दुर्मिळ होते. त्यानां द्वैतबुद्धि राहातच नाहीं असा भाव. **जेया**- ज्या ज्ञानी पुरुषांना. **ओ. २६३**- " हे अर्जुना ! देहाचा अभिमान धरणाऱ्या इतर अज्ञानी माणसांना जीं सुखदुःखांचीं द्वंद्वें दृष्टीस पडतात तीं ज्यांच्या ( ज्ञान्यांच्या ) समोर देखील उभी राहत नाहींत. **द्वंद्व**- अज्ञानी लोकांना अमुक गोष्ट सुखाची, अमुक गोष्ट दुःखाची अशी भेदबुद्धि असते. ज्ञान्यांची सर्व वस्तूंविषयीं समदृष्टि झालेली

असल्यानें, त्यांच्यापुढें या सुख:दु:खात्मक वस्तूंच्या जोड्या उभ्याच राहत नाहींत. **देहिया** – देहाभिमान बाळगणाऱ्या अज्ञानी माणसांना, हा सुख-दु:खांचा भेद जाणवतो. **गोचरें**-दिसतात, अनुभवास येतात. **समोहरें होंति**– समोर उभीं राहतात. **ओ. २६४**– " स्वप्नांत मिळालेलें राज्य किंवा आलेलें मरण, माणूस जागा झाला म्हणजे जसें त्याच्या हर्षाला किंवा दु:खाला कारण होत नाहीं. " कारण स्वप्नांतल्या सर्व घटना खोट्याच असतात. माणूस जागा झाला म्हणजे स्वप्नांत पाहिलेल्या सुखदायक गोष्टीबद्दल आनंद व दु:ख-दायक गोष्टबिद्दल दु:ख जसें त्याला वाटत नाहीं, तद्वत् सुख काय किंवा दु:ख काय सारखेंच, असें समतेचें ज्ञान ज्याला झाले आहे, त्याला या सुखदु:खात्मक भेदानें आनंद किंवा दु:ख होण्याचें कारण राहत नाहीं. **ओ. २६५**-- सर्पाकडून गरुड जसा ग्रासला जात नाहीं, त्याप्रमाणें जे ( ज्ञाते ) सुख–दु:ख व पुण्य-पाप अशा द्वैतांच्या जोड्यांकडून ग्रासले जात नाहींत. ज्ञानीपुरुषाला सुख व दु:ख किंवा पुण्य व पाप ही सारखींच वाटतात. सुखाच्या किंवा दु:खाच्या व पुण्याच्या किंवा पापाच्या प्रसंगीं त्यांचें मन विचलित होत नाहीं. म्हणून अशा द्वैतांत ते गुरफटतच नाहींत. याप्रमाणें ज्ञाते पुरुष हे द्वंद्वातीत असतात, असा भाव येथे व्यक्त केला आहे. **दंदिं**– ' द्वंद्व ' याचें अपभ्रष्ट रूप आहे. **नेघपिजति**-ग्रासले जात नाहींत. **ओ. २६६**– या ओवींत ज्ञात्या पुरुषांवर नीर क्षीर यांची निवड करणाऱ्या राजहंसाचें रूपक केलें आहे, " आणि नश्वरवस्तुरूपी पाणी एकीकडे करून विचारी पुरुषरूपी राजहंस, शाश्वतवस्तुरूपी दुग्ध सेवन करतात. " राजहंस जसे पाणी एकीकडे व दूध एकीकडे काढतात, त्याप्रमाणें विचारी ज्ञाते पुरुष, मायानि-र्मित वस्तु व परब्रह्म यामध्यें असलेली भिन्नता दर्शवितात. **अनात्म-वर्ग**— मायानीर्मित नामरूपात्मक जग. **आत्मरस**— परब्रह्मरूपी दुग्ध. ज्ञानी पुरुष मायानीर्मित जगाचा पसारा व परब्रह्म यांमध्यें निवड करून, जग मिथ्या आहे हें जाणतात व परब्रह्माशीं ऐक्य पावतात. **ओ. २६७**- " ज्याप्र-माणें पृथ्वीवर पाऊस पाडून, सूर्य तेंच पाणी आपल्या किरणांनीं पुन: आपल्या ठिकाणींच शोषून घेतो. " पाऊस पाडणें व तेंच पाणी आपल्या ऊष्णतेनें शोषून घेणं, ही देण्याघेण्याची सूर्याची क्रिया सारखी चालूच असते. **वरिखोंनि**—

वर्षात्र करून. **रस**— पाणी **अंशुमाली**— सूर्य. **रश्मिजालीं**— किरणांच्या समुदायानें, **बिंबासि**— रविबिंबाप्रत.

**ओ. २६८**—" त्याप्रमाणें आत्मस्वरूपाची भ्रांति पडल्यामुळें, जें परब्रह्म, बारा वाटांनीं पसरलें जातें, तेंच आत्मदृष्टीनें जे ( ज्ञाते ) एकत्र आणतात, " परब्रह्मांच्या त्या भिन्न भिन्न स्वरूपाचें ऐक्य करतात. तीं सर्व स्वरूपें म्हणजे एक परब्रह्मच आहे असें जे ( ज्ञाते ) सिद्ध करतात. जग खरं आहे अशा आज्ञानानं एकदा पच्छाडलं कीं, एकट्या परब्रह्मावर नामरूपात्मक जगाचा खोटा आरोप होऊं लागतो. अज्ञानाच्या किंवा मायेच्या प्रभावानें एकमेव असणाऱ्या परब्रह्मापासून हें विविधस्वरूपाचें विश्व निर्माण झालें, अशी समजूत होते. वास्तविक हें विश्व खरें नसून, वरील अज्ञान किंवा माया बाजूला सारली, तर ब्रह्म हेंच एकटें उरणारें आहे, या सिद्धांताची प्रतीति ज्ञाते पुरुष घडवितात. **वस्तु**— परब्रह्म. **आत्मभ्रांतिसाठिं** - आत्म्याबद्दलच्या अज्ञानामुळें. **विखुरली इ.**— जें परब्रह्म बारा वाटांनीं पसरलें गेलें, मायेमुळें ज्या परब्रह्मापासून विविध स्वरूपाचें नामरूपात्मक जग निर्माण झाले. **एकवटिती**- एकत्र करतात. **आत्मदृष्टि**—(तृ.) परमात्माच केवळ खरा आहे, जग मिथ्या आहे, या ज्ञानदृष्टीनें. **ओ. २६९**-" फार काय पण गंगेचा ओघ जसा सागरांत मिळून जातो, त्याप्रमाणें ज्यांचे शुद्धविचार आत्मज्ञानाची निश्चिती पावलेल्या अंतःकरणांत निमग्न असतात. जे नेहमींच आत्मज्ञानाच्या विचारांत गढून गेलेले असतात. **आत्मेयाच्या निर्द्धारिं**-परब्रह्मस्वरूपाच्या निश्चितीच्या अंतःकरणांत. ज्या अंतःकरणांत अशा आत्मानात्मसिद्धांताची निश्चिति झाली आहे, अशांत. जे ज्ञाते पुरुष आत्मज्ञानाच्या विचारांत नेहमींच निमग्न असतात असा भाव. माडगांवकर व साखरेप्रतींत या ओवीला अर्वाचीन स्वरूप दिलें आहे हें उघड दिसतें. विवेकाला गंगेच्या शुद्ध प्रवाहाची दिलेली उपमा अत्यंत सार्थ आहे. **ओ. २७०**—" शिवाय सर्वत्र आकाश सारखेंच भरून राहिल्यामुळें, एकाजागेहून दुसरीकडे, जाणे, आकाशाला जसें शक्य नाहीं, त्याप्रमाणें आपणच सर्वत्र भरून राहिलो आहों, ( आत्मवत् सर्व भूतानि ) अशी जाणीव झाल्यामुळें, ज्यानां ( ज्ञात्यांना ) कसलाच लोभ किंवा इच्छा उरलेली नसते. " **आघवांचि इ०**— सर्वत्र आपणच

आपलाच आत्मा व्यापून राहिला आहे, अशी साम्यावस्था. **पऱ्हा—**पलीकडे. आकाश हे एकजिनसी व सर्वत्र व्यापून राहिल्यामुळे, त्याला येथून तेथे अशी जागा बदलणें जसें शक्य नाहीं, त्याप्रमाणें ज्या ज्ञानी पुरुषांची वृत्ति अशी एकजिसनी, व्यापक, व सम झाली आहे, त्याना कसलाच अभिलाष राहत नाहीं. त्यांची वृत्ति व्यापक होते असा भाव. **ओ. २७१**— "ज्वालामुखीपर्वता-वर कसल्याच बीजाचा अंकुर जसा उगवत नाहीं," तद्वत् ज्यांच्या (ज्ञात्यांच्या) मनांत कोणत्याच विकाराचा उद्भव होत नाहीं. राग, लोभ, मत्सर, मद, इत्यादि विकार ज्याच्या मनाला स्पर्श करीत नाहींत. ज्वालामुखी पर्वताचा पृष्ठभाग जसा अग्नींत दग्ध झालेला असतो, त्याप्रमाणें या ज्ञानी पुरुषांची मनें देखील ज्ञानानें दग्ध झालेलीं असतात. या ओवीनंतर माडगांवकर व साखरेप्रतींत ज्या दोन अधिक ओव्या दिल्या आहेत, त्यांत कोणते विकार या ज्ञात्यांच्या मनात उद्भवत नाहींत, हें थोड्या विस्तारानें सांगण्यासाठीं, कोणी तरी मागून त्यांची रचना केली असावी हें स्पष्ट दिसते. **ओ. २७२**— ' हें असें असंघटित किती म्हणून बोलावें ! ज्याप्रमाणें रजःकण वाऱ्यापुढें टिकत नाहींत, त्याप्रमाणें ज्याना ( ज्या ज्ञात्याना ) विषयाचें नांव देखील आवडत नाहीं. " **विषय—** मोह पाडणाऱ्या जगांतल्या वस्तु, ज्याच्या पुढें उभ्याच राहत नाहींत **असं-घटें**—असंगत, मुळाला सोडून, पाल्हाळिक. **ओ २७३**--याप्रमाणें जे (ज्ञाते) कोणी ज्ञानरूपी अग्नीनें असे दग्ध केले आहेत, तेसोन्यांत सोनें मिळून जावे, त्याप्रमाणें परब्रह्मांत मिळून जातात. ज्ञानानें ज्याचें चित्त पूर्णपणे शुद्ध झालें आहे, ज्यांचीं मनें पूर्णपणें निष्काम झालीं आहेत, असेच ज्ञाते पुरुष आत्मैक्याचा आनंद उपभोगतात. सोन्यांत सोनें जसें एकरूप होतें, त्याप्रमाणें या ज्ञात्यांचे ज्ञानामुळें सोनें झालेलें असतें, व तें मग परब्रह्मरूपीं सोन्यांत पूर्णपणें मिसळण्यास वेळ लागत नाहीं. ज्ञात्यांची निष्काम बुद्धीमुळें झालेली केवल स्थिति व परब्रह्माची मूळची केवल स्थिति सारखी होते, म्हणुनच परस्परांना एकरूप होण्यास अडचण पडत नाहीं. **ज्ञान-हुताशें-** ज्ञानाग्नीनें. **ओ. २७४**—' आतां तेथे म्हणजे कोणत्या ठिकाणीं असें जर तूं विचारशील, तर ते ठिकाण असें आहे कीं, ज्याला नाशच संभवत नाहीं. ' भगवान् अर्जुनाला म्हणतात कीं, मागील ओवींत

'तेथ' असें म्हटलें. त्यावरून कोणत्या ठिकाणीं असा जर तुझा प्रश्न असेल, तर तें ठिकाण असें आहे कीं, त्याला नाश म्हणून नाहीं. **पद नाहिं इ.** — ज्या पदाला व्यय, खर्च, नाश नाहीं. परब्रह्मपदाला नाश नाहीं. इतर इंद्रपद, राज्यपद, इत्यादि पदें विनाशी आहेत. साधकाचें पुण्य संपलें कीं, या पदांचा अवतार संपला. तेथून त्या साधकाला परतावेंच लागतें. हें परब्रह्मपद तसें नाहीं. तेथे गेलेला पुरुष पुन: परत येतच नाहीं. हें पुढील श्लोकांत सांगितलेंच आहे. **ओ. २७५**—" पाहूं गेलें असतां दिसावें, जाणूं गेलें असतां जाणावें, किंवा अमुक एका वस्तूप्रमाणे तें आहे असें वर्णन करतां यावें, असें जें नाहीं." जें परब्रह्म चक्षुरिंद्रिय, किंवा वाचें-द्रिय यांच्या पलीकडचें असून पुन: बुद्धीच्या आटोक्याबाहेरचें आहे. ज्याचें ज्ञान साध्या बाह्य इंद्रियांनीं होणें शक्य नाहीं. फार काय बुद्धीनेंही त्याचें आकलन होणार नाहीं, असें त्याचें स्वरूप आहे. तें अमक्या वस्तूप्रमाणें आहे असेंही वर्णन करतां येण्यासारखें नाहीं. कारण तें कसलें आहे, हें जेथे कोणाला समजलेलें नाहीं तेथे त्याच्यासारखी दुसरी वस्तु तरी कशी दाख-वितां येणार ?

( **श्लोक ६** )- " तें (माझें स्थान) ना सूर्य, ना चंद्र, ना अग्निही प्रका-शित करीत नाहीं. जेथें गेलें असतां कोणी परत येत नाहींत, असें तें माझें परम स्थान होय." या श्लोकातील 'परमं धाम' याचा अर्थ "परब्रह्म" असून, त्याला दुसऱ्याच्या प्रकाशाची अपेक्षा नाहीं, हें येथे स्पष्ट केलें आहे. **ओ. २७६**— "दिव्याचा लखलखाट किंवा चंद्राचा प्रकाश ज्याला उजळील, फार काय सूर्य ज्याला प्रकाशित करील (असें तें नाहीं). सूर्य, चंद्र, अग्नि हे जगाला प्रकाश देतात. पण परब्रह्माला त्यांची जरूरी नाहीं. उलट परब्रह्मापासूनच त्यांना प्रकाश मिळतो. **बंबाल**--लखलखाट. पहा-- " प्रमाणांचा बंबाळ दिवा। न देखे वेदांचा मांदि मेळावा। आगम नाहीं रीगावां । तुझां स्वरूपीं ॥ ५३६ ॥- उद्धवगीता. **चांदु**—चंद्र. **अंशुमाली**—सूर्य. **ओ. २७७**-' या सर्वांच्या प्रकाशानें जें दिसणें, तें ज्याचें ( परब्रह्माचें ) न दिसणेंच होय. ज्याच्या लपण्यानें विश्वाचा भास उत्पन्न होतो. ' सूर्य, चंद्र, अग्नि यांच्या साह्यानें इतर वस्तूंचें जें दिसणें, तें या परब्रह्माचें दिसणेंच नव्हे. इतर वस्तूंचे दिसणें, हें

मिथ्या व अज्ञानमूलक आहे तर परब्रह्माचें स्वरूप ज्ञानमय व सत्य आहे. असा त्यांच्या स्वरूपांतच मुळीं भेद आहे. परब्रह्मावर मायेचें आवरण पडून तें झांकलें गेलें, म्हणजे नामरूपात्मक मायामय जग निर्माण होतें. म्हणून वर परब्रह्म लपलें असतां, जग भासमान होतें असें म्हटलें आहे. वास्तविक परब्रह्माचा जर सर्वत्र ज्ञानमय प्रकाश पडेल, तर जगाचा भास निर्माणच होणार नाहीं. **ओ. २७८**-- " जों जों शिंपीचा भास कमी होत जातो, तसतसें तें रुपें आहे हें खरें वाटूं लागतें. किंवा दोरीचा भास कमी झाल्यानंतर सापाची स्पष्टता होते. " उन्हांत शिंप हें रुपेंच आहे असा भास होतो. किंवा लांबून दोरी सापच आहे अशी भासते. पण जवळ गेल्यावर ती शिंप नाहीं असें ठरल्यावर तें रुपेंच आहे, किंवा ती दोरी नसून तो सापच आहे असा निश्चय होतो. जग व परब्रह्म यांचें असेंच आहे. जगाच्या मिथ्यात्वाचें जों जों ज्ञान व्हावें तों तों तेथे जग नसून परब्रह्मच आहे अशी खात्री होतें. **स्फारां होइजे**— स्पष्ट होतें. तुलनार्थ पहा —" तूं जेया प्रतिलपसि । तेया जग हें दाविसि । प्रकट तैं करिसी । आघवें तूं ॥ ४ ॥—अध्याय १४-ज्ञानेश्वरी. **ओ. २७९**- " त्याप्रमाणें हे सूर्यचंद्रादि जे आपल्या प्रकाशानें मोठे वाटतात, ते ज्याच्या ( परब्रह्माच्या ) अंधारानेंच केवळ प्रकाशतात. " परब्रह्म मायेनें, अज्ञानानें झाकलें गेलें कीं, नामरूपात्मक जगांतील सूर्य, चंद्र इत्यादि ग्रहगोलकांचा मिथ्या भास, खोटें अस्तित्व, खरें वाटूं लागते. परब्रह्माचें ज्ञान लुप्त झालें कीं, सूर्यचंद्रासारख्या जागतिक वस्तू खऱ्या वाटूं लागतात **ओ. २८०**- " अशी ही वस्तु ( परब्रह्म ) तेजाचा केवळ ठेवा असून, सर्व भूतांशीं अंतर्बाह्य एकरूप झालेली आहे, व सूर्यचंद्रांच्या मनालाही जी प्रकाशित करणारी आहे. " परब्रह्मापासून सूर्यचंद्रानांही प्रकाश मिळतो, म्हणून तें तेजोराशी असून, सर्व स्थावरजंगमवस्तूंना अंतर्बाह्य व्यापून असल्यानें, तें सर्वभूतात्मकहि आहे. चंद्र हा परब्रह्माच्या मनापासून उत्पन्न झाला आहे. म्हणून परब्रह्माच्या मनोरूपी चंद्रसूर्यांनाही जें प्रकाश देतें. **ओ. २८१**-"म्हणून परब्रह्माच्या प्रकाशापुढें सूर्यचंद्रही अंधारांत पडतात. यामुळें व सर्व तेजस्वी वस्तूंना तेज देणारें असें या परब्रह्माचें स्वरूप आहे. **कडवसां**— अंधारांत.

ओ. २८२ — " आणि ज्याच्या प्रकाशाबरोबर सूर्यचंद्रासह सर्व जगाचा लोप होतो. ज्याप्रमाणें दिवस उगवतांच चंद्रिका व तारकापुंज लुप्त होतो. " परब्रह्माच्या ज्ञानाचा उदय होतांच, सर्व नामरूपात्मक मिथ्या जगाचा आपोआपच लोप होतो. प्रकाशि — ज्याच्या ज्ञानाच्या प्रकाशांत, ज्ञानाचा उदय झाला असतां. चांदि— चंद्रिका, चंद्रप्रकाश. ऋखें-तारकापुंज, नक्षत्रें. रा. आगाशांनी हें क्रियापद धरलें आहे तें बरोबर नाहीं. ओ. २८३- " किंवा जागे झाल्यानंतर स्वप्नांतली आकृति मावळते, किंवा संध्याकाळीं मृगजळ शिल्लकच राहत नाहीं. " डिंब- आकृति, मूर्ति. सांजोले- सांजवेळ, संध्याकाळच्या वेळीं. मृगतृष्णिका-मृगजळ. ओ. २८४—" त्याप्रमाणें ज्या वस्तूच्या ठिकाणीं कसला आभास म्हणून रहातच नाहीं, तें माझें मुख्य स्थान असें समज." ज्या वस्तूच्या ठिकाणीं 'ज्या परब्रह्माच्या ठिकाणीं' अज्ञानात्मक आभास किंवा भ्रम नाहीं, जें केवळ ज्ञानमय आहे, तें परब्रह्म माझें अधिकाराचे स्थान असें समज." पाटाचें—अधिकाराचें. ओ. २८५— " महासागराला मिळालेल्या ओघाप्रमाणें, ज्या ठिकाणीं गेलेल्यांनीं आपले पाऊल म्हणून परत फिरविलेंच नाहीं. " नेघति इ०- ज्यांनीं आपलें पाऊल मागें घेतलेंच नाहीं. वाउलें- पाउलें. परब्रह्मांत मिळून जाण्याचा मोक्ष मिळाल्यावर कोण कशाला परत मृत्युलोकाला येईल ? यालाच पुढील ओव्यांत आणखी दृष्टांत देतात. ओ. २८६— " किंवा मिठाची केलेली हत्तीण, समुद्रांत टाकली असतां, ती परतून माघारी जशी येत नाहीं." मिठाची हत्तीण समुद्राच्या मिठाच्या पाण्यांत जशी एकरूप होते, तसा परब्रह्माशीं ऐक्य पावलेला ज्ञानी पुरुष, त्यांपासून पुनः निराळा होत नाहीं. कुंजरी- हत्तीण. सूदली साती-- टाकली असतां. ओ. २८७- " किंवा आकाशांत गेलेल्या अग्नीच्या ज्वाळा, जशा खालीं परतून येत नाहींत, किंवा तापलेल्या लोखंडावर टाकलेलें पाणी जसें तेथून परत येत नाहीं. पहा-" तोयाचें परि नांवही न उरतें संतप्तलोहांतरीं "- हरीपंडीत, नीतिशतक. अग्नीच्या ज्वाळा जशा वर अंतराळांत मिळून जातांत, किंवा तापलेल्या लोखंडावर पाणी जसें नाहींसे होतें, तद्वत परब्रह्मांत मिळालेले ज्ञाते, पुनरपि जन्म घेण्यास परत येत नाहींत. ओ. २८८-- " त्याप्रमाणें शुद्ध ज्ञानानें जे माझ्याशीं ऐक्य पावले, त्यांची जन्ममरणाची

वाट मोडलीच." ते पुनर्जन्ममरणांपासून मुक्त झालेच. यापुढें २८९-२९६ या ओव्यांत, अर्जुन श्रीकृष्णाला प्रश्न विचारीत असल्याचा प्रसंग, ज्ञानेश्वरांनीं कल्पिला असून, तो मूळ भगवद्गीतेंत नाहीं. येथे वास्तविक ज्ञानेश्वरांनीं आपणच एक शंका उपस्थित करून तिचा श्रीकृष्णमुखानें परिहार केल्याचें दाखविलें आहे.
**ओ. २८९**- येथेच बुद्धिरूप पृथ्वीचा राजा असा अर्जुन, म्हणाला " महाराज ! माझ्यावर आपला अनुग्रह झाला आहे, तरी माझ्या एका विनंतीकडे आपण लक्ष द्यावें." पुढील ओवींत अर्जुनाची शंका दिली आहे. **प्रज्ञापृथिवीचा**-अर्जुन राजा होताच. पण येथे त्याला बुद्धीरूप पृथ्वीचा राजा म्हणून, बुद्धिश्रेष्ठ असाही त्याचा गौरव केला आहे. पुढील ओंवींत अर्जुन श्रीकृष्णांना जी विनंतिवजा शंका विचारीत आहे, तिला मूळ गीतेंत आधार नाहीं. हा प्रश्नोत्तराचा प्रसंग, ज्ञानेश्वरांनीं आपल्या विवेचनाला सौकर्य व पूर्णता येण्यासाठीं, मुद्दाम मोठ्या कौशल्यानें योजला आहे. वास्तविक " त्या स्थानाला पोचलेले परत येत नाहींत " असे ज्ञानी पुरुष परब्रह्मांत मिळून जातात हें खरें असलें, तरी अशा मीलनापूर्वी देखील त्या ज्ञान्यांचा आत्मा व परमात्मा यांचें ऐक्यच असल्यानें, ते ज्ञानी " त्या स्थानापासून म्हणजे परब्रह्मापासून परत येत नाहींत " अशा म्हणण्यानें एक शंका उद्भवते ती अशी कीं, हे ज्ञानी परब्रह्माच्या पदाला पोंचण्यापूर्वी, परब्रह्मापासून भिन्न होते कीं अभिन्न ? गीतेंतील यापूर्वीच्या विवेचनाच्या अनु-रोधानें, ज्ञानी हे परमात्मैक्य पावतात हें मान्य केल्यावर, अशी शंका सामान्य वाचकाला येणें शक्य आहे, व त्यामुळें ' यद्गत्वा इ० ' गीतेंतील उक्ति त्याला कदाचित् विसंगत वाटण्याचाही संभव आहे. ज्ञानेश्वरांनीं आपल्या सामान्य श्रोत्यांची अथवा वाचकांची ही शंका लक्षांत घेऊन, अर्जुनाच्याच तोंडानें ती श्रीकृष्णापुढें मांडल्याचा प्रसंग निर्माण करतांना, आपल्या विवेचनाच्या मागे भगवदुक्तीचा आभास मोठ्या समर्पकतेनें निर्माण केला आहे.
**ओ. २९०**— अर्जुनाची शंका अशी कीं, " तर जे देवाच्या स्वरूपांत जाऊन मिळाल्यावर माघारीं येत नाहींत, ते पूर्वी देवाच्या स्वरूपापासून भिन्न होते कीं एकरूपच होते ? " अर्जुनानें येथे श्रीकृष्णापुढें जी एक शृंगापत्ति निर्माण केली आहे, तीच पुढील ओव्यांतून मांडण्यांत आली आहे. **ओ. २९१**— **अर्जुन येथे आपल्या शृंगापत्तीची एक बाजू मांडतो. " ते देवापासून भिन्न**

आहेत असें जर अनादिकाळापासून ठरलेलें आहे, तर मग ते माघारी येत नाहींत असें म्हणणें विसंगत आहे. कारण मकरंद चाखण्यासाठीं फुलाला चिकटलेले भोंगे, काय फुलेंच होउन बसतात ? " येथे अर्जुनाच्या तोंडानें असा युक्तिवाद करण्यांत आला आहे कीं, भोंगे व फुलें हे मुळापासूनच परस्पर भिन्न असल्यामुळें, मकरंदासाठीं फुलाला चिकटले तरी भोंगे कांहीं फुलेंच होत नाहींत. तद्वत ज्ञानी व परमेश्वर हे जर मूलतःच भिन्न असतील, तर परमेश्वराच्या त्या परम धामाला पोंचल्यावर देखील, ते ज्ञानी कांहीं परमेश्वररूप होणार नाहींत. मग " त्या स्थानापासून ते परत येत नाहींत ' असें जें म्हटलें आहे तें विसंगत नाहीं काय ? ज्ञानी जर मूलतःच परमेश्वरापासून भिन्न असतील, तर ते परमेश्वराशीं एकरूप होणारच नाहींत; व तसे ते एकरूप झाले नाहींत, म्हणजे त्या परम धामापासून ते परत येणार नाहींत असेंही होणार नाहीं. तात्पर्य " ते माघारी येत नाहींत " या म्हणण्यांत अर्थ नाही. हीच आपली बाजू आणखी एका दृष्टांतानें मांडतात.

ओ. २९२—" दुसरें असें कीं, लक्ष्याहून वेगळे असे जे बाण, ते लक्ष्यावर सोडले असता, लक्ष्याला स्पर्श करून पुनः खालीं पडतातच, म्हणजे एकंदरीनें ते परत फिरतातच. " लक्ष्य (Target) व बाण हे परस्परापासून मूलतःच भिन्न आहेत. आता हे बाण लक्ष्यावर सोडले असतां, ते लक्ष्याला स्पर्श करतात, पण लक्ष्याशीं एकरूप होत नाहींत, तेथेच कांहीं ते चिकटून बसत नाहींत. थोड्या वेळानें कां होईना, ते तेथून खालीं पडतातच. याच न्यायानें बोलावयाचें झाल्यास, ते ज्ञानी व परमेश्वर हे जर मूलतःच भिन्न असतील, तर असे ज्ञानी परमेश्वराच्या त्या परम धामाला पोंचले, तरी वरील बाणांच्या दृष्टांताप्रमाणें ते कांहीं परमेश्वररूप होऊन तेथेच राहणार नाहींत. तेथून ते माघारे हे फिरणारच. मग गीतेत ' ते माघारे फिरत नाहींत ' असें जें म्हटलें आहे तें असंबद्ध नाहीं काय ? श्रृंगापत्तीची ही एक बाजू मांडल्यानंतर दुसरी बाजू पुढील ओवींत मांडतात. ओ. २९३— " किंवा ते ( ज्ञानी ) च तूं ( परमेश्वर) असें जर वस्तुतः असेल, तर कोणी कोणांत मिळून जायचें ? एकाद्या शस्त्रानें आपल्यालाच खोंचावें हें कसें घडेल? " अर्जुनाचें म्हणणें असें कीं, आतां ज्ञानी व परमेश्वर हे मुळापासूनच एक आहेत असें असेल, तर कोणी कोणाला जाऊन

मिळायचं ? ज्ञानी हेच जर परमेश्वर, तर मग ज्ञानी तेथे जाऊन परमेश्वराला मिळतात, या म्हणण्यांत कांहीं स्वारस्य नाहीं. एकाद्या शस्त्रानें आपणालाच जखम करणं जसं शक्य नाहीं, तसंच ज्ञानी व परमेश्वर अभिन्न असल्यामुळे, ज्ञान्यानें परमेश्वरांत मिळणे असंभवनीय होय. **रूपावें**- बोचावे, खोचावे. **ओ. २९४**– " म्हणून तुझ्याशीं अभिन्न असलेल्या जीवांचा तुझ्याशीं संयोग अथवा वियोग होतो, असें म्हणताच येणार नाहीं. कारण अवयवाचा शरीराशीं संयोग अथवा वियोगही असाच बोलतां येणार नाहीं. " येथेही अर्जुनानें दुसरा युक्तिवाद केला आहे. ज्ञानी व परमेश्वर हे जर एकच आहेत, तर ज्ञानी परमेश्वराला जाऊन मिळतात, व ते तेथून माघारें येतच नाहींत, अशी भाषा वापरणें त्याच्या मतें विसंगत आहे. कारण ज्ञानी व परमेश्वर हे जर एकच, तर त्यांच्या सयोग-वियोगाची भाषा बोलणें, सर्वथा अयुक्त होय. अवयवांचें शरीरांशीं ऐक्य असल्यामुळें, त्यांचा संयोग किंवा वियोग जसा म्हणतां यावयाचा नाहीं, तसाच प्रकार ज्ञानी व परमेश्वर यांचा आहे. अर्जुनानें दोनीं बाजूनीं श्रीकृष्णापुढें पेंचप्रसंग उत्पन्न करून ठेवला आहे. (१) ज्ञानी हे परमेश्वराहून भिन्न म्हटले तर परमेश्वराशीं मिळण्याचा व तेथून परत माघोर येण्याचा प्रश्नच होत नाहीं. ते परत येणारच. मग ' ते परत माघारे येत नाहींत ' हे म्हणणें विसंगत आहे. पुन: ( २ ) ज्ञानी हे परमेश्वराशीं अभिन्न, ऐक्य पावलेले आहेत असें म्हटलें, तरीही मग त्यांच्या मीलनाचा व तेथून परत येण्याचा प्रश्नच उद्भवत नाहीं. कारण ज्ञानी हेच जर परमेश्वर, तर मग कोणी कोणाला मिळावयाचें, व कोणी कोणापासून परत माघारीं यावयाचें ? याप्रमाणें परत माघारीं येणारा कोणी उरतच नसल्यानें, ' यद्गत्वा न निवर्तंते ' ही गीतेची उक्ति, याही दृष्टीनें विसंगतच आहे. ज्ञानेश्वरांनीं येथें अर्जुनाच्या शंकेच्या रूपानें हा जो शृंगापत्तीचा अभिनव प्रसग कल्पिला आहे, त्याचेच त्यांनीं श्रीकृष्णाच्या तोंडून ओ. २९८ पासून पुढें स्पष्टीकरण केलें आहे. त्या ' परमधामाला ' जाणारे ज्ञानी पुरुष, तेथे जाण्यापूर्वी ईश्वराशीं भिन्न होते कां अभिन्न ? हाच अर्जुनाचा मुख्य प्रश्न असून, त्याच्याच अनु–रोधानें कोणीकडून पाहिलें, तरी गीतेच्या वरील उक्तींत विसंवाद असल्याचा युक्तिवाद त्यानें केला आहे. अर्जुन श्रीकृष्णाला हाचि गोष्ट शेवटीं स्पष्टपणें विचारतो.

**ओ. २९५**— " शिवाय जे तुझ्यापासून नेहमींच वेगळे किंवा भिन्न आहेत, त्याचे तुझ्याशीं कोणत्याच ठिकाणीं मीलन होणे शक्य नाहीं. मग ते ( तुझ्याकडे ) जातात, व तेथे गेल्यावर माघारे येत नाहींत, या म्हणण्यांत तरी अर्थ काय ? " **ओ. २९६**— " तर सर्वत्र मुखे असणाऱ्या श्रीकृष्णा ! तुझ्याशीं ऐक्य पावून पुनः तेथून माघारी परत न येणारे असे आहेत तरी कोण, तें मला समजावून सांग. " आपण टाकलेली शृंगापत्ति, श्रीकृष्ण कोणत्या ना कोणत्या कोटिक्रमानें सोडविल्याशिवाय राहणार नाहीं, अशा विश्वासानेंच येथे श्रीकृष्णाला 'विश्वतोमुखा' असें साभिप्राय विशेषण लावलें आहे. नित्याच्या व्यवहारांत आपणास दुतोंडी माणसें आढळतात, व तीं शब्दांचे भिन्न भिन्न अर्थ करून प्रतिपक्ष्याचें शाब्दिक शरसंधान परतवून लावतात. श्रीकृष्णाला तर बोलून चालून असंख्य मुखें असल्यामुळे, आपण उभारलेली शृंगापत्ति तो आपल्या द्व्यर्थी चतुर कोटिक्रमानें सहज उडवून लावील, अशी अर्जुनाला खात्री होती. म्हणुनच ' विश्वतोमुखा ' हे ध्वन्यर्थी उपपद, श्रीकृष्णाला येथे मुद्दाम लावलें आहे. **बुझावि**— समजून सांग. पहा-- ' बुझावूं शकेना विधाता तयाला '—नीतिशतक—हरिपंडित. **ओ. २९७** " अर्जुनाची ही शंका ऐकून, व आपल्या शिष्याची ही विषय समजून घेण्याची बुद्धि पाहून, सर्व ज्ञान्यांचे प्रमुख अशा श्रीकृष्णाना परम संतोष वाटला. " अर्जुनानें अशी चतुर शंका काढावी, हें आपले विवेचन त्याने किती लक्ष देऊन व आस्थेनें ऐकलें याचें गमक होय, असें श्रीकृष्णाला वाटल्याने, अर्जुनाच्या शंकेनें त्याला आनंद झाला. वास्तविक अर्जुनाला जी शंका आली, ती उद्भवण्यास आपलें प्रवचनाचें त्यानें लक्षपूर्वक केलेले श्रवणच कारणीभूत झालें असें वाटल्यामुळें, श्रीकृष्णांना अर्जुनाच्या या श्रवणभक्तीमुळेंच आनंद झाला असला पाहिजे. शिष्यानें मार्मिक प्रश्न विचारलें कीं, गुरूला जो आनंद होतो, त्याचें रहस्य देखील हेंच कीं, गुरूला आपल्या शिष्याच्या समजूतदारपणाचें कौतुक वाटतें. **बोधु**—विषय समजून घेण्याची बुद्धि. **ओ. २९८**-अर्जुनाच्या शंकेला येथून ज्ञानेश्वरानीं श्रीकृष्णाच्या मुखानें उत्तर दिलें आहे. " मग भगवान् म्हणाले, ' हे महामते ! अर्जुना ! माझ्याकडे आल्यावर पुनः ते माघारी परत येत नाहींत म्हणून जे सांगितले, ते (माझ्याकडे येण्यापूर्वीं) माझ्यापासून भिन्न व अभिन्न अशा दोन प्रकारचे असतात. " पुढील ओवींत

श्रीकृष्णांनीं उत्तर देतांना कोटिक्रम योजला आहे, व तो उपनिषदांतील परस्पर विरोधी वाटणाऱ्या वचनांचें स्पष्टीकरण करतांना योजलेल्या श्रीशंकराचार्यांच्या अशाच कोटिक्रमाहून भिन्न नाहीं. **ओ. २९९**— " जर खोल विचार करून पाहिलें, तर ते ज्ञानी पुरुष ( माझ्याकडे येण्यापूर्वी ) वास्तविक मीच होते, पण वरवर पाहिल्यास, ते माझ्याहून भिन्न आहेत असें वाटतें. " श्रीकृष्णांचें म्हणणें असें कीं, आत्मा व परमात्मा यांचें ऐक्य नेहमींच आहे, अशा अद्वैत दृष्टीनें पाहणाऱ्याला, ते ज्ञानी पुरुष परमेश्वरांशीं नेहमींच ऐक्य पावलेले, म्हणजेच अभिन्न असेच दिसतील. पण नित्याच्या व्यावहारिक द्वैत बुद्धीनें जर त्यांच्याकडे पाहिलें, तर तें परमेश्वरापासून वेगळेच दिसणार. **खोलें विवेकें**-खोल विचारानें, अद्वैत दृष्टीनें. **आहाच वाहाच**-वरवर, व्यावहारिक दृष्टीनें. सारांश ज्ञानी दृष्टीला, ते ज्ञानी पुरुष व परमेश्वर हे एकच आहेत असे दिसेल, तर अज्ञानी लोकांना ते एक नाहींत असें वाटेल. हेच ओ. ३०२ मध्यें स्पष्ट केलें आहे. **ओ. ३००**— मागिल व या ओवींत अर्जुनाच्या शंकेचें खंडन केलें असून, येथे व पुढलि ओवींत श्रीकृष्णांनीं आपलें उत्तर दृष्टांतांनीं स्पष्ट केलें आहे. " ज्याप्रमाणें पाण्यापासून उत्पन्न झालेल्या लाटा, पाण्यापासून भिन्न दिसतात, नाहीं तरी वास्तविक त्या लाटा शुद्ध पाणीच असतें. " श्रीकृष्णांचें म्हणणें असे कीं, लाटा या सर्वकाळ पाणीच असतात, मध्यंतरीं वाऱ्याच्या झुळुकेमुळें त्या पाण्याच्या लाटा आहेत असें भासतें. त्याप्रमाणें ज्ञानी पुरुष देखलि परमेश्वराला मिळण्यापूर्वी काय किंवा त्याला मिळाल्यावर काय, सदा सर्वदा परमेश्वरच असतात. ते परमेश्वरापासून भिन्न आहेत असें जें आपणास वाटतें, तें केवळ अज्ञानामुळें होय. आत्मा व परमात्मा हें एकच आहेत, या ज्ञानाबरोबरच ते ज्ञानी पुरुष व परमेश्वर हे एकच आहेत अशी आपली खात्री होते. **आपजतां**—उत्पन्न झाले असतां. **निखल**—शुद्ध, निवळ. **ओ. ३०१**—आणखी दृष्टांत देतात. " किंवा सोन्याचे दागिने सोन्याहून भिन्न भासतात. पण खरें पाहिलें असतां, ते सर्व सोनेंच असतात. " आपण सोन्याचेच निरनिराळे अलंकार करून त्यांना भिन्न भिन्न नांवें देतो, व मग ते अलंकार त्या सोन्यापासून अगदी निराळे आहेत अशी आपली समजूत होते. पण ही समजूत अज्ञानीपणाची आहे. कारण ते

दागिने घडविण्यापूर्वी व नंतर सोनेच असतात. त्याचप्रमाणें 'जीव' हे परमेश्वराला मिळण्यापूर्वी व नंतर, परमेश्वरच असतात. त्यांना ' जीव ' असें नांव ठेऊन आपण त्याना परमेश्वरापासून जें भिन्न मानतो, तें केवळ आपल्या अज्ञानीपणामुळेंच होय. ज्ञानेश्वरानीं येथे श्रीकृष्णांच्या मुखानें नामरूपात्मक जग, परमात्म्याहून कसें अभिन्न आहे, व आपल्या अज्ञानामुळेंच तें भिन्न आहे असें आपणास भासतें, याचें सोदाहरण विवेचन केलें असून, पुढील ओवींत हीच गोष्ट ते सिद्धांतरूपानें मांडत आहेत. **ओ. ३०२**— " त्या प्रमाणें हे किरीटि ! ज्ञानदृष्टीनें पाहिले असतां, ते ( ज्ञानी पुरुष ) माझ्या-पासून ( परमेश्वरापासून ) अभिन्नच आहेत; एरव्ही त्यांच्या भिन्नपणाचा जो उठाव दिसतो, तो अज्ञानामुळेच होय. " आत्मा परमात्मैक्याच्या दृष्टीनें पाहिलें असतां, ते ज्ञानी पुरुष व परमेश्वर हे एकच आहेत, पण ते परस्परापासून निराळे आहेत असें जें आपणास दिसते, तेंच आमचें अज्ञान होय. **ज्ञानाचिये दीठी**— ज्ञानाची दृष्टि, आत्मा व परमात्मा हे एकच आहेत ही अभेद-दृष्टि. **उठी**— उठाव, दिसणें. ज्ञानी व परमेश्वर हे भिन्न आहेत असें दिसणें. **अज्ञाना तव**- अज्ञानामुळेंच. (अज्ञानास्तव) **ओ. ३०३**— " खऱ्या परब्रह्माच्या विचारानें पाहिलें असतां, एकच असणाऱ्या माझ्यापासून कोणी दुसरें भिन्न किंवा अभिन्न आहे, असें कसें सागतां येईल ? " परब्रह्म ही एकच वस्तु जर खरी आहे व बाकीच्या कोणत्याही वस्तूला जर अस्तित्वच नाहीं, तर परब्रह्माहून अमुक वस्तु भिन्न आहे किंवा अमुक वस्तु एक आहे ही भाषाच संभवत नाहीं. " ब्रह्म हेच खरें, जग हें मिथ्या व जीव हा ब्रह्मच आहे दुसरा कोणी नाहीं, " हाच वस्तूचा विचार होय. या विचारानें पाहिलें असतां, परब्रह्माहून दुसऱ्या कोणत्याच स्थावरजंगमात्मक वस्तूंचें अस्तित्व संभवत नाहीं. मग तेथे त्यापासून अमुक भिन्न किंवा अमुक अभिन्न असें म्हणणें हें कसें शक्य आहे ? **साचोकारेनि**- खऱ्या. **वस्तुविचारें**-परब्रह्माच्या विचारानें. **भिन्नाभिन्नव्यवहारें**--अमुक भिन्न व अमुक अभिन्न अशा वाटाघाटीनें. **उपसिजैल**—सांगतां येईल. परब्रह्माचें एकत्व यापुढें निरनिराळ्या दृष्टांतांनीं पटवितात **ओ. ३०४**-" सर्व आकाश पोटांत घालून सूर्यबिंब जेव्हां आपल्या गोळ्यानें व्यापून राहतें, त्यावेळीं त्याचें प्रतिबिंब तरि कोठे दिसणार, व किरणें तरी

कशावर पडणार ?" जेथे वास्तविक सूर्याचें प्रतिबिंब दिसावयाचें, किंवा ज्याच्यावर त्याचीं किरणें पडावयाचीं, तें आकाशच जर सूर्यबिंबानें व्यापून टाकलें, तर सूर्यबिंबाशिवाय तेथें दुसरें काय दिसणार ? तशीच स्थिति परब्रह्माची आहे. हें एकमेव परब्रह्म सर्वत्र व्यापून राहिल्यामुळें, तेथें दुसऱ्या कोणत्याही वस्तूचें अस्तित्व संभवतच नाहीं. **सूनि**— घालून. **बिंब**—सूर्यबिंब. **आतें**— व्यापतें. **खोटी**-- (तृ) गोळ्यानें. **तैं प्रतिबिंब इ**॰-तेव्हां सूर्याचे प्रतिबिंब तरी कोठे दिसणार ? **रश्मि**-किरण. **ओ. ३०५**-"किंवा हे धनंजया ! प्रलयकालच्या पाण्याला बाहेरचे पाण्याचे लोट येऊन मिळतात काय ? म्हणून विकाररहित अशा एकट्या मला, विभाग किंवा अवयव तरी कोठले ? " प्रलयकालचें पाणी जसें स्वयमेव वाढणारें व विश्वाला बुडवून टाकणारें असल्यामुळे, त्याला बाहेरच्या पाण्याच्या लोटांची अपेक्षा नाहीं, तद्वत् विकाररहित, एकमेव व एकजिनसी अशा परब्रह्मालाही भेद व अभेद नाहींत व त्यालाही इतर कोणत्याही वस्तूची अपेक्षा नाहीं. तें देखलि प्रलयकालच्या पाण्याप्रमाणे स्वत:सिद्ध व सर्वव्यापी आहे असा भाव. **काइ ऽंत** — बाहेरून येऊन मिळणाऱ्या पाण्याचे लोट, त्याच्यांत भर घालतात काय ? **अविक्रिया**— विकाररहित अशा मला. **अंश**- विभाग, भिन्नता. याप्रमाणें परब्रह्माचें अद्वियत्व सांगितल्यावर, त्याच्या ठिकाणीं जें भिन्नत्व किंवा नानात्व भासेंत, तें मायेच्या उपाधिमुळेंच होय, हें पटविण्यासाठीं येथून आणखी कांहीं दृष्टांतांची योजना करण्यांत आली आहे. परब्रह्म वास्तविक एकच, एकमेव असेंच आहे. पण मायेमुळें त्याच्या ठिकाणीं आपणास हें नामरूपात्मक विविधस्वरूपाचें जग भासतें, हेंच येथे निरनिराळीं उदाहरणें देऊन सिद्ध केलें आहे. **ओ. ३०६**– " परंतु ओघाच्या अनुरोधानें सरळ असणारें पाणी जसे वांकडे दिसतें, किंवा पाण्याच्या संबंधानें एकमेव अशा सूर्याला दुसरेपणा प्राप्त होतो. " पाणी वास्तविक सरळच असतें. पण ओघ जर वांकडा असेल, तर तेंही वांकडें दिसतें. त्याचप्रमाणें सूर्यबिंब एकच आहे, पण पाण्याशीं त्याचा संबंध येऊन त्याचें प्रतिबिंब पाण्यांत पडलें कीं, एका सूर्याचे दोन सूर्य दिसूं लागतात. हा जो पाण्याला वांकडेपणा व सूर्याला दुसरेपणा आला, तो अनुक्रमें ओघाच्या व पाण्याच्या उपाधिमुळें, संबंधामुळें. त्याचप्रमाणें परब्रह्म हें एकमेव असूनही आप-

णास त्याच्या ठिकाणीं जें हें विविध स्वरूपाचें जग दिसतें, तें केवळ मायेमुळें, मायेशीं परब्रह्माचा संबंध आल्यामुळेंच होय. पाणी नसेल तर सूर्याचें प्रतिबिंब पडणार नाहीं व मग सूर्याला दुसरेपणाही प्राप्त होणार नाहीं. तद्वत् माया नष्ट होईल, तर परब्रह्माच्या ठिकाणीं विश्वाचा आभासही उत्पन्न होणार नाहीं, व परब्रह्माचें एकत्वही बाधित होणार नाहीं **मेळें**— अनुरोधानें, योगानें. **उजू**– सरळ. **तोयबगें**— पाण्याच्या संसर्गानें. बगा— संबंध. पुन: आणखी दृष्टांत देतात. **ओ. ३०७**— " आकाश चौकोनी किंवा वाटोळें असें आपणास कोठे तरी मिळेल काय ? पण घटमठांनीं व्यापलें असतां तें तसें होतें. " आकाश इतकें विस्तृत आहे कीं, त्याला कांहीं विशिष्ट आकार आहे, असें म्हणतां यावयाचें नाहीं. पण तेंच आकाश एकाद्या घागरींत कोंडलें असतां किंवा एकाद्या चौकोनि खोलीनें व्यापलें असतां, तें आपणास अनुक्रमें वाटोळें व चौकोनी भासतें. घागरीच्या व त्या चौकोनी खोलीच्या उपाधीनें, संसर्गानें आपणास हा भास निर्माण होतो. तसेंच परब्रह्म देखील मायेच्या उपाधीमुळें भिन्न जगदाकार भासतें असा अर्थ. **चौफळ**– चतुःकोण. **घटमठिं**--घटानें व मठानें. घटाकाश व मठाकाश अशी परिभाषा आपण ऐकतो. **वेंटाळलें**– गुंडाळलेलें, व्यापलेलें. घट हा वर्तुळाकार व मठ म्हणजे खोली ही चौकोनी असल्यानें, त्यांतील आकाश अनुक्रमें वर्तुळाकार व चौकोनी भासतें. पण खरें आकाश विस्तृत असून, त्याला चौकोनी किंवा वर्तुळाचा असा आकार जसा नाहीं, तशीच परब्रह्माला सुद्धां नांवाची, आकाराची अथवा रूपाची कसलीच मर्यादा अथवा उपाधि नाहीं.

**ओ. ३०८**—" अरे ! असें पहा कीं, झोंपेंतल्या स्वप्नांत मनुष्य ज्यावेळीं राजा म्हणून मिरवितो, त्यावेळीं तो एकटाच सर्व जग भरून टाकीत नाहीं काय ? " मनुष्य स्वप्नांत राजा होतो व त्याच्या भोंवतींच्या सर्व जगाचें व्यापारही तो एकटाच करतो. केवळ निद्रेच्या उपाधीनें एकाच माणसाकडून अनेक प्रकारच्या भूमिका स्वप्नांत पार पाडल्या जातात. तसेंच येथेही परब्रह्माला केवळ तें एकमेव असूनही मायेच्या उपाधीमुळें, जगाचे सर्व व्यापार करावे लागतात. पण त्या माणसाचें तें राजेपण व त्याचे विविध व्यापार जसे खरे नव्हेत, तसेंच परब्रह्माचे हे जागतिक व्यापारही मिथ्याच होत.

शिवाय तें स्वप्न जसें क्षणिक असतें, तशीच परब्रह्मावर ही अंमल चालविणारी माया देखील तात्पुरती व क्षणिक आहे असेंच समजलें पाहिजे. मूळ परब्रह्म हें निरुपाधिक व स्वतंत्रच आहे, हा मूळ सिद्धांतच येथे लक्षांत ठवला पाहिजे. **नीदेचेनि**- निद्रेच्या आधारानें, झोंपेच्या भरांत **काइ एकलेनि** **६०**— एकटाच जग भरून टाकीत नाहीं काय? जगाचे व्यापार तो एकटाच करीत नाहीं काय? **रायेपणें अवतरे**- स्वप्नांत ज्यावेळीं तो राजा म्हणून मिरवितो त्यावेळीं. आणखी दृष्टांत दिल्याशिवाय ज्ञानेश्वरांचें समाधान होतच नाहींसें दिसतें. **ओ. ३०९.**— "किंवा सोळा रुपये दराच्या उत्तम कसाच्या सोन्यांत हिणकस धातु मिसळली असतां त्या सोन्याचा कस जसा कमी अधिक होतो, त्याप्रमाणें शुद्ध अशा माझ्यांत मायेच्या उपाधीनें अनेक भेद होतात " **सोळे**-- पूर्वी शुद्ध शंभर नंबरी सोन्याचा दर १६ रुपये तोळा होता. म्हणून शुद्ध सोन्याला 'सोळे' असेंच नांव पडलें शुद्ध सोन्यांत पितळ, तांबें अशा हिणकस धातु मिसळल्या असतां, त्याचा मूळचा कस कमी होतो कसांत भेद होतो, त्याप्रमाणें शुध्द अशा मूळच्या परब्रह्मांवर मायेची उपाधि बसली म्हणजे त्या परब्रह्मांतही अनेक भेद होतात असा भाव. 'एकं सद्विप्रा बहुधा वदंति' अशीच स्थिति येथे वर्णन केली आहे. **कीडालें**— हिणकस धातु मिसळली असतां. **वानिभेदासि**— कसाच्या भेदास, कमाच्या कमी अधिकपणास तें शुद्ध सोनें कसाच्या कमीअधिक भेदाला प्राप्त होतें. **वेटालें**— व्याप्तीनें, उपाधीनें. **मीं**— मूळ शुद्ध अशा माझ्यांत ( परब्रह्मांत ) ही असेच कमी अधिक प्रकार होतात. **ओ. ३१०**— मायेच्या उपाधीनें परब्रह्माचे कसकसे भेद होतात, ते सांगतात. " त्यावेळीं अज्ञानाचा सर्वत्र फैलाव होऊन, 'मी कोण' असा विकल्प उत्पन्न होतो. मग विचारांनीं 'देहच मी' अशी निश्चिति होते. ' मायेच्या उपाधीनें अज्ञान पसरतें, मूळ परब्रह्मालाही आपल्या शुद्ध निरूपाधिक स्वरूपाचा विसर पडतो, व त्याला 'मी कोण?' मी परमात्मा कीं, माझ्याभोंवतीं वेष्टिलेलें शरीर तें मी? असा संशय उत्पन्न होतो, व शेवटी अज्ञानाचा जोर होऊन 'शरीरच मी' असा खोट्या ज्ञानाचा निश्चय त्याला करावा लागतो. **अज्ञान**—' सोऽहं ', तो परमात्मा मी आहे, असें आत्मापरमात्मैक्य तेंच ज्ञान होय. या विरुद्ध शरीर

म्हणजेच आत्मा, अशी समजूत होणें हेंच अज्ञान होय. **कोंहविकल्पाचें—** या अज्ञानामुळेंच ' मी कोण ' ? मी शरीर कीं आत्मा ? असा संशय उत्पन्न होतो. असा संशय उत्पन्न होणें, म्हणजेच अज्ञानाचा प्रारंभ होणें होय **मांडे—**विस्तार होतो. **विवरौनि**—विचार करून, पूर्ण विचारांतीं. **कांजे फुडें**—स्फुट केलें जातें, स्पष्ट होतें. शेवटीं देहच मी ( परमात्मा ) अशा अज्ञानाचाच विजय होतो. मायेमुळें केवढा अनर्थ होतो, तेंच येथें वर्णिलें आहे. आतांपर्यंत वृक्षाच्या रूपकानें संसाराचें व त्यानंतर परब्रह्माचें ज्ञान सांगितलें. त्यानंतर ' परमस्थाना ' चें अथवा परब्रह्माचें वर्णन करून ' तेथे गेलेले माघारी येत नाहींत ' अशी जीवांची उत्क्रांति सुचविली. पुढील श्लोकापासून जीवाचें स्वरूप, त्याला प्राप्त होणारें स्थूल शरीर व त्यायोगें जीवाला मिळणारा विषयोपभोग, इत्यादींचें विवेचन येतें.

( **श्लोक ७** )– " माझाच सनातन अंश मनुष्यलोकीं जीव होऊन प्रकृतींत असणाऱ्या मनासह सहा इंद्रियांना, तो आपल्याकडे ओढून घेतो. " परमात्म्याचाच एक अंश असा आत्मा, मनुष्य लोकांत ' जीव ' म्हणून प्रत्ये-काच्या शरीरांत वावरतो, व तोच मनुष्याच्या प्रकृतींत अथवा शरीरांत असणाऱ्या मन व पंचेंद्रियांचें नियमन करतो, असा हा आत्म्याचा अथवा लिंगशरीराचा निर्देश येथे केला आहे. **ओ. ३११**– " असा प्रकारें आत्मज्ञानाची शरीरा-एवढीच निराळी वाटणी होते, व तो शरीरांत कोंडलेला आत्मा माझाच ( परमात्म्याचाच ) एक लहान अंश आहे असें वाटतें, " महान् परमात्मा जीवलोकांत, मृत्युलोकांत येऊन ज्यावेळीं शरीर धारण करतो, त्यावेळीं त्याचा त्या शरीराएवढा लहान असा विभाग पडतो, व मग त्या शरीरांतला आत्मा, लहान आकारामुळें माझाच एक अंश आहे अशी समजूत होते, असें भगवान् सांगतात. प्रत्येक प्राणिमात्राच्या शरीरांतील आत्मा याप्रमाणें महान परमात्म्याच एक अंश आहे असे सांगून, आत्मापरमात्मैक्यच येथे पुनः सांगि-तलें आहे. येथें ' अंश ' शब्दाचा अर्थ घटाकाशादिवत् अंश समजावयाचा. तोडून काढलेला तुकडा नव्हे. **आवडे**-वाटतें. ( पहा मागे. ओ. १९९ व १३३ ) **आत्मज्ञान**- परमात्म्यासंबंधींच्या ज्ञानाची विभागणी होते. आत्मा हा परमात्म्याचाच एक लहान भाग आहे, अशी वाटणी होते. **ओ. ३१२**—

यालाच दृष्टांत देतात. "वाऱ्यामुळें समुद्र जेव्हां निरनिराळ्या लाटांचा आकार घेतो, त्यावेळीं त्या लाटा समुद्राचाच एक लहान अंश आहेत, असें ज्याप्रमाणे दिसते." त्या लाटानीं समुद्राचेच निरनिराळे भाग पडले आहेत असं ज्याप्रमाणें वाटतें, त्याप्रमाणें येथ परमात्म्याचे प्रत्येक प्राण्याच्या शरीरातील आत्म्याच्या रूपाने लहान लहान विभाग पडल्याचें दिसतें. पुन: वाऱ्यामुळें जसे समुद्राचे लाटांच्या रूपात लहान भाग पडतात, तसे येथेही मायेच्या प्रभावामुळें परमात्म्याचेच हे प्रत्येक शरीरांत आत्म्याच्या रूपानें भिन्न भिन्न लहान विभाग पडतात. **वायुवसे**— वाऱ्यामुळें. **उल्हास**- प्रकट होतो, भासतो. **सानिवां**- लहानपणाने. **ओ. ३१३**— "त्याप्रमाण हे पांडुसुता ! जड शरीराला जिवंत करणारा, ते शरीर म्हणजेच मी (आत्मा) असें ममत्व उत्पन्न करणारा असा मी, मृत्युलोकांत 'जीव' या नावानें समजला जातो." **जडातें**- शरीराला. आत्म्यामुळें, जीवामुळें, कोणत्याही शरीराला चेतना किंवा जिवंतपणा प्राप्त होतो. **देह अहंता**—मनुष्याची आपल्या देहावर फार आसक्ति असते. तो देहच आत्मा असं त्याला वाटतें. अशी समजूत आत्मा शरीरात प्रवेश करतो त्यावेळींच होते. **जीउ**—या आत्म्यालाच मनुष्यलोकात 'जीव' असें म्हणतात. **ओ. ३१४**—येथे आता जीवलोक म्हणजे काय तें स्पष्ट केलें आहे. "पण जीवाच्या प्रतीतासाठीं हा जो इंद्रियग्राह्य व्यापार (चाललेला दिसतो) तोच 'जीवलोक' या शब्दाचा अर्थ होय. जीवानें, आत्म्यानें, शरीर धारण केल्यानंतर त्याच्याकडून जो अखंड व्यापार आपणास चाललेला दिसतो, त्यालाच मनुष्यलोक असें म्हणतात. जीवाचें, आत्म्याचें अस्तित्व आपणास जेथे त्याच्या अखंड व्यापारावरून दिसून येतें, त्यालाच जीवलोक अशी संज्ञा दिली आहे. **गोचर हो**-जीवाचा व्यापार जेथ स्पष्ट होतो. **धांधा**— धंदा, व्यापार, हालचाल. **अभिप्राय**— अर्थ. आणखी जीवलोकाचे स्पष्टीकरण करतात. **ओ. ३१५**- "अरे ! जेथे उपजणें व मरणें हें खरें असें मानलें जातं, तोच जीवलोक किंवा संसार असें मी म्हणतो." मृत्युलोकांतच आत्म्याला जन्म किंवा मरण आहे, अशी वेडी समजूत रूढ आहे. वास्तविक आत्मा अमर व अविनाशी आहे. पण त्याच्या या स्वरूपाबद्दलचें अज्ञान जेथे पसरलेलें आहे, त्यालाच मृत्युलोक किंवा मनुष्यलोक

म्हणतात, असें श्रीकृष्णाचें अर्जुनास सांगणें **निमणें**–नाश पावणें, मरणें **हान**- निश्चयार्थक अव्यय. **ओ. ३१६**— " अशा प्रकारच्या या जीवलोकांत, ज्याप्रमाणें चंद्र हा ( प्रतिबिंबरूपानें ) पाण्यांत असूनहीं, पाण्यापासून अलग असतो, त्याप्रमाणें तूं मलाही समज. " श्रीकृष्ण सांगतात कीं, चंद्राचें प्रतिबिंब पाण्यांत पडले असतां, तो पाण्यांत आहेसा भासतो, वास्तविक खरा चंद्र वर आकाशांत पाण्यापासून अलग असतो. परमात्मा देखील असाच प्रत्येक प्राण्याच्या शरीरांत आत्म्याच्या रूपाने प्रतिबिंबित होतो, व तो प्रत्येक शरीरांत आहेसा भासतो. पण खरा परमात्मा या प्राण्यांच्या शरीरांतील आत्म्याहून अगदी **स्वतंत्र** आहे. येथे परमात्मा व आत्मा यांचा बिंब प्रतिबिंबभाव स्पष्ट केला आहे. परमात्मा हा प्रतिबिंबरूपानें प्रत्येक प्राण्याच्या शरीरांत दिसतो, व या प्रतिबिंबालाच आत्मा, जीव, असें आपण म्हणतों. **ओ. ३१७** – " किंवा हे पांडवा ! स्फटिकाचा लहान तुकडा कुंकवावर ठेवला असता, तो वरवर पाहाणाऱ्याला तांबडा दिसतो, पण तो मूळ तसा नसतो." श्रीकृष्णाचे म्हणणें असें कीं, परमात्म्याची गोष्ट ही तशीच आहे. परमात्मा जीवलोकात आत्मरूपाने प्रतिबिंबित झाल्यावर तो सर्व प्रकारच्या क्रिया करतो, असें अज्ञदृष्टीला वाटते. पण मूळ परमात्मा हा अनादि व अकर्ता असल्यामुळें, त्याच्या ठिकाणीं कसलीच क्रिया किंवा उपाधि संभवत नाहीं. **कासिमराचा**–स्फटिकाचा. पहा— " कास्मिराचिये करंडिये जैसे। भीतरील मूर्ति प्रकासे। पातळा लुगडेयांतुनि तैसे । आवएव दीसताती ॥– " नरेंद्र रु, स्व. ८३. **रवा**–लहान खडा, तुकडा. **लोहिवां**— तांबडा, लाल. **ओ. ३१८**— " त्याप्रमाणें परमात्म्याचें अनादिपण मोडत नाहीं, व अक्रियत्वही भंगत नाहीं. तथापि तो कर्ता व भोक्ता आहे असें जें वाटतें, तो मात्र निवळ भ्रम होय " परमात्मा प्रतिबिंबरूपानें जगांत वावरत असतांना, त्याचें मूळचें अनादिपण, निराकार स्वरूप व निष्क्रियत्व, हे गुण नष्ट होत नाहींत. ते गुण आहेत तसेच अबाधित अखंड चालूं राहतात. **माजि** – जीवलोकांत प्रतिबिंरूपानें वावरत असतां, कोणतीही क्रिया करावयाची नाहीं, या त्याच्या गुणांत मुळींच खंड पडत नाहीं. **परि ६०**– पण जीवलोकांत वावरत असतांना, तोच सर्व कर्ता व भोक्ता आहे असें जें वाटतें तें खोटें आहे, असें श्रीकृष्णाचें म्हणणे आहे. सांख्यांचा पुरुष व

वेदांत्यांचा परमात्मा हे एकच असल्यानें, ज्ञानेश्वरांनीं त्या दोनी शास्त्रांच्या समन्वयाची परिभाषा येथे वापरली आहे. परमात्मा किंवा पुरुष हा अकर्ता व उदासीन असून, प्रकृतीच त्याच्याकडून सर्व करवून घेते, असा सांख्यांचा सिद्धांत आहे. मृत्युलोकांत परमात्माच प्रत्येक शरीरांत प्रवेश करून सर्व क्रिया करतो व सर्व उपभोग घेतो, असें अज्ञ जनांना वाटतें. पण खरा परमात्मा या सर्वांहून अलग असल्यामुळें, येथील कोणत्याच क्रियेचा संबंध त्याला लागत नाहीं. **ओ. ३१९**-"किंबहुना शुद्ध असा आत्मा प्रकृतीशीं ऐक्य पावून, आपल्या आपणास्च प्रकृतीच्या गुणांचा पट्टाभिषेक करून घेतो." परमात्म्याचा किंवा पुरुषाचा प्रकृतीशीं जेव्हां संबंध घडतो, त्यावेळी तो तिचेच सर्व गुणधर्म स्वीकारतो. परमात्मा मूळ निर्गुण निष्क्रिय व उदासीन आहे. पण त्याचा त्रिगुणात्मक प्रकृतीशीं संसर्ग होतांच जगोत्पत्ति होते, व अशा रितीनें परमात्म्याला अगर पुरुषाला प्रकृतीचे गुण लागतात. तो तिच्याप्रमाणेच वागूं लागतो. **चोखडु**—शुद्ध. **पाटु बांधणें**—पट्टाभिषेक करणें, स्वीकारणें. **ओ. ३२०**—" मग मन व श्रोत्रादि पंचेंद्रियें हीं वास्तविक प्रकृतीपासून उत्पन्न झालीं असूनही, तीं माझींच म्हणून भी त्यांच्या व्यापारांत गढून जातो." वास्तविक मन व कान, नाक इत्यादि पंच ज्ञानेंद्रियें हे प्रकृतीचेच गुणधर्म होत. पण परमात्मा हा प्रकृतीशीं संलग्न झाल्यावर, मन व हीं पांच ज्ञानेंद्रियें हे आपलेच गुण आहेत असे त्याला वाटतें व त्यांच्या व्यवहारांत तो रंगून जातो. इतकी त्याची प्रकृतीच्या गुणाशीं एकरूपता होते. **ओ. ३२१**—यालाच आणखी दृष्टांत देतात. " ज्याप्रमाणे एखाद्या संन्याशानें स्वप्नात आपणच आपली पत्नी बनून मग तिच्या मोहानें सैरावैरा धावावें." संन्याशाला खरी पत्नी नसते, पण स्वप्नांत आपणच आपली बायको अशा भ्रांतीनें त्यानें तिच्या मागून धावावें, त्याप्रमाणें या परमात्म्याचें आहे. परमात्मा हा संन्याशाप्रमाणें उदासीन व अकर्ता असतां, त्यानें प्रकृतीशी संलग्न होणें म्हणजे संन्याशानें स्वप्नांत आपणच आपलें कुंटुंब बनून, तिच्या मोहानें सर्वत्र पळण्यासारखेंच मिथ्या व भ्रमोत्पादक आहे संन्याशानें स्वप्नांत पत्नीसाठीं पळणें हें जितकें क्षणिक व अज्ञानमूलक, तितकेंच परमात्म्यानें प्रकृतीशीं संलग्न होणें हें अज्ञानमूलक आहे, हें स्पष्ट करण्यासाठीं ज्ञानेश्वरांनीं हा अत्यंत अनुरूप असा

दृष्टांत येथे दिला आहे. येथे संन्याशी व त्याचा स्वप्नांत कल्पिलेला पत्नीसंबंध यांनीं परमात्मा व प्रकृति यांचा संबधही तसाच स्वप्नवत् मिथ्या आहे, हें सूचित केलें असून, उदासीन व निष्क्रिय अशा परत्म्याला दिलेली, वैराग्यशील व सर्वसंगपरित्याग केलेल्या संन्याशाची उपमा, मार्मिकपणाचीच द्योतक आहे.

**ओ. ३२२**– "याप्रमाणें आपलें विस्मरण झाल्यावर, परमात्मा आपण प्रकृतीसारखाच आहे असें समजून, तिच्यासारखाच वागूं लागतो." परमात्म्याला आपल्या मूळच्या उदासीन, निष्क्रिय अशा शुद्ध स्वरूपाचा विसर पडतो, व प्रकृतीच्या तंत्रानें वागत असतांना, त्याला आपणच त्रिगुणात्मक अष्टधाप्रकृति असें वाटूं लागते, व मग तो सर्व व्यापार तिच्या अनुसंधानानेंच करूं लागतो. परमात्म्याला आपल्या स्वरूपाचा विसर पडणें, यालाच संसारतरूचें पहिलें 'आर घेणें' असें मागे, ओ. ७८ मध्यें म्हटलें असून, वेदांतशास्त्रांत यालाच 'बजिभाव' असें म्हटलें जातें, हें ओ. ८७ मध्येंही मागें विशद करण्यात आलें आहे. **सरिसा गमौनि**- तिच्या सारखाच आपण आहे असें समजून **पुढती**—पुढें. **तिसि**- प्रकृतलिाच. यानंतरच्या ओव्यातून परमात्मा प्रकृतीच्या षडिंद्रियांचा कसा उपभोग घेतो, तें वर्णिलें आहे. **ओ ३२३**-' परमात्मा मनरूपीं रथावर चढून व कानाच्या दाराने बाहेर पडून मग शब्दाच्या रानांत शिरतो. " येथे शिकारीचें रूपक कल्पिलें आहे. एकादा शिकारी रथांत बसून मग आपल्या वाड्याच्या दारांतून बाहेर पडून रानात शिकारीसाठीं शिरतो, त्याप्रमाणें परमात्मा प्रकृतीच्या सहा इंद्रियांचा उपभोग घेत असतां, प्रथम मनानें अफाट संकल्प करतो व आपल्या संकल्पित व्यक्तीचे शब्द मोठ्या आतुरतेनें ऐकतो. कोणत्याहि इंद्रियाचा व्यापार करतांना, प्रथम मनाने काय करावयाचें तें ठरवावें लागतें. म्हणून प्रथम मनाचा उल्लेख केला आहे. परमात्मा कानानें ध्वनि ऐकतो एवढाच येथे अर्थ व्यक्त करावयाचा आहे. **वळघे**— अश्रय करतो. **ओ ३२४**— येथे स्पर्शेंद्रियायाचा प्रकार सांगितला आहे. " तो प्रकृतीचा लगाम त्वचेच्या तोंडाला घालून मग स्पर्शाच्या भयंकर अरण्याला जातो. " कोणत्याही वस्तूला स्पर्श करतांना प्रथम मनानें ठरवून मग त्वचेच्या द्वारां तो घडवून आणतो. त्वचा हें स्पर्शेंद्रिय असल्यानें, तिचीच मदत त्याला घ्यावी लागते. **वागोरा करणें**-लगाम घालणें. **मोहरा**-मुखाला. या ओवींत देखील शिकारीस जाणाऱ्या

घोडेस्वाराचेंच रूपक योजलें आहे. **ओ. ३२५**— " आणखी एकाद्या वेळेस डोळ्यांच्या दारांतून बाहेर पडून रूपाच्या डोंगरावर तो ( परमात्मा ) मनसोक्त हिंडत असतो " रूप हा विषय डोळ्यांचा आहे. येथे डोळ्यानें पाहणें म्हणून डोळ्यांना द्वार असें म्हटलें असून, रूपाला डोंगर कल्पिण्यांत रूपाचें मनसोक्त, दृष्टिसुखच येथे सूचित केलें आहे. परमात्मा डोळ्यांनीं संकल्पित रूपाचा मनसोक्त, येथेच्छ उपभोग घेतो असा अर्थ. **ओ. ३२६**— " किंवा हे सुभटा ! तो जिभेच्या वाटेनें बाहेर पडून, रसाची दरी भरून राहतो. " जिव्हेच्या दारानें निघून तो रसाच्या दरींत उडी घेतो, व ती दरी भरून टाकतो. जिव्हेनें रसास्वाद घेतांना तो आपल्या प्राणांचीही पर्वा करीत नाहीं असा अर्थ. **दरकुटा**—दरी. **भरोनि ठाके**– भरून राहतो. दरी आपल्या उडीनें भरून टाकतो. जिभेनें मनमुराद, प्राणांचीही पर्वा न करतां रस चाखतो. **ओ ३२७**- " किंवा माझा अंश हा जीव ( आत्मा ) नाकाच्या द्वारानें निघून, सुवासाची दुष्कर अरण्यें ओलांडतो. " नाकानें कसल्याही लांबच्या सुवासाचा आस्वाद घेतो. **हा मदंशु**--जीवात्मा, जो परमात्म्याचा अंश आहे असा. **निगवणें करी**- निघतो. **गंधाचें**- सुवासाची. गंध हा नाकाचा घ्राणेंद्रियाचा विषय आहे. **आडवें**— ( सं. अटवी ) अरण्यें. **ओ ३२८**— " याप्रमाणे देह व इंद्रियें यांचा स्वामी जो जीवात्मा, तो मनाला जवळ करून शब्दादिविषयरूपी अलंकारांचा उपभोग घेतो. " परमात्मा प्रतिबिंबभावानें प्राण्याच्या शरीरांत राहतो. या परमात्म्याच्या अंशालाच जीवात्मा म्हणतात. जीवात्मा देह व इंद्रियें यांच्यावर आपली हुकमत चालवितो, व मनाच्या साह्यानें, प्रथम मनानें संकल्प करून प्रत्येक इंद्रियांच्या द्वारां त्या त्या विषयांचा उपभोग घेतो. कान, त्वचा, डोळे, जिव्हा व नाक या इंद्रियांच्या द्वारा अनुक्रमें शब्द स्पर्श, रूप, रस व गंध अशा विषयांचें सेवन करतो **मन जावळिके घरुनु**- मनाला जवळ करून, त्याचें साह्य घेऊन **विखाभरणें**—शद्बादिविषयरूप अलंकार. ओ. ३२३--३२८ पर्यंत, जीवात्मा पंच ज्ञानेंद्रियांच्या द्वारां त्यांच्या त्या त्या विषयांचा उपभोग कसा घेतो, त्याचें वर्णन केलें आहे. पुढील श्लोकांत जीवात्मा शरीरांतून जातांना, मन व पंचेंद्रियांनाही आपल्याबरोबर कसा घेऊन जातो, तें सांगितलें आहे.

( श्लोक ८ )– " या जीवरूपी ईश्वराला जेव्हां स्थूल शरीर प्राप्त होतें, व जेव्हां तो त्यांतून निघून जातो, तेव्हां वायु जसा गंधादिकाच्या आश्रयापासून गंध नेतो, तसाच हा ( जीव ), या मन व पांच इंद्रियांना आपल्या बरोबर घेऊन जातो. " गंधाचा आश्रय असे जे पुष्प, चंदन इत्यादि पदार्थ, त्यांपासून वायु जसा सुवास घेऊन जातो, त्याप्रमाणेंच जीवात्मा जातांना शरीरांतील मन व पंचेंद्रियें बरोबर घेऊन जातो. ओ. ३२९– " पण जीव ज्या-वेळीं एकाद्या शरीरांत प्रवेश करतो, तेव्हांच तो कर्ता,भोक्ता,हे त्याचे गुण दिसतात. " परमात्म्याला कर्तृत्व किंवा भोक्तृत्व येतें, तें त्यानें धारण केलेल्या शरीराच्या आधारानेंच येते. येऱ्हवी जीवात्म्याला कांहीं स्वतःला आकार नाहीं. शरीरिं पैसे– शरीरांत प्रवेश करतो. यालाच एक दृष्टांत देतात. ओ. ३३० -" ज्याप्रमाणें एकाद्या संपन्न व विलासी माणसाचें ऐश्वर्य, जेव्हां तो एकाद्या राजधानींत राहण्यास येतो त्या वेळींच हे धनंजया ! समजून येतें. " चैनी माणसाची विलासी वृत्ति जशी एखाद्या संपन्न शहरांतच उघडकीस येते, तद्वत जीवात्म्याचें कर्तेपण किंवा भोक्तेपण त्यानें धारण केलेल्या शरीरावरच दिसावयाचें. आथिला— संपन्न. राजसेव्या ठाया— राजा राहतो अशा ठिकाणीं, राजधानीसारख्या संपन्न ठिकाणीं. ओ. ३३१— " त्याप्रमाणें जीव ( आत्मा ) जेव्हां देह धारण करतो, त्यावेळींच त्याच्या अहंकाराची वाढ, व त्याच्या विषयेंद्रियांची धुमाळी पुरती करून चुकते. " जीवात्म्यानें शरीर धारण केल्यावरच मग ' शरीर तेंच मी ' अशा अहं-काररूप अज्ञानाची त्याच्यांत वाढ होऊं लागते, व इंद्रियें व त्यांचें निरनिराळे विषय यांच्यांत धुमाकूळ सुरू होतो. इंद्रियें आपले विषय प्राप्त करून घेण्यासाठीं धडपड करतात. धुमाडु–धुमाळी. निवाडु–निर्णय. पण ही देहावरील अहंता व इंद्रियांची धुमाळी, जीवात्म्यानें शरीर स्वीकारल्याशिवाय कशी दिसणार ? यापुढें शरीर सोडून जातांना जीवात्मा कसा जातो तें सांगतात. ओ. ३३२–" अथवा जीवात्म्यानें जर शरीर सोडलें तर मन व पंचेंद्रियांचा समुदाय तो आपल्याबरोबर शरीराबाहेर काढतो, व त्यांना आपल्याबरोबर घेऊन जातो. " चित—मन. इंद्रियांची तांडी-- पंचेंद्रियांचा समुदाय.
   रसें-- बरोबर. तो कसा नेतो, हें दृष्टांतानें स्पष्ट करतात. ओ. ३३३— "

ज्याप्रमाणें अपमान केलेला अतिथि आपल्याबरोबर त्या घरमालकाचें पुण्यही घेऊन जातो, किंवा दोऱ्या काढल्यावर कळसूत्री बाहुल्याची हालचालही नष्ट होते." अपमानित अतिथि, अपमान केलेल्या घरमालकाचें पूर्वी केलेलें सर्व पुण्यही आपल्याबरोबर घेऊन जातो अशी समजूत आहे. त्याप्रमाणें हा जीवात्मा शरीरांतून जातांना एकटाच न जातां, मन व इंद्रियेंही आपल्याबरोबर नेतो. किंवा कळसूत्री बाहुल्याच्या दोऱ्या काढून नेल्यावर त्या कळसूत्री बाहुल्याची सर्व हालचालही थंडावते. त्याप्रमाणें जीवात्मा गेल्यावर शरीरही थंड पडतें, त्याचीही हालचाल थांबते. कळसूत्री बाहुल्याला जसे दोर, तसाच शरीराला जीवात्मा असा भाव. **साएखेडयाची**- कळसूत्री बाहुल्याची. **सूत्रतंतु**- दोऱ्या, बाहुल्याला हालविणाऱ्या दोऱ्या. **ओ. ३३४**- " किंवा सूर्य मावळतांना तो लोकांची दृष्टीही घेऊन जातो. फार काय वारा आपल्याबरोबर (पुष्पांतला) सुवासही जसा घेऊन जातो. " भगवंतांच्या म्हणण्याचा इत्यर्थ असा कीं, सूर्य मावळतांना लोकांची पाहण्याची शक्ति जसा घेऊन जातो, किंवा वारा फुलांतील सुवास आपल्या बरोबर नेतो, त्याप्रमाणें जीवात्मा शरीरांतून जातांना प्राण्याची चलनवलनशक्तीच आपल्याबरोबर घेऊन जातो. **तपन**--- सूर्य. **दर्शनें** - दृष्टिसामर्थ्य. **द्रुति**-सुवास. पहा- " जैवि चंदनाचिया द्रुती । शरीबोरीं चंदन होती ॥ " **ओ. ३३५**-" त्याप्रमाणें हें धनंजया ! देहाचा राजा जो जीवात्मा, तो मृत देहापासून मनादि सहा इंद्रियांना आपल्याबरोबर नेतो. देह मृत होतांच त्यांतील सर्व इंद्रियांचा हालचाल एकदम बंद पडते. **घाला देहापासौनि** - हत देहापासून, मृत देहापासून. हत--घात- घाल=मृत. भूतभूतकालवाचक विशेषण. **देहराजु**- देहाचा स्वामी, देहावर हुकमत चालविणारा जीवात्मा. आतां पुढील श्लोकांत जीवात्मा शरीरांत राहून विषयोपभोग कसा घेतो त्याचें वर्णन केलें आहे.

(**श्लोक ९**)---' कान, डोळे, त्वचा जीभ व नाक तसेंच मन, यांचे ठिकाणीं बस्तान बसवून हा (जीव) विषयांचा उपभोग घेतो. " पांच ज्ञानेंद्रियांच्या ठिकाणीं ठाणें देऊन, त्यांच्या अनुक्रमें शब्द, रूप, स्पर्श, रस व गंध या विषयांचें सेवन करतो. **ओ. ३३६**- " मग येथे किंवा स्वर्गांत, जिथं म्हणून हा जीवात्मा नवीन देहाचा स्वीकार करतो, तिथं तो पुनः या

मनादि सहा इंद्रियांचा पसारा मांडतो." एक देह सोडल्यानंतर, जीवात्मा याच मत्युलोकांत किंवा स्वर्गात जिथं म्हणून दुसरा देह स्वीकारतो, तिथंही तो पुनः त्या नवान देहाच्या सहा इंद्रियावर आपली हुकमत चालवितोच. प्राण्याला त्यान्या कर्मानुसार मृत्युलोकांत अगर स्वर्गात जन्म मिळून, मनुष्यदेह, पशुदेह अगर गंधर्वदेह मिळतो. अशा नवीन देहांत हा जीवात्मा पुनः प्रवेश करून तथेही तो वरील सहा इंद्रियाचा व्यापार सुरू करतो. **अपंगी**—स्वीकारतो. पहा-ज्यासि अपंगीता नाहीं । त्यासि धरी जो हृदयीं । तोचि साधू ओळखावा । जीव तेथेंची जाणावा ॥-तुकाराम. **तैसिचि**-मागलि देहाप्रमाणेंच. **पुडुतीं**—पुनः **पार्गी**- पसरतो. या नवीन देहांत जीवात्मा पुनः नवीन संसार कसा थाटतो, तें दिव्याच्या दृष्टांतानें स्पष्ट करतात. **ओ. ३३७**- " तर हे पांडवा ! दिवा मालविल्यावर जसा आपल्या तेजासह नाहींसा होतो, व मग पुनः लावल्यावर तो पुनः आपल्या तेजाने फांकतो. " तसाच जीवात्मा हा देखील एका शरीरांतून निघून गेल्यावर तो देह मृत होतो, व पुनः जीवात्मा दुसऱ्या शरीरांत प्रवेश करतांच या नव्या देहाचा व्यापार सुरू होतो. येथे जीवात्म्याला दिव्याचा दिलेला दृष्टांत, तितकासा अनुरूप नाहीं. दिवा मालविला तरी तोच पुनः लावला जातो, त्यामुळें तेथे एकच दिवा कायम असतो. जीवात्मा मात्र एका शरीरानंतर दुसऱ्या शरीरांत जातो, तेथे पहिलेंच शरीर कांहीं कायम नसतें. तथापि येथे दिव्याचा प्रकाश देण्याचा व जीवात्म्याचा चलनवलन देण्याचा साधारण धर्मच तेवढा घ्यावयाचा आहे. **मग उजलिजे** १० — मग पुनः प्रदीप्त करावा तेव्हां. **तैसाचि** १०- तसाच पूर्वीप्रमाणेंच फुलतो. **ओ. ३३८**- " अर्जुना ! हा सर्व चाललेला क्रम, अज्ञान्यांच्या दृष्टीला असा भासतो. " अज्ञान्यांच्या दृष्टीला हा जीवात्म्याचा एका देहांतून ऱ्या देहांत संचार करण्याचा क्रम कसा दिसतो, तें पुढील सांगितलें आहे. **आंधवेंकियाचिये**- अज्ञान्यांच्या. आत्माच तोच देह धारण करून सर्व विषयोपभोग घेतो, असें ज्यांना ज्ञानी लोकांच्या. **दीठी**—दृष्टीला. **ओ. ३३९**— ( त्यांना कीं आत्माच या देहामध्ये आला व त्यानेंच सर्व विषयोप·

भोग घेतला, किंवा तोच या देहांतून गेला. हेच त्यांना खरें वाटतें ना ?" वास्तविक आत्मा देहही धारण करीत नाहीं, तो इंद्रियांच्या द्वारां विषयही भोगीत नाहीं, किंवा तो देहातून जातही नाहीं. पण अज्ञानी लोकांना हे सर्व खरें वाटते, असें भगवान सांगतात. हेच पुढील ओवींत स्पष्ट केलें आहे. **ओ. ३४०-**" एरव्ही जन्म घेणे किंवा मरणें, किंवा क्रिया करणें अथवा विषयाच उपभोग घेणे, हे प्रकृतीचे गुण असता, ते आत्म्याचे आहेत असे त्यांनीं (अज्ञान्यांनीं) मानले आहे." प्रकृतीचे हे गुण अज्ञानी लोक आत्म्याला चिकटवितात. **तेणें**—अज्ञान्यांनीं. शरीर धारण करणे, शरीर सोडून जाणें, व उपभोग घेणें, या तीन क्रिया चालल्या असतां जीवात्म्याचें खरें ज्ञान कोणाला असतें ते सांगतात.

( **श्लोक १०**)—शरीरांतून निघून जाणाऱ्यास अथवा तेथ राहणाऱ्यास, अथवा गुणानीं युक्त होऊन विषयांचा उपभोग घेणाऱ्यास, मूर्ख लोक जाणत नाहीत. ज्ञानदृष्टीचे लोक मात्र त्यास जाणतात." **ओ. ३४१**-परंतु हा क्षुद्र देह पुढे उभा असलेला पाहून व त्याच्यांत चेतना आल्यावर, त्याच्या चळवळीच्या लोभानें हे अज्ञानी लोक, आत्मा त्या देहांत आला असेच म्हणतात." वरवरचा देह व त्याचें चलनवलन पाहून हे लोक आत्माच हें सर्व करतो, तोच या देहात शिरला, असें अज्ञानानें म्हणतात. **मोटकें**-क्षुद्र, अल्प. **ओ. ३४२—** " त्याचप्रमाणें हे सुभद्रापति ! त्याच्या संगतीनें इंद्रियें आपापले विषय उपभोगीत असता, त्या उपभोगाला आत्म्याचाच उपभोग (असें समजतात)" वास्तविक पंचेंद्रियें व मन ही प्रकृतीपासून उत्पन्न झालीं असल्यानें, इंद्रियांचे सर्व व्यापार प्रकृतीच घडवून आणते, आत्मा तेथे कांहींच करीत नाहीं, तो प्रकृतीच्या अनुसंधानाने वागतो म्हणून तोच हे इंद्रियव्यापार करतो, अशी अज्ञ लोकांची समजूत होते. **आपुलालां अर्थी-** आपापल्या विषयाच्या ठिकाणीं, शब्दरूपरसादि विषयांच्या ठिकाणीं. **ओ. ३४३-** "पुढे कर्मांचा भोग संपल्यानंतर स्वभावतःच देह पडून जेव्हां आत्मा नाहींसा होतो, त्या वेळीं ( हे अज्ञानी लोक ) जीव गेला म्हणून हांका मारतात." **भोगक्षयीं-** प्रत्येक जन्मांत पूर्वजन्मीच्या भोगाव्या लागणाऱ्या कर्मांचा क्षय होताच. मनुष्याला प्रत्येक जन्मांत तत्पूर्वींच्या जन्मांत केलेल्या कर्माचीं फलें भोगावीं लाग-

तात. ती भोगून संपलीं कीं, त्या जन्माचा देह पडतो. पुढें या जन्मांत केलेल्या कर्मफलाप्रमाणे नवीन जन्म मिळतो, असा हा संसाराचा क्रम चाललेला आहे. **तें न दीसे**—देह पडला असतां आत्माही दिसत नाहीं. मग तो गेला अशी ओरड करतात. वास्तविक देह पडला कीं, आत्मा गेला असें मानण्याचें कारण नाहीं. त्याचें येणें जाणें देहावर अवलंबून नाहीं, हेंच निरनिराळया दृष्टांतांनीं पुढील चार ओव्यांत स्पष्ट करतात, **बोभाती**— हाका मारतात.

**ओ. ३४४**— " हे पांडवा ! झाड हालत असलें म्हणजेच जर वारा वाहत आहे असें मानायचें, तर वृक्ष नसेल तेथे वारा नसतोच काय ?" श्रीकृष्णांचें म्हणणें असें कीं, वृक्षाच्या हलण्यावाचून वाऱ्याचें अस्तित्व नसतें असें जसें म्हणतां येत नाहीं, त्याचप्रमाणे, देह असेल तोंपर्यंतच आत्म्याचे अस्तित्व आहे, असें मानण्याचें कारण नाहीं. वृक्ष हालला नाहीं, तरी वारा म्हणून आकाशांत कोठे ना कोठे तरी असतोच, तसा देह नष्ट झाला, तरी आत्मा मरत नाहीं. तो अमर अविनाशी व सनातन असाच आहे. आत्म्याचे स्वतंत्र अविनाशित्व स्पष्ट करण्यासाठीं ओ. ३४४—३४७ पर्यंत निरनिराळे दृष्टांत दिले आहेत. **वाजतु**—वाहत आहे. **रुखु**— वृक्ष. **ओ. ३४५**— " किंवा आरसा समोर ठेवून आपणाला त्यांत पाहिले, त्यावेळींच आपण झालों असें मानलें, तर त्यापूर्वी ( आरशांत पाहण्यापूर्वी ) आपण नव्हतो काय ?" येथे देखील आरशांत पाहण्यापूर्वी जसे आपण होतोंच, आरशांत पाहण्याचा व आमच्या अस्तित्वाचा जसा कांहींच संबंध नाहीं, तद्वत, देहाचें मरण व आत्म्याचें अस्तित्व यांचाही अर्थाअर्थी कांहीं संबंध नाहीं. आरशांत पाहिलें नाहीं, तरी आमचे अस्तित्व, जसें सिद्ध आहे, तसें देहाला मरण घडलें तरी आत्म्याच्या अविनाशित्वाला कांहीं बाध येत नाहीं. **संमोहर**— समोर, पुढें. **आपणपें**— आपणाला. **तेव्हांचि जाला**— तेव्हांच आपला जन्म झाला. **काइ आदि नाहीं**-- आरशांत पहाण्यापूर्वी आपण नव्हतोच काय ? **ओ. ३४६**- " किंवा तो आरसा बाजूला सारल्यावर आपल्या प्रतिबिंबाचा लोप होतो, म्हणून आपण जगांत नाहींच असा निश्चय करावयाचा काय ?" आरशात आपलें प्रतिबिंब आपण पाहतो, म्हणून आपण जीवंत आहों असें मानलें, तर आरसा बाजूला सारल्यामुळें आपलें

प्रतिबिंब त्यांत दिसत नाहीं, म्हणून, आपण जगांत नाहीं असें ठरवावयाचें काय ? तसें जसे आपणास ठरविता येत नाहीं, आरशांत पाहिलें नाहीं, तरी आपल्या अस्तित्वाला जसा बाध येत नाहीं, तद्वत् शरीर मृत झालें, तरी त्यातील आत्मा मृत होत नाहीं असा भाव पुढील ओवींत अज्ञानामुळे आपण एकाचा आरोप दुसऱ्यावर कसा करतो ते दृष्टांतानीं सागतात. **ओ. ३४७**–" आकाशात होणारा गडगडाट हा वास्तविक आकाशाचा गुण असता, तो मेघांच्या माथीं मारला जातो, किंवा आकाशांतील ढगांचे वेगाने जाणे, चंद्रावर आरोपित केले जाते. " वास्तविक आवाज करणे हा आकाशाचा गुण असतां, मेघामुळेच गडगडाट होतो असें आपण मानतो, तर ढगच आकाशांतून वेगाने पळत असतां, चंद्रच धावतो असें अज्ञानानें आपण म्हणतों. आकाशाचा गुण ढगावर व ढगाचा गुण चंद्रावर जसा लादला जातो, तसेच देहाचे गुण आपण अज्ञानानें आत्म्यावर लादतो. **सादु**– आवाज. ( पहा- शब्दगुणं आकाशम् ) **कपालि इ०**— मेघाच्या माथी मारला जातो. **चांदु**–चंद्रावर. म्हणून पुढील ओवींत आपला सिध्दांत मांडतात. **ओ. ३४८**– " त्याप्रमाणे मोहानें किंवा अज्ञानानें अंध झालेले लोक, शरीराचें जन्मणें व मरणें हें अविक्रिय अशा आत्मसत्तेवरच आरोपित करतात. " शरीराचे जन्मणें व मरणे हे गुणधर्म, हे आंधळे लोक निर्विकार अशा आत्म्यावरच आरोपित करतात. शरीराचे गुण ते आत्म्याला चिकटवितात. **आत्मसत्ते इ०**— निर्विकार, विकाररहित अशा आत्मसत्तेवर, आत्म्यावर. **निष्टंकिती**— आरोपतात. **ओ. ३४९**—' येथे आत्मा हा आत्म्याच्या ठिकाणींच असून देहाचे गुणधर्म देहाच्या ठिकाणींच चालतात, असे पाहणार दुसरेच आहेत. " असे पाहणारे ज्ञानी लोक, वरील मोहांध लोकांहून अगदी निराळे आहेत. आत्मा हा स्वतन्त्र आहे. देहाचे जन्ममरणाचे गुण त्याला लागू नाहींत. आत्म्याचे गुण आत्म्याच्या ठिकाणीं, व देहाचे विकारी गुण देहालाच लागू आहेत, देहाचे गुण आत्म्याला लावतां येणार नाहींत, असे जे जाणतात ते ज्ञानी पुरुष, वरील अज्ञानी लोकांहून भिन्न आहेत. **देखणे**– पाहणारे. **आन आहाति**-दुसरेच असतात. अशा ज्ञानी पुरुषांचेच लक्षण पुढील ओवींत देतात. **ओ. ३५०**·" ज्ञानाने पाहिल्यामुळे, ज्ञानदृष्टि आल्यामुळें, ज्यांचे

डोळे देहाच्या आच्छादनांत गुरफटून राहत नाहींत. ग्रीष्मऋतूंत सूर्याचे प्रखर किरण जसे मेघांतच गुरफटून राहत नाहींत त्याप्रमाणे." ज्यांची दृष्टि ज्ञानानें, आत्मज्ञानानें विस्मृत झालेली असते, ते देहापुरतेच पाहत नाहींत. देहाच्या आच्छादनाच्या पलीकडील आत्म्याच्या स्वरूपाकडे त्यांची दृष्टि लागलेली असते. ज्ञानदृष्टि ही चर्मचक्षूंच्या पलीकडली असते. **दृष्टिचे-खोले**— देहाच्या आवरणात, आच्छादनात. सूर्याचे प्रखर किरण ग्रीष्म ऋतूंत ज्याप्रमाणें मेघाच्या आच्छादनाला भेदून बाहेर जातात, तशी ज्ञान्यांची दृष्टि देहाच्या आच्छादनापलीकडे गेलेली असते. **आणियालें**— तीक्ष्ण, प्रखर. **ओ. ३५१**- "त्याप्रमाणें विवेकाच्या योगानें ज्यांची बुद्धि आत्मस्वरूपीं स्थिर झाली आहे, ते ज्ञानी पुरुषच आत्म्याकडे खाली सांगितल्याप्रमाणे पाहतात." **विवेकाचेनि**— आत्मानात्मविचाराच्या. **पैसें**—योगानें. (अव्यय). **स्फूर्ति**- बुद्धि. आत्म्याचे ज्यांना निश्चित ज्ञान झालें आहे. **देखति पसें**-खालीं दिलेल्या पद्धतीने पाहतात. आता हे ज्ञानी आत्मदृष्टीनें कसें पाहतात, ते ३५२-३५७ ओव्यांत अनेक दृष्टांतांनीं विशद केलें आहे.

**ओ. ३५२**-" ज्याप्रमाणें नक्षत्रांनीं भरलेलें आकाश, समुद्रांत प्रतिबिंबित झालेलें दिसलें, तर ते काहीं वरून तुटून समुद्रात पडलेलें नसते हें खास." आत्मा देखील असाच देहांत वावरत असलेला दिसला, तरी तो सुद्धा त्या देहाला येऊन कांहीं चिकटलेला नसतो. तो देखील समुद्रांतील तारागणाप्रमाणेंच देहात प्रतिबिंबित झालेला असतो. देहांतील आत्मा हा मूळ परमात्म्याचे प्रतिबिंबच आहे. ज्ञानीपुरुष, आत्मा हा परमात्म्याचें प्रतिबिंब म्हणून देहांत दिसतो, अशा व्यापक दृष्टीनें त्याकडे पाहतात. 'गगन' व 'समुद्रिं' असे वेगवेगळे शब्द पाहिजेत. **हें**— गगन. **ऐसे निवडे**— असा निश्चय केला जातो. **ओ. ३५३**— "आकाश आकाशाच्या ठिकाणीं आहे, व जें समुद्रांत प्रतिबिंबित झालेलें असतें तें मिथ्या असतें. त्याप्रमाणें देहानें आत्मा आच्छदलेला आहे, असे ते ज्ञानी पुरुष पाहतात." समुद्रांत जे तारकांकित आकाश प्रतिबिंबित झालेसें असते तें खोटें असतें. वरील तारकायुक्त आकाश कांहीं समुद्रांत खालीं खरें तुटून पडलेलें नसतें. त्याप्रमाणें आत्मा देखील देहांत परमात्म्याचें पडलेलें प्रतिबिंबच होय, अशी दृष्टि

ज्ञानी पुरुषांना आलेली असते. **आभासतसे**-प्रतिबिंबित होतें. **वायें**-मिथ्या, खोटें. **गंवसिला**— आच्छादला. समुद्रानें व्यापलेलें आकाश जसें मिथ्या, तसा देहानें आच्छादलेला आत्माही मिथ्याच होय. गगन जसें समुद्राहून वेगळें आहे, तसा आत्मा देहापासून अगदीं वेगळा आहे. आणखी दुसरा दृष्टांत देतात. **ओ. ३५४**— 'खळखळ वाहणाऱ्या ओढ्याचा वेग, त्या खळखळ वाहणाऱ्या ओढ्यांतच ठेऊन, चंद्राचा प्रकाश जसा ( त्या ज्ञानी पुरुषांकडून ) चंद्रातच पाहिला जातो." खळखळ वाहणाऱ्या ओढ्यांच्या वेगानें चंद्रप्रकाशही जोरानें हेलकावे खात असलेला दिसला, तरी, ज्ञानी पुरुषांना त्या ओढ्याच्या वेगाचा व चंद्रप्रकाशाचा कांहीं संबंध नाहीं, हें समजून तो चंद्रप्रकाश चंद्राच्या ठिकाणीं अबाधित असल्याचें तें पाहतात. चंद्रप्रकाशाला ओढ्याच्या प्रवाहानें हलकावे बसून जरी बाध आल्यासारखा वाटला, तरी तो चंद्राच्या ठिकाणीं आहे तसाच आहे, हें ज्ञानी पुरुष जाणतात. आत्म्याला देहामुळें असे विकार प्राप्त झालेले दिसले, तरी ज्ञान्यांना तो स्वतंत्र व निरुपाधिक आहे, असें ज्ञान झालेलें असतें. **खलाल**-खळखळ वाहणारा ओढा. **लगबागि**- झपाट्याचा वेग. **फडौनि**-ठेऊन, **ओ. ३५५**-" डबकें जरी अटून गेलें, तरी सूर्य जशाचा तसाच असतो, त्याप्रमाणें देह आला काय गेला काय, मी (आत्मा)आहे तसाच आहे, असें हे ज्ञानी पुरुष पाहतात." डबक्याच्या पाण्यांत सूर्य प्रतिबिंबित झाला तरच त्याचें अस्तित्व सिद्ध होतें असें नाहीं. कारण डबक्यांतलें पाणी अटून सूर्याचें प्रतिबिंब त्यात पडण्याचें थांबलें, तरी वर आकाशांत सूर्य प्रकाशच असतो, त्याप्रमाणें देह जन्मला काय किंवा मेला काय, त्या देहांत असणारा आत्मा कांहीं जन्मत नाहीं अथवा मरत नाहीं. त्याचें अस्तित्व देहाच्या कसल्याही स्थितींत स्वतंत्रपणें प्रत्ययास येतें. सूर्य जसा त्या डबक्याहून अगदी स्वतंत्र आहे, तसा आत्माही देहापासून स्वतंत्र आहे. **थिलर**-डबकें. **सोखे**- कोरडे झालें. **ओ. ३५६**— आणखी दृष्टांत आहेतच. ' घागर व चौकोनी खोली, केली व नंतर मोडली, तरी एकत्र सांचलेले वरचें आकाश आहे तसेंच असतें." घटांत (घागरींत) व मठांत (खोलींत) आकाश कोंडलेलें असते. पण हे घट व मठ मोडून टाकले, तरी मूळ आकाशाला कांहींच बाध येत नाहीं. घटांतील अथवा मठांतील तें आकाश (पोकळी), मूळ मोठ्या आकाशांत सामावून

जातें. त्याप्रमाणें देहांत आत्मा कोंडलेला वाटला, तरी देह पडतांच तो मूळ परमात्म्यांत मिळून जातो. आत्मा हा परमात्म्याचाच अंश आहे, हें 'ममैवांशो' या श्लोकांत वर सांगितलेंच आहे. तो अंश हा असा घटाकाश व मठाकाश स्वरूपाचा असून, मूळ परब्रह्माचा ना तोटलेला तुकडा नव्हे, हें मागें स्पष्ट केलेंच आहे. **संचलें**- साचलेलें, एकत्र असलेलें. **असणेंचि असे** -आहे तसेंच आहे **ओ. ३५७**-' त्याप्रमाणें आत्मसत्ता ही अखंड असून, अज्ञानदृष्टीनें कल्पिलेले हे देहच जन्मतात व मरतात असें ते ज्ञानी पुरुष स्पष्टपणें जाणतात."
**अज्ञानदृष्टिकल्पितें**- अज्ञानामुळें ज्यांचें अस्तित्व मानलें जातें असे हे देह. देहच उपजतात व मरतात. पण आत्मा हा अविकारी व अखंड आहे, त्याचा देहाशी कांहीं संबंध नाहीं. देह मेला तरी आत्मा अबाधितच राहतो, हें तत्त्व ज्ञानी पुरुषच जाणतात. **अखंड आत्मसत्ते**— विकाररहित असा आत्मा मागें ओ. ३४८ मध्यें 'आत्मसत्ते अक्रिये' असें म्हटलेंच आहे. **फुडें**—स्पष्ट. ( स्फुटम् )

( **श्लोक ११** )- " प्रयत्न करणारे योगी आपल्या ठिकाणीं स्थित असलेल्या आत्म्याला ओळखतात. पण जे सुसंस्कृत नाहींत असे अज्ञानी लोक, प्रयत्न करूनही त्याला ओळखत नाहींत " **ओ ३५८**-" आत्मा हा वाढतही नाहीं व कमीही होत नाहीं तो स्वतः कांहीं व्यापार करीत नाहीं किंवा दुसऱ्याकडून करवूनही घेत नाहीं, असें ते ( ज्ञानी ) आत्मज्ञानानें जाणतात. " याचाच अर्थ असा कीं, आत्मा हा निर्विकार व उदासीन आहे हेंच खरें आत्मज्ञान जे जाणतात, तेच ज्ञानी होत. **चोखटें**— चांगलें. पुढील ३५९-३६० या दोन ओव्यांत केवळेंही विज्ञान प्राप्त झालें, तरी त्याला आपली (परमात्म्याची) प्राप्ति होणार नाहीं, असें सांगतात **ओ ३५९**- 'आणि विज्ञानही स्वाधीन होईल, बुद्धि अगदी परमाणूंचीही मोजदाद करूं शकेल, व सकल शास्त्रांचें रहस्यही हस्तगत होईल. " पण अशा या विज्ञानानें परमेश्वरप्राप्ति होणार नाहीं, आत्मस्वरूप दिसणार नाहीं. असें येथें म्हटलें आहे. **ज्ञान**-विज्ञान, शास्त्रीय ज्ञान **आपतें होणें**- आपलेंसें होणें. **उगाणा घेणें**- मोजदाद करणें. पहा-" नाणीं कांहीं मना । करुनि पापाचा उगाणा ॥-तुकाराम. **परमाणूंची मोजदाद करण्याइतकी एकाद्याची बुद्धि सूक्ष्म होईल. पण तिनें आत्म-**

प्राप्ति कशी होणार ? **ओ. ३६०**-" पण इतकें ज्ञान प्राप्त होऊनही वैराग्याचा जर मनांत शिरकाव झाला नसल, तर सर्वात्मक असा जो मी, त्या माझी भेट त्याला होणार नाहीं." **व्युत्पत्ति**-ज्ञान. भौतिक शास्त्रांचें ज्ञान आत्मप्राप्तीला उपयोगी पडत नाहीं, असें येथ मुद्दाम सांगितलें आहे. ज्याचें मन विरक्त होईल त्याला मात्र आपली भेट होईल, असें भगवान म्हणतात. **सर्वात्मक**-- सर्वांच्या आत्म्याच्या ठिकाणीं असणारा. आत्मज्ञानाला कोण अनधिकारी तें वर्णन करतात. **ओ. ३६१** – " त्याप्रमाणे तोंडावाटें मोठें गहन विचार निघताहेत, पण मनांत मात्र निरनिराळ्या विषयांना थारा मिळतो आहे, अशाला हे धनुर्धरा ! मी खचित सांपडणार नाहीं." तात्पर्य 'लोकां सांगे ब्रह्मज्ञान आपण कोरडा पाषाण' असा जर तो असेल, तर त्याला ईश्वरप्राप्ति होणार नाहीं. **तोंड भरी ६०**— गहन विचार अगदीं तोंड भरून बोलतो, पण मन विषयवासनांच्या विचारांत दंग. आंत एक व बाहेर एक अशा माणसाला ईश्वर भेटणार नाहीं. **नातुडे**-- सांपडत नाहीं. **त्रिशुद्धि**— खरोखर. **ओ. ३६२**-- " हें असें पहा कीं, स्वप्नांत चावळलेल्या शब्दांच्या ग्रंथानें संसाराची गुंतागुंत, येरझारी संपेल काय ? किंवा पोथीला नुसता स्पर्श केला कीं, ती वाचली असें होईल काय ?" स्वप्नांत केलेल्या बडबडीनें सजविलेला ग्रंथ हा कितीसा सुसंगत असणार ? त्यानें व्यावहारिक कोडी जर सुटणार नाहींत, तर परमार्थिक कोडीं, जन्ममरणाचा फेरा कसा चुकवितां येणार ? **उन्मणातियांचा**—झोंपेंत चावळणाऱ्याच्या. **संसारगुंति**-जन्ममरणाचा फेरा. **परिवसिलियां**- स्पर्शिली असतां. त्याचप्रमाणें पोथीला नुसता स्पर्श करण्यानें ती वाचल्याचें श्रेय मिळणार नाहीं. करावयाचें तें करायचें सोडून भलत्याच करण्यानें ईश्वरप्राप्ति होणार नाहीं असा भाव. **ओ ३६३**-' किंवा मोत्यांची परीक्षा करावयाची असतांना डोळे बांधून मोती जर नाकाला लावले, तर त्यांच्या किंमतीचा अटकळ करतां येईल काय ?" मोत्यांची परीक्षा करतांना डोळ्यांचें जेथे मुख्य काम, तेथे नाकाची योजना केली तर त्या मोत्याची किंमत कशी ठरवितां येणार ? त्याप्रमाणे येथे ज्या आत्मज्ञानानें, वैराग्यानें, परमेश्वराची भेट होणार, तें सोडून भौतिक शास्त्रें अथवा विज्ञान यांत पारंगतता मिळवून उपयोग काय ? **ओ. ३६४**— " त्याचप्रमाणें मनांत मात्र

अहंकाराला जागा, व जिव्हाग्रीं मात्र सर्वशास्त्रांचा अभ्यास, अशा स्थितींत कोटी जन्म गेले, तरी त्याला माझी प्राप्ति होणार नाहीं." ज्याचें मन अहंकारानें युक्त आहे, त्याच्याठिकाणीं वैराग्य कसें वागणार ? अशा अहंकारी माणसानें सर्व शास्त्रें जरी मुखोद्गत केलीं, तरी आत्मज्ञानाच्या दृष्टीनें त्याचा कांहीं उपयोग नाहीं. **सराऊ-** अभ्यास. **ओ. ३६५**--" आतां मी जो एकमेव असूनही सर्व प्राणिमात्रांत आहे व सर्व प्राणिमात्रांना व्यापून राहिलो आहे, त्या माझें मी स्पष्ट वर्णन करतो तें ऐक." आतापर्यंत ज्ञानचक्षूनें आत्मज्ञान होतें असें सांगून, आत्म्याच्या उत्क्रांतीचें वर्णन केलें. येथून पुढें श्लोक १५ पर्यंत आत्म्याच्या सर्वव्यापित्वाचें थोडें वर्णन करतात. **व्य । रूप करूं**— स्पष्ट असें वर्णन करतों.

(**श्लोक १२**) -" सूर्यामध्यें असणारें जें तेज सर्व जगाला प्रकाशित करतें, व जें चंद्रांत व अग्नींत आहे, तें तेज माझेंच आहे असें समज. " **ओ. ३६६**- "तर जें तेज सूर्यासह सर्व विश्वरचना दाखवितें, तें जगाच्या आरंभापासून अंतापर्यंत माझेंच आहे असें समजावें." **सूर्यासकट**--सूर्यासह. विश्वरचनेंत सूर्यही येतो. म्हणून जगाबरोबर त्यालाहि दाखविणारा प्रकाश आपलाच आहे असें भगवान् सांगतात. सूर्य हा देखील आपल्या ताब्यांतून सुटलेला नाहीं, त्याच्यावरही आपली हुकमत चालते, हा भगवंतांचा आशय अधिक सूक्ष्मतेनें ज्ञानेश्वरांनीं येथें स्पष्ट केला आहे. **आद्यंतिं**--जगाच्या प्रारंभापासून अंतापर्यंत. **ओ. ३६७**-" हे पांडुसुता ! सूर्य जगांतलें पाणी शोषून घेऊन अस्ताला गेल्यावर, चंद्राची जी प्रभा जगाला आनंद देते, ती माझीच होय. " **सोखुनु**— शोषून. सूर्य दिवसभर जगांतलें पाणी शोषून सायंकालीं अस्तास जातो. त्याच्यानंतर रात्रीं येणाऱ्या चंद्राच्या प्रकाशानें जग आनंदित होतें. तो चंद्रप्रकाश आपलाच आहे असें भगवंतांचें सांगणें. **उल्हासु पुरवितसे**— आनंदाचा पुरवठा करतें, आनंद पुरवते. **मागौता**—नंतर, सूर्यास्तानंतर. **जोत्स्ना**—चंद्रप्रभा. **ओ ३६८**—" आणि जाळण्याचें व पचविण्याचें जे वाटेल तेवढें सामर्थ्य अग्नीच्या तेजांत आहे, तें तेज माझेंच. " वाटेल तें जाळण्याचें व पचविण्याचें सामर्थ्य अग्नींत आहे, तें सामर्थ्य आपलेंच आहे, असें भगवान् म्हणतात. **सिद्धि**— सामर्थ्य. **निरवधि**-अमर्याद. ( क्रि. वि. ) याचा संबंध ' करितसे '

याकडे घ्यावा. **हुताशि**—अग्नींत असणारी. जगांतलि तिन्ही तजस्वी शक्तींचा उगम आपल्यापासून आहे, असें एकंदरीनें भगवंतांचें प्रतिपादन.

( **श्लोक १३** )—" तसेच पृथ्वीमध्यें प्रवेश करून, मीच आपल्या सामर्थ्यानें सर्व भूतें धारण करतो, आणि रसात्मक चंद्र होउन सर्व औषधींचें पोषण मीच करतो." **ओ. ३६९**-" मी या पृथ्वींत शिरलों आहे म्हणून केवळ रज:कणांचें बनलेलें हें पृथ्वीचें ढेकूळ, समुद्राच्या महाजलांत विरघळून गेले नाहीं." पृथ्वी ही रज:कणांची झालेली असल्यानें, सभोंवतीच्या समुद्रजलांत ती केव्हांच विरघळून गेली असती. पण भगवंताचे म्हणणें असे कीं, आपण या पृथ्वींत शिरल्यामुळेंच ती अशी टणक होउन समुद्रांत विरघळली नाहीं. हें आपलेच सामर्थ्य असें सांगण्याचा भाव. **पासूची ढेंपुलीं**-रज:कणाची, मातीची ढेप, ढेकूळ. **विरणें** विरघळणे **ओ. ३७०**- " आणि ही पृथ्वी जीं असंख्य चराचर भूतें आपल्या पाठीवर धारण करते, तीं तिच्यांत शिरून मीच धारण करतो." इतक्या स्थावरजंगमात्मक वस्तू पाठीवर धारण करण्याची शक्ति जी पृथ्वींत आली, ती मी तिच्यांत शिरल्यामुळेंच आली, असे भगवान् सांगतात. **चराचर भूतें**- सजीव निर्जीव सृष्टि. **धरीतसे**- धारण करते. **धरि**-पृथ्वींत. **धरें**- सांवरून धरतो. **रिगोनियां**- शिरून **ओ. ३७१**- " हे पांडुसुता ! मी आकाशांत चंद्राच्या रूपानें जणु काय अमृतानें भरलेलें चालतें सरोवरच झालों आहे." चंद्र आपल्या अमृततुल्य किरणांनीं जगाला आनंद देतो, म्हणून चंद्राला सुधांशु म्हणतात. शिवाय चंद्राच्या पोकळींत पाणी आहे अशी समजूत असल्यानें, चंद्राला तळ्याची नेहमींच उपमा देतात चंद्र हा आकाशांत चालतांना वावरतांना दिसतो, म्हणून त्याला येथे अमृताचें चालतें सरोवर असें म्हटलें आहे. चंद्राच्या रूपानें आपणच सर्वांवर अमृतसेक करणारें चालतें सरोवर आहों, असा भगवंतांच्या सांगण्याचा एकंदरीनें भाव आहे **मीसें**- मिषानें, रूपानें. **भरला**— भरलेलें. **चालता**— चालणारें. **ओ. ३७२**- " तेथून पसरणाऱ्या चंद्रकिरणांच्या पाण्यांचे असंख्य पाट पुढे लोटून, मी सर्व वनस्पतींचे मळे भरून टाकतो." चंद्र किरणांतुन स्रवणाऱ्या अमृतानेंच औषधिवनस्पतींचें पोषण होतें. चंद्रकिरणांच्या अमृताच्या पाटाचें पाणी

औषधिवनस्पतींच्या मळ्यांना मिळून ते पिकतात, व या वनस्पती जगाच्या रोगनिवारणाला उपयोगी पडतात. चंद्र याप्रमाणें औषधिवनस्पतींना जगवितो, म्हणून त्याला 'ओषधीश' म्हणतात. येथे भगवान् आपण चंद्रकिरणाच्या पाटाचें पाणी वनस्पतींना देतों असें सांगतात. **रश्मिकर**–किरण-रूपी हात. येथे रश्मि व कर असे एकाच अर्थी शब्द आले आहेत, असें वाटतें पण कर=हात असा अर्थ घ्यावा. **पलोनि**–पुढे ढकलून, पाटांतून पाणी पुढे नेऊन. पहा "चतुर सारथियें रथ पेलिला' नागेश–सीतास्वयंवर. **आगर**–मळे. गोंव्याकडे सुपारीच्या व नारळाच्या बागांना कुळागर म्हणतात. **ओ. ३७३**–"अशाप्रकारें मी सर्व प्रकारच्या धान्यांना रसभरित करतों, व अन्नद्वारां सर्व प्राणिमात्राला जीवन देतों." **एसेनि**- याप्रमाणें म्हणजे चंद्रकिरणाचें पाटाचें पाणी पुरवून. चंद्रकिरणाचें हें अमृततुल्य उदक धान्यानाही पुरविलें गेल्यामुळें, तीं धान्ये देखील रसभरित व चवदार होतात, व अशा चवदार अन्नानें मी सर्व प्राणिमात्राला जगवितों असे भगवान् येथे स्पष्ट करतात. **सस्य**- धान्य, विशेषेंकरून भात. **रसाल**-रसभरित, चवदार. **जिव्हाळा**–जीवन. पुढील श्लोकांत प्राणिमात्राच्या पोटांत आपण विविध अन्ने कशीं पचवितो, ते वर्णन करतात.

( **श्लोक १४** )—" मी वैश्वानर ( अग्नि ) होऊन प्राण्यांच्या देहांत राहिलो असून, प्राण व अपान या वायूंशीं युक्त होऊन ( खाद्य, पेय, लेह्य व चोष्य असें ) चार प्रकारचें अन्न पचन करतों." **ओ. ३७४**—" आणि अन्न जरी उत्पन्न केलें, तरी प्राण्याना अशी तीव्र भूक लागावी कीं, जिनें ते खाल्लेलें अन्न पचून प्राणिमात्राला समाधान वाटावें." तीव्र भूक लागल्याशिवाय खाल्लेलें पचणार नाहीं. भुकेनेंच खाल्लेले जिरतें, व प्राण्यांना मग समाधान वाटतें. ही तीव्र क्षुधा म्हणजेच जठराग्नि होय व हा आपण होतो, असें या श्लोकांत भगवान् सांगतात. **निफजाविलेयां**—उत्पन्न केल्यानंतर. **दीपन**—तीव्र भूक. **ओ. ३७५**–" म्हणून हे अर्जुना ! प्राणिमात्रांच्या शरीरांत नाभिकंदावर शेगडी पेटवून जठरांत मीच तेज होऊन बसलों आहे." पोटांत बेंबीवर जठराग्नि आहे, तो खाल्लेलें अन्न पचवितो. ही पचनक्रिया चालण्यासाठींच जठराग्नीची

ही व्यवस्था केलेली आहे. **घटीं**-शरीरांत. **कंद**-नाभिस्थान, **आगिठी**-आगटी, शेगडी. **दीप्ति**-तेज. **म्हणौनि**-वर सांगितल्याप्रमाणें तीव्र भूक लागून प्राण्यांनीं खाल्लेलें अन्न पचावें व त्यांना समाधान व्हावे, यासाठीं आता जठराग्नि कसा प्रदीप्त होतो ते वर्णन करतात. **ओ. २७६**—" प्राण व अपान यांच्या जोडभात्याने रात्रंदिवस हा जठराग्नि फुंकून फुंकून प्रदीप्त करून मी पोटांत किती अन्न पचवितो ते सांगतां यावयाचे नाहीं. ' **प्राणपान**-प्राण म्हणजे पुढे जाणारा उच्छ्वास वायु, श्वास. हा पंचप्राणांपैकी पहिला प्राण होय. अपान— हा पंचप्राणापैकीं दुसरा असून, हा अधोगामी वायु गुदप्रदेशीं राहतो. प्राण ( श्वास ) वर तोंडांतून बाहेर जाणारा व अपान खालीं जाणारा, अशा जोडभात्यानें. पहा— " प्राणापानाची चुकामुकी । जाहली होती बहुकाळ कीं । '— एकनाथी भागवत ९।११८. **जोडभाता**—भात्यांची जोडी. सोनाराचा भाता प्रसिद्ध आहे. **आटणें**-निकाल करणें, फडशा पाडणें. **नेणो केतीं**-किती म्हणून अन्नाचा फडशा पाडीत असेन कोणाला ठाऊक ! **ओ. २७७**— " कोरडें, ओलें, शिजविलेले व भाजलेलें ( करपलेलें ) अशीं चार प्रकारचीं अन्नें मीच पचवितो. " ज्ञानेश्वरांनीं येथें खाद्य, पेय, लेह्य व चोष्य अशी चार प्रकारची अन्ने न घेतां, वरील कोरडें ओलें, शिजविलेले व भाजलेले असे जे अन्नाचें प्रकार घेतले आहेत, तेच पचनाच्या दृष्टीनें येथे सयुक्तिक आहेत. कसलेंही ओलें वाळलेलें अन्न असलें, तरी मी पचवून खलास करतो, असे भगवंताना सांगावयाचें आहे. येथे जठराग्नीचे कसलेंही जड अथवा हलकें अन्न पचविण्याचें सामर्थ्यच व्यक्त करावयाचे असल्यानें, ज्ञानेश्वरानीं घेतलेले चतुर्विध अन्नाचे प्रकार अधिक मार्मिक आहेत. **विदग्धें**- भाजलेलीं, करपलेलीं. **ओ. २७८** " अशाप्रकारें सर्व लोक म्हणजे मी, सर्व लोकांचे जीवन मीच, व त्या जीवनाचें मुख्य साधन जो अग्नि तोही मीच. " भगवान् येथे सर्व आपणच म्हणून सांगतात. जठराग्नि असल्याशिवाय प्राणिमात्रांचे अन्न कसें पचणार ? यावरून मी= जठराग्नि= जीवन = जन असे समीकरण भगवंतांनीं घातलें आहे. **ओ. २७९**- " आतां इतक्या उपर तुला माझ्या व्यापकपणाची नवाई काय सांगू ? या जगांत दुसरें कोणी नाहीं, हें लक्षांत ठेव. मीच सर्वत्र भरून राहिलों आहे."

ज्ञानेश्वरांनीं वास्तविक भगवंतांच्या तोंडून आपला व्यापकपणा जो वर्णन केला आहे, त्याला मूळ गीतेच्या या १४ व्या श्लोकांत, मुळींच आधार नाहीं. पण पुढील २८० ओवींपासून अर्जुनाला आलेली एक शंका गृहीत धरून एका नवीनच प्रश्नाची त्यांना उभारणी करावयाची असल्याने, ज्ञानेश्वरांना भगवंतांच्या तोंडीं त्यांच्या व्यापकपणाचे वर्णन कल्पनेने घालावें लागलें आहे. **व्याप्तिची नवाई**–माझ्या व्यापकपणाची अद्भुतता. **ओ. २८०**— येथून दोन ओव्यांत अर्जुनाच्या बाजूची एक शंका श्रीकृष्णांनीं आपणच उपस्थित केल्याचा जो प्रसंग ज्ञानेश्वरांनीं काल्पिला आहे, तो अगदींच नवीन आहे. " तर मग या जगात कांहीं माणसं सदा सुखी तर कांही दुःखपीडित दिसतात, हें कोणत्या दृष्टीनें ?" **वखे**–दृष्टीनें. जगांत सर्वत्र जर परमेश्वर भरला आहे व तोच जर सर्वांचा जीवनाधार आहे म्हणून वर सांगितलें, तर मग जगांत कांहीं माणसं सुखी व काहीं दुःखी असा फरक कां दृष्टीस पडावा ? " अहं वैश्वानरो भूत्वा प्राणिनां देहमाश्रितः " या श्लोकावरून वास्तविक ज्ञानेश्वरांनाच ही शंका आलेली आहे. पण येथें गीतेचें प्रवचन कृष्णार्जुनसंवादरूपानें असल्यानें, " अर्जुनाला अशी शंका येईल असें श्रीकृष्णांनीं गृहीत धरूनच त्याच्या शंकेचं मग निवारण केलं, " असा प्रसंग ज्ञानेश्वरांनीं कल्पून वरील शंकेला श्रीकृष्णांच्या तोंडूनच त्यांनीं उत्तर दिलें आहे. पुढील ओवींत अर्जुनाच्या बाजूची शंका दृष्टांताने मांडतात. **ओ २८१**– " ज्याप्रमाणें सगळ्या शहरांत एकाच दिव्यानें सर्वत्र दिवेलावणी झाली असतां त्यापैकीं कांहीं दिवे प्रकाश न दाखविणारे ( व कांहीं प्रकाश दाखवणारे ) असं कां उरावे ? " सर्व दिवे जर एकाच दिव्यानें लावले तर सर्वांनीं सारखाच प्रकाश द्यावयास नको होता काय ? त्यापैकीं कांही प्रकाश न देणारे तर काहीं देणार असा भिन्न प्रकार कां आढळावा ? त्याचप्रमाणें परमेश्वरच जर सर्वांचा एकटा जीवनाधार झाला, तर कांहीं प्राणी सुखी व इतर कांहीं दुःखी असें कां असावे ? सर्वच सुखी असावयास नको होते कां ? अर्जुनाला म्हणजे सामान्य वाचकाला अशी शंका कदाचित् येईल असें कल्पून, ज्ञानेश्वरांनीं श्रीकृष्णाच्या तोंडून तिला उत्तर देण्याचा उपक्रम पुढील ओवीपासून केला आहे. वास्तविक " नेश्वरो जगतः कारणं समुत्पद्यते कुतो **वैषम्यनैर्घृण्यप्रसंगात् ।** " या **शांकरभाष्यांतील पूर्वपक्षाचाच हा अनुवाद**

आहे. **न देखणी--** न दाखविणारे. म्हणून श्रीकृष्ण जणु काय अर्जुनाला म्हणतात **ओ. ३८२-**" अशा प्रकारचा तर्कवितर्क जर तूं आपल्या मनांत करीत असशील, तर तुझी ही शंका कशी उत्तम रितीनें घालवितो तें ऐक." पुढील ओवीपासून श्रीकृष्णाच्या तोंडून अर्जुनाच्या तथाकथित शंकेस ज्ञानेश्वरांनींच उत्तर दिलें आहे. **उलिविखि-** तर्कवितर्क **फेडण-** घालविणें. **ओ. ३८३-** "हे पहा कीं, सर्वत्र मी भरलेला आहे व मी कोठेंच भिन्न असा नाहीं. पण माझ्या भिन्नत्वाची कल्पना त्या त्या प्राणिमात्रांच्या ठिकाणीं उद्भवते." श्रीकृष्णाचे म्हणणे असें कीं, मी सर्वत्र भरून राहिलो असून सर्वांना सारखाच आहे. पण प्राणिमात्र आपापल्या बुद्धीप्रमाणें माझ्या भिन्नत्वाची कल्पना करून, आपणाला सुखी किंवा दुःखी समजतात. वास्तविक ईश्वर सर्वांना सारखा व सर्वांच्या अंतःकरणात आहे. पण लोक आपापल्या वृत्तीप्रमाणें सुखाची अथवा दुःखाची कल्पना करून ईश्वरावर भिन्नत्वाचा आरोप करतात. **अनारिसें-** भिन्न **उल्हसे-** प्रकट होते. हेंच निरनिराळ्या दृष्टांतांनीं विशद करतात. **ओ. ३८४-** "ज्याप्रमाणें एकाच आकाशध्वनिला भिन्नभिन्न वाद्यविशेषाप्रमाणें भिन्नभिन्न आवाजांत वाजणें भागच पडतें." आकाशाचा गुण शब्द करणें हा असल्यानें, सर्व आकाशाचा एकच सारखा शब्द किंवा आवाज करण्याचा गुण आहे. पण ह्याच आकाशाचा ध्वनि ज्यावेळीं, मृदंग, तंबोरा, सनई अशा निरनिराळ्या वाद्यांचा आश्रय करतो, त्यावेळीं त्याच ध्वनीचे निरनिराळे नाद होणे भागच पडतें. आकाशाचा मूल ध्वनि एकच असतां, निरनिराळ्या वाद्यामुळें तो जसा भिन्न भिन्न वाटतो, तसाच मूळ ईश्वर सर्व प्राणिमात्रांना सारखाच असतां, प्रत्येक प्राणिमात्राच्या वृत्तीप्रमाणें तो ईश्वरास म्हणजे आपणास सुखी अगर दुःखी ठरवितो. वास्तविक ईश्वर सर्वांना समच आहे. पण मी सुखी किंवा मी दुःखी अशी जी प्राणिमात्राची समजूत होते, ती त्यांच्या भिन्नवृत्तीमुळें होय. **वाद्यविशेषें--** निरनिराळ्या वाद्यांच्या अनुरोधानें. **आनान-** भिन्नभिन्न **वाजावें पडे—** वाजणें भाग पडतें, वाजावें लागतें. **ओ. ३८५—** "किंवा सूर्य एकच असतां तो लोकाच्या व्यवहारांत भिन्न भिन्न तऱ्हेनें उपयोगीं पडतो." **म्हणजे सूर्य एकच असला,**

तरी लोकांच्या व्यवहारानुरूप त्याचे भिन्न भिन्न उपयोग करून घेतले जातात. याला सूर्य जबाबदार नसून भिन्न भिन्न लोकव्यवहारच जबाबदार आहेत. ईश्वरही असाच सर्वांना सारखा असून लोकांच्या कृत्यनुरूप तो भिन्न भिन्न भासतो, असा भाव. 'लोकचेष्टि वेगळाला आनाना उपेगासि गेला' असा अन्वय. लोकव्यवहाराला सूर्याचे निरनिराळे उपयोग होतात कोणाला त्यापासून प्रकाश, तर कोणाला उष्णता मिळते. ओ. ३८६— "अथवा बीजाच्या गुणधर्मानुसार पाणी झाडाच्या रूपानें उभें राहतें. त्याप्रमाणें माझें रूप निरनिराळ्या प्राण्यांच्या ठिकाणीं परिणाम पावतें." पाणी एकच असतें पण निरनिराळ्या बियांप्रमाणे त्यांतून निरनिराळीं झाडें उत्पन्न होतात. त्याप्रमाणें ईश्वर एकच असून भिन्न भिन्न प्राण्यांच्या ठिकाणीं त्याचें स्वरूप भिन्न भिन्न होतें. **उभविणें**— उभे राहणें. **परिणमले इ०**— माझें एकच रूप निरनिराळ्या प्राण्यांना भिन्न भिन्न वाटतें. माझ्या स्वरूपाचा निरनिराळ्या प्राण्यावर निरनिराळा परिणाम घडून, त्यांना आपण सुखी किंवा दु:खी असें वाटतें. **ओ. ३८७**— "अरे! एका अडाण्यापुढें व एका चतुर माणसापुढें नीलमण्यांचा एक दुपदरी हार ठेवला, तर अडाण्याला तो सर्प भासतो, तर दुसऱ्या चतुराच्या तो सुखाला कारण होतो." हा सगळा दृष्टिभेद आहे. नीलमण्याचा हार हा एकच आहे. पण अडाण्याची दृष्टि व चतुराची दृष्टि यामुळेच तो एकाच्या दु:खाला तर दुसऱ्याच्या सुखाला कारण झाला असाच प्रकार सर्वांना सम असणाऱ्या ईश्वराचा आहे **नेणा**— अज्ञान्याला. **चउर**-चतुर **निलेयाचा दुसरा**— नीलमण्याचा दुपदरी हार. पहा- "स्रजमपि शिरस्यंधः क्षिप्तां धुनोत्यहिशंकया।-" शाकुंतल ७।२४. **ओ. ३८८**— "फार काय पण स्वाती नक्षत्रांचें पाणी शिंपल्यांत मोती तर सर्पाच्या तोंडी विष होते त्याप्रमाणें ज्ञान्याला मी सुखकारक तर अज्ञान्याला दु:खकारक होतो" एकच वस्तु भिन्नभिन्न पात्रांत भिन्नभिन्न स्वरूपाची होते, या न्यायाने एकच परमेश्वर भिन्नभिन्न प्राण्यांना भिन्न भिन्न भासतो, हाच सिद्धांत येथे प्रस्थापित केला आहे यालाच समानार्थक पहा- 'पात्रविशेषन्यस्तं गुणांतरं व्रजति शिल्पमाधातु: । जलमिव समुद्रशुक्तौ मुक्ताफलतां पयोदस्य ॥ - मालविकाग्निमित्र **विआलें**— सर्पांत. **भगवान्** (परमात्मा) आपल्या सामर्थ्याचें पुढें वर्णन करतात.

( श्लोक १५ )— 'सर्वांच्या हृदयांत मीच राहत असून, स्मृति, ज्ञान व त्यांचा नाश हीं माझ्यापासूनच होतात. सर्व वेदांनीं जाणण्यास मीच योग्य असून, वेदांताचा कर्ता व वेद जाणणारा मीच आहे. " **ओ ३८९**— " हे पार्था ! सर्व प्राण्यांच्या हृदयांत ' मी अमका आहे ' ही जी जाणीव अहोरात्र जागृत असते, ती मीच आहे. " प्रत्येक प्राण्याच्या मनांत ' मी अमका ' हा जो अहंकार, त्या अहंकाराची जाणीव म्हणजेच आत्मा होय. **अहर्निशी**—अहोरात्र. **ओ. ३९०**- " पण संतसमागमांत, राहत असतां, योगाभ्यास व ज्ञान यांत प्रवेश करीत असतां, व गुरूंच्या पायांची सेवा वैराग्यानें केली असतां, ( हा अहंभाव आत्मस्वरूपीं लय पावतो ). ज्ञानेश्वरांनीं या ओवींत संतसमागम, योगज्ञानाभ्यास व गुरुसेवा ही ज्ञानाचीं साधनेंच येथे सांगितलीं आहेत. या साधनांनीं ज्ञान मिळविल्यावर अहंकार नष्ट होऊन अज्ञानाचा लोप होतो. **योगज्ञानि**-योग=हटयोग असा किंवा फलासक्तिविरहित कर्मयोग असा अर्थ घ्यावा. ज्ञान=आत्मापरमात्मैक्याचें ज्ञान अशा योग व ज्ञानाच्या अभ्यासांत. **पैसतां**-प्रवेश करून. **ओ. ३९१**—" ज्यांचा मीपणा आत्मस्वरूपांत विलीन होतो, त्यांचें अज्ञान अशाच चांगल्या कृत्यांनीं नष्ट होतें." ज्यांचा अहंकार परमात्म्यांत विलीन होतो म्हणजे आत्मा व परमात्मा हे एकच आहेत असें ज्ञान ज्यांच्यांत बाणलें आहे, सर्वाभूतीं परमेश्वर असल्याची साम्यावस्था ज्यांना प्राप्त झाली आहे, त्यांचें असतें नसतें अज्ञान वरील संतसमागमादि सत्कृत्यांनीं नाहींसें होतें. तात्पर्य ' अहं ब्रह्मास्मि ' अशी त्यांची स्थिति होते. यालाच मागें अध्याय १४ मध्ये दिलेला दृष्टांत पहा—" नलिकेवरौनु उठिला । जैसा शुकु शाखे बैसला । तैसा मूळ अहंते ठेला । तो म्हणौनि ॥—ज्ञानेश्वरी १४।३००.

**ओ. ३९२**—" तें आत्मरूप आपलंच आहे, असं ज्ञानदृष्टीनें ओळखल्यावर ते ( ज्ञानी ) मग माझ्याशीं ( परमात्म्याशीं ) ऐक्य पावून सदैव आनंदांतच असतात. मग तेथे पाहायला माझ्याशिवाय दुसरं कोणतं साधन असणार ? " माझं परमात्म्याचं ज्ञान करून घेण्यास दुसरं कोणतं साधन त्यांना उपलब्ध असणार ? आत्मापरमात्म्याचें मीलनहि शिवाय सदैव आनंदयुक्त असें असतें. परब्रह्म किंवा परमात्मा हा नेहमीच

सत्, चित् व आनंद या स्वरूपाचा असल्यामुळें, अहंब्रह्मास्मि ही ऐक्याची अवस्था अशी महदानंदाचीच असणार. **आपेंआपु**- आपणास आपण. आत्मा हा परमात्म्याचेंच प्रतिबिंब असल्यानें आत्म्यानें परमात्म्यांत मिळणें म्हणजे स्वतःलाच पाहणें होय **दावि**—दृष्टीनें, ज्ञानदृष्टीने **मियां आत्मेन**- मी जो परमात्मा, त्या माझ्याशी एक्य पावल्यानें. **आन हेतु असे**-परब्रह्मावाचून दुसरें कोणती वस्तु कारण आहे ? परब्रह्म हे स्वयंप्रकाशी असल्यानें, त्याच्या ज्ञानानेंच त्याला ओळखावयाचें आहे यालाच दृष्टांत देतात. **ओ. ३९३**—' हे धनंजया ! सूर्योदय झाल्यावर सूर्याच्या प्रकाशानेंच सूर्य पहावा लागतो. त्याप्रमाणें माझें ज्ञान करून घेण्यास अथवा माझें स्वरूप जाणण्यास मींच कारण होतो. " सूर्य पहावयाचा झाल्यास त्याचाच प्रकाश कारणीभूत होतो, दुसऱ्या कोणत्या प्रकाशाची तेथे जरूरी लागत नाहीं. कारण सूर्य हा स्वयंप्रकाशी आहे, त्याप्रमाणें भगवान् म्हणतात कीं, माझें परमात्म्याचें ज्ञान करून घेण्यास दुसऱ्या कोणत्या अन्यसाधनाची आवश्यकता नाहीं. परमात्मा असाच स्वयंप्रकाशी अथवा स्वयंज्ञानयुक्त आहे परमात्म्याचें, परब्रह्माचें ज्ञान होतांच, आणखी कशाचीच अपेक्षा राहत नाहीं. परब्रह्माला जाणावयाचे असल्यास त्याचेच ज्ञान करून घेतलें पाहिजे. स्वयंप्रकाशी वस्तूंची गोष्ट अशीच असते. परब्रह्माला येथ स्वयंप्रकाशी सूर्याची दिलेली उपमा फारच अन्वर्थक व अचूक आहे. संतांच्या ज्ञानदृष्टीचे हे वर्णन केल्यावर त्यांच्या उलट अज्ञानी लोकांच्या दृष्टीचें पुढील ओव्यांत वर्णन करतात. ' ज्ञानमपोहनं च ' या मूळ श्लोकांतील पदावर व्याख्यान करतांना, ' ज्ञान ' म्हणजे अहंब्रह्मास्मि ' हें ज्ञान सांगितलें. आतां त्याच्या उलट शरीरावरील आसक्ति व संसाराबद्दल गौरव, ही अज्ञानी माणसाची वृत्ति सांगून, या ज्ञानी व अज्ञानी अशा दोनी वृत्ती आपल्यापासूनच उद्भवतात, हे पुढे सांगतात. **ओ. ३९४**—" अथवा आपणास प्रिय असणाऱ्या शरीराची सेवा करतांना किंवा संसाराची बढाई, मोठेपणा एकतांना, ज्यांचा मीपणा देहांतच बुडून गेला आहे." वरील ज्ञानी लोकांच्या वर्णनाच्या विरोधानें हें अज्ञानी लोकांचें वर्तन पहावें. हे अज्ञानी लोक शरीर अविनाशी आहे अशी खोटी समजूत करून घेऊन त्याचीच दुरुस्ती राखण्यांत गढून गेलेले असतात. संसारांत आपण अमकें केलें, तमकें

मिळवलें, अशा वल्गनेंतच ते गढून गेलेले असतात व त्यांचा मीपणा शरीरावर कायम झालेला असतो. सारांश नाशवंत व मिथ्या असे जे शरीर व संसार, तेवढ्या बद्दलच त्याची आसक्ति असून, मीपणा अमर अहंपणा टाकण्याऐवजी ते शरीरालाच सर्वस्व मानतात. आपला अहंपणा परमात्म्यात विलीन करण्याची ज्ञान्याची साम्यावस्था कोणीकडे, व देहावरच सर्व अहंभाव स्थिर करण्याची याची द्वैत-वृत्ति कोणीकडे ! **शरीरप्रियातें**—प्रिय असणाऱ्या आपल्या शरीराला. शरीर-रूपी प्रियाची सेवा करताना, असा या समासाचा खरा अर्थ होईल. **देहि जयाची इ०**-ज्यांची अहंता, आत्मीयता देहावर स्थिर झाली. देहाच्या पली-कडील परमात्म्याकडे याचें लक्षच जात नाहीं. देहच सारसर्वस्व असें ज्या अज्ञान्यांना वाटतें. अशाच अज्ञानी लोकाचें आणखी वर्णन देतात.

**ओ. ३९५**—" ते स्वर्ग व संसारासाठीं कर्ममार्गावर सारखे धांवत असतात, व मग दुःखाच्या उत्तम वाट्याचे भागीदार होतात." इहलोकीं आपला संसार सुखाचा व्हावा, व परलोकीं आपणास स्वर्गसुख प्राप्त व्हावें, म्हणून हे अज्ञानी लोक अनेक प्रकारचा व्रतें व यज्ञ आचरून कर्ममार्गाचा अवलंब करीत असतात. व्रतानीं पुण्य लागून संसारसुख मिळतें, तर अनेक यज्ञानीं स्वर्ग मिळतो. अशा व्रतें व यज्ञ यांच्या धावपळींत ते फलाशेनें कर्में करीतच असतात. पण हा संसार व स्वर्ग हे मोक्षाच्या अपेक्षेनें क्षणिक होत, हें त्यांना कळत नसतें. कर्माचें पुण्य संपल्यावर, हें संसार व स्वर्गसुख आपोआप नष्ट होतें, हे त्यांना समजत नाहीं. 'क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति' ही स्थिति मग त्याना भोगावी लागते. अशा रितीनें स्वर्गातून खालीं पडल्यावर ते दुःखाच्या मोठ्या वाट्याचे भागीदार होतात. पुनः संसाराची व पुनः कर्मे करण्याची दुःखकारक जबाबदारी त्याना घ्यावी लागतें. **कर्माचेया मार्गि**—कर्ममार्गावर, फलाशा युक्त कर्ममार्गावर **सेल भागीं**— उत्तम वाट्यांत. **भागीन**— वाटेकरी. ( सं. भागिनः ) पण ही अज्ञानाची स्थिति देखील आळस्यामुळेंच होते असें भगवान् पुढें सांगतात.

**ओ. ३९६**— " पण हे अर्जुना ! हें अज्ञ होणें त्यांना माझ्यामुळेंच प्राप्त होतें. ज्याप्रमाणें जागृति हीच, स्वप्नावस्था व निद्रावस्था याना कारणीभूत

होते. " जागें राहणें हा धर्मच, स्वप्न व झोंप यांना कारण आहे. जागे राहणें ही अवस्था, व स्वप्न व झोंप या अवस्था सापेक्ष आहेत. जागे असल्याशिवाय झोप तरी कशी येणार व स्वप्न तरी कसें पडणार ? त्याच-प्रमाणें ज्ञान असल्याशिवाय अज्ञान संभवतच नाहीं. दगडाला कोणी अज्ञानी म्हणत नाहीं. म्हणून भगवान् म्हणतात कीं, ज्ञानयुक्त असे जे आपण, त्या आपणामुळेंच त्या अज्ञानांना अस्तित्व लाभतें. **मजाचें तव**-माझ्यामुळें, माझ्यास्तव. यालाच आणखी दृष्टांत देतात. **ओ. ३९७**—"पण ढगामुळें दिवस लोपला, तरी तें दिवसामुळेंच समजून येतें. त्याप्रमाणें माझें ज्ञान करून न घेतां प्राण्यांनीं जें विषयांचें सेवन केलें, तेंही माझ्यामुळेंच कळतें." कारण प्राण्यांना आपण विषयांचें सेवन करित आहों, अभक्ष्याचा उपभोग घेत आहों, हें जें समजलें, तेंहि परमेश्वराच्या ज्ञानामुळेंच होय. दिवसाचा उजेड असतो, म्हणूनच ढगानें दिवस लोपला आहे हें समजतें. रात्रीं कांहीं आपणास ही स्थिती समजणार नाहीं. अमुक गोष्ट अज्ञानीपणाची आहे, हें समज-ण्यास ज्ञानाची अपेक्षा असतेच. आपण विषयोपभोग घेऊन पाप करीत आहों, हें देखील परमेश्वराचें ज्ञान काय आहे, हें पाहिल्यावरच समजतें. म्हणू-नच अज्ञानाला ज्ञानाची अपेक्षा असतें, असें वर सांगितलें. **हारतला**--नेला, निस्तेज केला. **मी नणोनि** इ०-मला ( परमेश्वराला ) न जाणतां, माझें ज्ञान करून न घेतां ज्यांनीं विषयोप भोग घेतला, त्यांचीही चूक माझ्या ज्ञानामुळेंच कळून येते. **विखो**- विषय. **ओ. ३९८**-" एकंदरीनें हे धनंजया ! निद्रेला किंवा जागृतीला प्रबोध हाच जसा कारण होता, त्याप्रमाणें प्राण्यांच्या ज्ञान, अज्ञान या दोहोंसही मचि कारण आहे. " मनुष्याची निद्रावस्था किंवा जागृतावस्था ही जशी एका जागृतावस्तथेनेंच समजते, त्याप्रमाणें प्राणी ज्ञानी आहे कां अज्ञानी आहे, हें ज्ञानामुळेंच समजतें. ईश्वर हा ज्ञानमय असल्या-मुळें, प्राण्याच्या ज्ञानाज्ञानाला आपणच मूळ कारण आहे, असें जें येथे म्हटलें आहे, त्याचें रहस्य हेंच कीं, ज्ञान हें सर्वच गोष्टींच्या मुळाशीं आहे. **प्रबोधु**-जागृति. या ओवीनंतर साखरे व माडगांवकरप्रतींत दिलेली अधिक ओवी, याच ओवीचा निवळ अनुवाद करणारी असल्यामुळें, केवळ अधिक स्पष्टीकरणाच्या मोहानें कोणी तरी ती मागून घुसडून दिली असावी. **ओ. ३९९**—या

ओवीपासून पुढील तीन ओव्यांत अज्ञानामुळें आपलें वर्णन करतांना वेदांचीही कशी त्रेधा उडाली तें सांगतात. "म्हणून हे धनंजया! मी जसा आहे तसा मला न जाणतां, वेद मला जाणण्याची खटपट करूं लागतांच त्याच्या तीन शाखा झाल्या." भगवंतांचें म्हणणं असं कीं, "माझं खरं स्वरूप न समजताच वेद माझें वर्णन करूं लागला, तों त्याच्या ऋग्वेद सामवेद व यजुर्वेद अशा तीन शाखा झाल्या." माझें वर्णन करतांना वेदाच्याच भाषेत इतकी विसंगतता आली कीं, त्यामुळें मूळ वेदाचीच तीन शकलें झालीं. माझं वर्णन करतांना वेदाच्या एका भागाचा मेळ दुसऱ्याशीं नाही अशी स्थिति झाली, असा भाव. **जाणों गेला**—जाणावयाची खटपट करूं लागला. **जालिया शाखा**–शाखा झाल्या. येथे शाखा म्हणजे ऋग्वेद, यजुर्वेद व सामवेद असे तीन भाग घ्यावे, किंवा ऋग्वेदाच्या शाकलशाखा, बाष्कलशाखा अशा शाखा घ्याव्या. पण पुढील ओवींत 'तिन्ही शाखा' असें म्हटल्यामुळें, तीन वेदांचाच येथ उल्लेख अभिप्रेत आहे असें दिसतें. **ओ. ४००–** "तथापि वेदाच्या या तीन शाखाप्रकारांचा मलाच जाणण्याचा निश्चित हेतु आहे. ज्याप्रमाणें पूर्ववाहिनी व पश्चिमवाहिनी नद्यांना समुद्र हेंच आश्रय-स्थान आहे." नद्या पूर्ववाहिनी असल्या काय, किंवा पश्चिमवाहिनी असल्या काय, त्या जशा शेवटीं समुद्रालाच येऊन मिळतात, तद्वत् वेदांच्या तीन्ही शाखांच्या वर्णनाला मीच विषय होऊन बसलों आहों. वेदांचे कितीही प्रकार झाले, तरी त्यांचें पर्यवसान शेवटीं माझ्या (परमेश्वराच्या) वर्णनांतच होतें असा भावार्थ **त्रिशुद्धि**– खरोखर. **ठी**– पर्यवसान. या ओवीच्या उत्तरार्धाशीं समानार्थक पद्य– "यथा नदीनां बहवोंबुवेगाः समुद्रमेवाभि विशंति तद्वत्"— भगवद्गीता.

**ओ. ४०१–** 'आणि महासिद्धांताजवळ वेद आपल्या शब्दांसह लुप्त होतात. ज्याप्रमाणे सुगंधी वायूच्या लहरी, सुगंधासहित आकाशांत लुप्त होतात." 'अहं ब्रह्मास्मि,' किंवा 'ॐ तत्सत्' हे जे महासिद्धांत आहेत, त्यांच्या विवरणाच्या वेळीं वेदांना शब्द अपुरे पडून, त्यांना लुप्त व्हावें लागतें. वेदांचा परब्रह्मांच्या स्वरूपवर्णनाचा प्रयत्न फोल ठरून ते निरुपयोगी ठरतात. वरील महासिद्धांत हा आकाशाप्रमाणें व्यापक असल्यामुळें, त्याचें आकलन वेदांना

मुळींच न झाल्यानें, त्यांना मग शाखा फुटून लुप्त व्हावें लागतें. सुगंधी वायुलहरी ज्याप्रमाणें सुगंधासह आकाशांत कुठल्या कुठें लुप्त होऊन जातात, त्याप्रमाणें वेदाचा हा परब्रह्माचें वर्णन करण्याचा प्रयत्न, महासिद्धानाचे वर्णन करतांना, त्याच्यासह फोल ठरतो. परब्रह्माचे वर्णन करताना वेद, ' नेति नेतीत्यात्मा ' असें म्हणतात, हे प्रसिद्धच आहे. **ओ. ४०२—**" त्याप्रमाणें सर्व वेद जेव्हा लज्जित होऊन स्तब्ध होतात, त्यावेळीं मीच स्वतः प्रगट होऊन माझ्या स्वरूपाची योग्य ती निश्चिति करतो." भगवान् म्हणतात, कीं, महासिद्धाताचे विवरण करता न आल्यामुळें, वेदांना लाज वाटून ते मूकता स्वीकारतात. अशा स्थितींत आपणच स्वतः प्रकट होऊन, माझ्या परब्रह्म-स्वरूपाची प्रतीति मला आणून द्यावी लागते. ईश्वरानींच अवतार घेतल्यावर मग त्याच्या स्वरूपाची ओळख होण्यास काय वेळ ? पण वेद जेव्हां लाजून मूकता स्वीकारतात, त्याची जव्हा बोबडी वळते, तेव्हा जगाला आपल्या स्वरूपाची प्रतीति आणण्यासाठीं भगवंतांना अवतार घ्यावा लागतो. **श्रुतिजात—** तिन्ही वेद. **तें मीचि इ०**-ज्या स्वरूपाचें वर्णन करतांना वेद मुके झाले, ते स्वरूप मी माझ्या अवतारानें स्पष्ट करतो. **प्रकटोंनिया—** प्रगट होऊन. **ओ. ४०३—** " नंतर वेदासहित सर्व जग जेथें लय पावतें, ते शुद्ध आत्मज्ञानही जाणणारा मीच होय. " जे आत्मज्ञान म्हणजे ' ब्रह्मसत्यं जगन्मिथ्या ' हें ज्ञान झालें असतां, जग व वेदासारख्या सर्व वस्तु मिथ्या आहेत अशी प्रतीति येते, तात्पर्य जग व वेद यांना खरें अस्तित्वच नाहीं हें समजतें, तें आत्मज्ञान अथवा ब्रह्मज्ञान जाणणारा मीच आहे, असें भगवान् सांगतात. अर्थात् भगवंताशिवाय त्याचेच ज्ञान दुसऱ्या कोणाला असणार ? या ओवींत व पुढें ' वेदात कृद्वेदविदेव चाहम् ' या पदावर व्याख्यान चाललें आहे. जग खोटें, मिथ्या आहे हें समजलें कीं, तें नष्ट झालेंच. कारण मिथ्या वस्तूंना खरें अस्तित्व कुठचें ? पण जगाचा आभास जसा आपल्यावर ( परब्रह्मावर ) केला जातो, तसें जगाचें खरें ज्ञानही आपल्या ठिकाणींच असतें असें म्हणतांना, भगवान् अज्ञान व ज्ञान दोनीहि आपल्या ठिकाणीं असतात असेंच प्रतिपादन करतात. यालाच दृष्टांत देतात. **ओ. ४०४—** " ज्यावेळीं निजलेल्याला जागें केलें असतां, त्यानें स्वप्नांत पाहिलेल्या वस्तु आपल्या-

शिवाय दुसऱ्या कोणी नव्हत्या, आपणच त्या वस्तू झालों होतो, असे त्याला समजतें, व मग स्वप्नांतले आपण व जागेपणचें आपण हे एकच हें त्याला दिसून येतें " झोपेंतल्या स्वप्नांत आपणच अनेक वस्तु झालों होतो पण तें खोटें असे ज्याप्रमाणें जागा झाल्यानंतर त्या माणसाला कळून येते, तसेंच स्वप्नांत अनेक वस्तू झालेलो आपण, व जागृतावस्थेतील खरे आपण, हे दोन्ही एकच, अशी त्याला जाणीव होते. म्हणजे स्वप्नांतील आभासयुक्त मिथ्याज्ञान हें जसें त्या निद्रितमाणसापासून उत्पन्न झालें होतें, तसेंच जागेपणाचें खरें ज्ञानही त्याच्याचठिकाणीं असतें. परब्रह्माचीही अशीच स्थिति आहे. परब्रह्मावर जगदाभास झाल्यावरचें मिथ्याज्ञान व परब्रह्माचें स्वस्वरूपाचे केवल ज्ञान, ही दोन्हीं परब्रह्माच्या ठिकाणींच असतात. स्वप्नांतले आपण व जागेपणीचे आपण, हे जसे एकच, तसेंच जगाचा आरोप केलेलें परब्रह्म व एकमेव असणारें निरुपाधिक परब्रह्म एकच, असा अर्थ **दुजों पारखे** — दिसूं लागतें. **ओ. ४०५** — " त्याप्रमाणें भेदबुद्धिविरहित असणारें माझें एकत्व मीच जाणत असून, असा बोध होण्यास आत्मस्वरूप जाणणारा मीच कारण आहे. " परब्रह्म हें जगाच्या उपाधीपासून अलिप्त असल्यानें, त्याच्या ठिकाणीं भेद संभवत नाहीं. आपल्या एकत्वाची, अभेदत्वाची जाणीव परब्रह्माला आहे. असा एकत्वाचा बोध किंवा ज्ञान होण्यास परब्रह्मच कारण आहे. **दुजेन विण** — भेदबुद्धि-विरहित, उपाधिविरहित. **ओ. ४०६** — " तर हे वीरा अर्जुना! जाळलेल्या कापराच्या मागें ज्याप्रमाणें त्याची काजळीही राहत नाहीं व अग्नीही राहत नाही, " त्याप्रमाणें आत्मज्ञान होऊन परब्रह्मांत मिळून गेलेल्याच्या ठिकाणीं अज्ञान व ज्ञान दोन्हीही संभवत नाहींत. तो अज्ञानाच्या तसाच ज्ञानाच्याही पलीकडे गेलला असतो. **ओ. ४०७** -" त्याप्रमाणें समूळ अज्ञानाचा नाश करणारें ज्ञानही ज्या वेळेस लय पावतें, त्यावेळीं तें नाहीं असेंही म्हणवत नाहीं, व आहे असेंही म्हणवत नाहीं. " परमात्म्याचें खरें ज्ञान होऊन ज्ञाता त्यांत सर्वस्वी मिळून गेल्यावर मग तेथे ज्ञाता, ज्ञेय व ज्ञान ही त्रिपुटीच नष्ट होते. अशी अभिमानत्रिपुटी नष्ट झाल्यावर, मग तेथे ज्ञान नाहींच असें म्हणावें लागतें. **पण जोंपर्यंत ही अभिमानत्रिपुटी नष्ट होत नाहीं, तोंपर्यंत तेथ ज्ञान आहेच असें**

म्हणावें लागतें. म्हणून 'ज्ञान आहे असेंही नाही व नाहीं असेंही नाहीं' असें जें वर म्हटलें आहे, तें या अभिमानत्रिपुटीच्या अनुक्रमें नाशाच्या व अस्तित्वाच्या दृष्टीनें म्हटलें आहे **जैं बुडौनि जाए**-जेव्हां नामशेष होते ज्ञानाचाही जेव्हां मागमूस राहत नाहीं. पुढील ओवींत हीच परमात्म्याची केवल स्थिति सांगतात. **ओ. ४०८**-" असें पहा कीं, आपल्या पत्त्यासह ( आपला पत्ता मागें न ठेवतां ) जग चोरून आपल्या बरोबर घेऊन गेलेल्या चोराला कोण हुडकणार ? ही जी ( जग ही गेलें व चोरही गेला ही ) स्थिति, तीच माझी ( परमात्म्याची ) केवलावस्था होय. " जग हें अज्ञान व त्याची चोरी करणारें म्हणजे त्याचा नाश करणारें ज्ञान, या दोनींचा मागमूस जेथे लागत नाहीं तीच परब्रह्माची शुद्धावस्था होय. ज्ञानाला येथे चोराची दिलेली उपमा चातुर्याची आहे. अज्ञानाला ( जगाला ) चोरून नेणारा हा चोर ( ज्ञान ) फार अट्टल आहे. येथे या ज्ञानरूपी चोरानें जगरूपी अज्ञान चोरून नेलें, नष्ट केलें, व तें चोरून नेतांना, या ज्ञानरूपी चोरानें आपला मागमूसही ठेवला नाहीं. याचा अर्थ असा की, ज्ञानानें अज्ञान घालविलें व तें ( ज्ञान ) स्वतःही नाहींसें झालें. जगाच्या मिथ्याभासाला, अज्ञानाला घालवून स्वतःही ज्ञानानें नाहींसें होण्याची जी अवस्था, तीच परब्रह्माची शुद्ध किंवा केवलावस्था होय. ज्या स्थितींत ब्रह्मैक्य झाल्यामुळें ज्ञाता, ज्ञेय, व ज्ञान ही अभिमानत्रिपुटीच नष्ट होते, तीच ही केवलावस्था होय पुढील ओवींत या श्लोकाच्या विवरणाचा उपसंहार केला आहे. **ओ. ४०९**- " याप्रमाणें कैवल्यपदाचा स्वामी जो श्रीकृष्ण, त्यानें '**स्थावर** व जंगम पदार्थ हे सर्व आपणच व्यापले आहेत असें सांगतांना, आपल्या उपाधिरहित शुद्ध स्वरूपाच्या विवरणांत आपल्या विवरणाचें पर्यवसान केलें. " **रूप करणें**—सांगणें. **ठी केली**—पर्यवसान केलें. **निरुपाहतीं**-उपाधिरहित, शुद्ध अशा स्वरूपांत. या ओवीपासून ४१२ ओवीअखेरपर्यंत संजय किंवा ज्ञानेश्वर यांपैकीं कोणीतरी हा अर्जुन-श्रीकृष्ण संवादाचा गोडवा जणुकाय पाहूनच वर्णन करीत आहेत !

**ओ. ४१०**- " ज्याप्रमाणें आकाशांतला चंद्रोदय क्षीरसमुद्रांत प्रतिबिंबित व्हावा, त्याप्रमाणें श्रीकृष्णांनीं केलेला हा आत्मबोध अर्जुनाच्या हृदयांत **ठसला.** " श्रीकृष्णांनीं केलेल्या ज्ञानप्रबोधाला चंद्रोदयाची **व अर्जुनाच्या**

हृदयाला क्षीरसमुद्राची दिलेली उपमा, जितकी ह्य तितकीच सार्थ अशी आहे. यालाच आणखी दृष्टांत देतात. ओ. ४११- " किंवा उत्तम गुळगुळीत भिंतीवर जसं तिच्या समोर काढलेलं चित्र प्रतिबिंबित होतं, तद्वत अर्जुन व श्रीकृष्ण यांमध्यें तो बोध नांदला." श्रीकृष्णानें केलेला तो बोध अर्जुनांत तसाच प्रतिबिंबित झाला, त्याच्या हृदयांत तसाच ठसला. प्रतिभींती चोखटे- समोरच्या ( opposite ) उत्तम भींतीवर. यावर अर्जुन श्रीकृष्णाला आणखी प्रश्न करणार आहे, याचा प्रस्ताव करतात. वास्तविक हा मधलाच श्रीकृष्णार्जुनसंवाद ज्ञानेश्वरांनींच स्वतंत्रपणें कल्पिला आहे. याला मूळ गीतेंत आधार नाहीं. ओ. ४१२— " कारण जसजसें परब्रह्माचें स्वरूप समजतें, तसतसें गोडीला बळ येतें. म्हणून अनुभाविकांचा राजा जो अर्जुन, तो श्रीकृष्णांना म्हणाला." अर्जुनानें मध्येंच श्रीकृष्णाला प्रश्न कां विचारला, याला हें ज्ञानेश्वरांनीं कारण दिलें आहे. फार काय आपण हा जो श्रीकृष्णार्जुनसंवादाचा नवीन प्रसंग कल्पिला आहे, त्याचें ज्ञानेश्वर जणु समर्थनच करीत आहेत. वस्तुस्वभाउ--परब्रह्मस्वरूप. फावे—समजतें, लाभतें. गोडिये थाउ—गोडीला बळ चढतें गोडी वाढते. जितकं ऐकावं तितकं अधिक गोड वाटतं. अर्जुन म्हणाला. ओ. ४१३- " देवा ! आपण आपल्या उपधिरहित व्यापकपणाचें जें स्वरूप प्रसंगाच्या ओघांत सांगितलेंत." वर ओ. ४०९ मध्यें श्रीकृष्णांनीं आपल्या उपाधिरहित शुद्ध स्वरूपांत आपल्या विवेचनाचें जें पर्यवसान केलें, तें इतर विषयविवेचनाच्या ओघांत केलें. असें आपलें स्वरूप सांगणें हा कांहीं त्याच्या विवेचनाचा मुख्य विषय नव्हता. म्हणून अर्जुन पुढील ओंवीत म्हणतो कीं, अशा प्रसंगानुसार केलेल्या आपल्या उपाधिरहित स्वरूपाच्या विवेचनांत थोडा फार कमीपणा राहिला असणें शक्य आहे. तर तें आपलें स्वरूप निखालसपणें सांगा. व्यापकपण बोलतां- " जड व अजड पदार्थ मीच व्यापून राहिलो आहे." असें सांगतांना. निरुपाधिक- उपाधिरहित, शुद्ध. प्रसंगता- प्रसंगोपात्त. ओ. ४१४- " तेंच पुन: आणखी एकदा यथासांग मला सांगा." यावर द्वारकानाथ श्रीकृष्ण म्हणाले, " फारच चांगली गोष्ट आहे." अर्जुनाची ही विनंति श्रीकृष्णांनीं मान्य केली. अवेगपणें—

अव्यंगपणें = यथासांग. **फांघणें कीजो**-सांगण्याचें करा, सांगा **भलें केलें-फार** चांगली गोष्ट बोललास यापुढील ओ. ४१५-४२७ मध्यें, श्रीकृष्ण व अर्जुन यांमधील उत्कट प्रेमाचें ज्ञानेश्वरांनीं वर्णन केलें असून, हा प्रेमाचा प्रसंगही त्यांनीं मध्यंतरीं स्वतंत्रपणेंच योजिला आहे. **ओ. ४१५—** "तर आम्हांला या विषयावर एकसारखें बोलत राहण्याची आवड आहे. पण काय करावें! तसा योग्य ( अधिकारी ) प्रश्न करणाराच मिळत नाहीं." आपल्या निरुपाधिक शुद्ध स्वरूपावर बोलत राहण्याची आपणास हौसच आहे, असें सांगून श्रीकृष्ण आतांपर्यंत तसा प्रश्न करणारा आपणास मिळाला नसल्याचें बोलतात. अर्जुनाच्या रूपानें आतां तसा अधिकारी प्रश्न करणारा आपणास मिळाला, असेंच त्यानीं येथें ध्वनित केलें आहे. **कोडें**— आवडीनें, कौतुकानें. **बोलों आवडे**— बोलणें आवडतें. **पुसतें**— पृच्छा करणारा. **न जोडे**— मिळत नाहीं. **तैसें**-योग्य असें, विषयानुरूप. श्रीकृष्ण असा अर्जुनासारखा प्रश्न करणारा मिळाला म्हणून समाधान व्यक्त करतात. **ओ. ४१६—**" तूं आज ज्या अर्थीं तोंड भरून प्रश्न करण्यास आला आहेस, त्या अर्थीं माझ्या इच्छित मनोरथाचें तुझ्यारूपानें फळच मिळालें आहे." श्रीकृष्णांचें म्हणणें असें कीं, अर्जुनाच्या प्रश्न विचारण्यास येण्यानें, आपल्याला आपल्या आवडत्या विषयावर बोलण्याची संधि मिळून, आपले इच्छित मनोरथ पूर्ण झालें. **तोंड भरून**-- विस्तारानें, स्पष्टपणें. 'तोंड भरून बोलणें' असा वाक्यप्रयोग आजही आपण वापरतो. **आजि मनोरथासि इ.—** आज तूं माझ्या मनोरथाला फल प्राप्त झाला आहेस. **जोडलासि**-- प्राप्त झाला आहेस. आपणास प्रश्न करून त्यांचे उत्तर देतांना, व अशाप्रकारें आपल्या जिव्हाळयाच्या विषयांवर बोलण्याची संधि मिळतांना आपणास केवढा आनंद होत आहे, तें श्रीकृष्ण पुढील ओवींत वर्णन करतात. **ओ. ४१७—** "अद्वैतसाक्षात्कारानंतर जें परब्रह्मसुख भोगायला सांपडतें, त्या सुखाचा अनुभव घडविण्यास तूं सहाय्यकर्ता झाला आहेस, व अशाप्रकारचा प्रश्न करून तूं माझें मलाच सुख देत आहेस." म्हणजे परब्रह्माचा साक्षात्कार होऊन त्यांत मिळून जाण्याच्या मोक्षानें जें सुख मिळतें, त्याच सुखाचा अनुभव ( माझ्या तुझ्या द्वैत स्थितींतही ) देण्यास तूं मला सहाय्य

केलें आहेस तुझ्या प्रश्नानें मला ( परमात्म्याला ) आत्मा भेटून जो ऐक्याचा आनंद होतो, तोच अनुभविण्यास आज मिळाला आहे. त्यामुळें मला स्वात्मसुखच लाभलें आहे. तुझ्या प्रश्नानें मला अतीव आनंद झाला आहे, असा भाव. **जे**—जें सुख अद्वैतानें, आत्मापरमात्मैक्यानें मिळतें. **विरजे**—विरजा = सहाय्यकर्ता. **मज माझें**—माझें मलाच, परमात्म्याला मला माझेंच सुख म्हणजे आत्मसुख होय. यालाच दृष्टांत देतात. **ओ. ४१८**—"ज्याप्रमाणें आरसा जवळ केल्यानंतर आपल्यालाच आपलें स्वरूप दिसतें, त्याप्रमाणे (त्या आरशाप्रमाणेंच) तूं संवाद घडवून आणणाऱ्यांचा ( ऐक्य घडवून आणणाऱ्यांचा ) शिरोमणि आहेस." सारांश असा कीं, आरसा जसा त्यांत पाहण्याऱ्याचें आपल्यांत प्रतिबिंब पाडून, बिंबप्रतिबिंबाचा संवाद ( ऐक्य ) दाखवितो, त्याप्रमाणेंच अर्जुनानें हा प्रश्न करून श्रीकृष्णांना त्यांच्याच आत्म्याच्या ऐक्याचें सुख दिलें. श्रीकृष्णांना आपलाच आत्मा आपण अर्जुनांत पाहत आहों असें वाटून त्याच्याशीं असलेल्या मनोमीलनाचें सुख झालें. एखादा मनुष्य आपल्याशीं एकदिल असल्याचें पाहून आपणास जें सुख मिळतें, तशाच प्रकारचें सुख श्रीकृष्णांना झालें. **आपणपयां**-आपणच, आपल्या डोळयानें आपणच दिसतों. **संवादियां**-ऐक्य करणाऱ्यांमध्यें. आरशाचा हा दृष्टांतही येथे अत्यंत अनुरूप व सार्थ असाच आहे. पुढे श्रीकृष्ण अत्यंत प्रेमानें म्हणतात. **ओ. ४१९**-"हे मित्रा ! तुला एखादि गोष्ट समजली नाहीं म्हणून तूं ती विचारावीस व तुझा प्रश्न ऐकून घेऊन ( त्याचें उत्तर न देतांच ) आम्हीं उगीच बसावें, हा प्रकार कांहीं आम्हांला शोभत नाहीं." "तूं विचारावेंस व आम्ही तुला न सांगावें हें कांहीं बरें नव्हे ! कारण तुझे माझे संबंधच तसे ऐक्याचे आहेत," असें म्हणण्याचा श्रीकृष्णांचा आशय आहे. **नणौनि**—न समजल्यामुळें. **परिसौनि**—तुझा प्रश्न ऐकून घेऊन. **पाडु**—प्रकार. **मिरवणें**-शोभणें. **पथ**—आम्हांला. अर्जुनाला आलिंगन दिल्याशिवाय श्रीकृष्णांना राहवलें नाहीं, हा प्रसंग ज्ञानेश्वरानीं स्वप्रतिभेनें निर्माण केला आहे. **ओ. ४२०**—" असें म्हणून श्रीकृष्णांनीं अर्जुनाला आलिंगन दिलें, त्याच्याकडे कृपादृष्टीनें पाहिलें, व पुनः अर्जुनाशीं बोलण्यास त्यानीं प्रारंभ केला." **माघौते**-पुनः मध्यंतरीं या आलिंगनानें बोलण्यांत खंड पडला होता. तें बोलणें पुनः सुरू केलें. **बोलों आदरिलें**-बोलण्याचा स्वीकार

केला, बोलण्यास प्रारंभ केला. आपलें अर्जुनाशीं असणारें ऐक्य श्रीकृष्ण पुढील ओवींत व्यक्त करतात. **ओ. ४२१**-" ज्याप्रमाणें दोनीं ओठांतून एकच बोलणें निघतें, किंवा दोनी पायांनीं एकच चालणें होतें, त्याप्रमाणें तुझें प्रश्न विचारणें, व माझें त्याला उत्तर देणें, हें एकच होय." तुझ्या विचारण्याचा व माझ्या सांगण्याचा परिपाक एकाच विवेचनांत होणार आहे. दोहोंनींहीं विषयप्रतिपादनाचें एकच कार्य होणार आहे. दोन ओठ किंवा दोन पाय जसे परस्परांना आपापल्या क्रियांत उपकारक होतात, त्याप्रमाणें तुझा प्रश्न व माझें उत्तर, हे विषयविवेचनांत परस्परांना उपकारक आहेत. आपलें दोघांचें ऐक्य श्रीकृष्ण आणखी स्पष्ट करतात. **ओ. ४२२**- "याप्रमाणें मी व तूं एकच आहों असें समज. येथे उत्तर देणारा ( मी ) व प्रश्न करणारा ( तूं ) असे आपण दोघे एकच आहों." **एकार्थार्थे**--दोघांचा समान अर्थ आहे, दोघांचें ऐक्यच आहे असें समज. **सांघतें पूसतें**-सांगणारा, उत्तर देणारा व विचारणारा यांच्यांत भेद नाहींच म्हणून ज्ञानेश्वर पुढील ओवींत श्रीकृष्णाच्या मनोव्यापाराचें वर्णन करतात. **ओ. ४२३**-" याप्रमाणें प्रेमानें भुललेला श्रीकृष्ण, अर्जुनाला आलिंगन दिल्याच्या स्थितींत तसाच राहिला. मग आपणच भिऊन ( आपल्याशींच) म्हणाला, " अर्जुनाशीं इतकें प्रेम असणें बरें नव्हे ! " प्रेमानें वेडा झालेल्या श्रीकृष्णानें अर्जुनाला आलिंगन देऊन त्याच्याशीं ऐक्य केलें, व तो तशा ऐक्याच्य स्थितींतच थोडा वेळ राहिला. पण नंतर तो एकदम चमकला. मागें ओ. ४२० मध्यें, त्यानें अर्जुनाला एकदा आलिंगन दिलेच होतें, व आताही पुनः आलिंगन देऊन अर्जुनाशीं जर अद्वैत झालें, तर मग अशा दोघांच्या एक होण्यानें, अद्वैतानें, अर्जुनाच्या प्रेमाचा आनंद उपभोगायला उरणार तरी कोण ? अर्जुनाचें प्रेमसुख जर आपणास अनुभवावयाचें आहे, तर त्याच्याशीं असें अद्वैत होतां उपयोगीं नाहीं, म्हणून, श्रीकृष्णानीं एकदम चमकून जाऊन, हें अर्जुनाशीं इतकें झालेलें ऐक्य बरें नव्हें असें म्हणून, तें कमी केलें द्वैतानें, आपण व अर्जुन हे निराळे आहों अशा समजुतीनें, जसा परस्परांतील प्रेमसुखाचा आस्वाद घेतां येतो, तसा आपणादोघांच्या ऐक्यानें, अद्वैतानें तो घेणें अशक्य आहे असें वाटून श्रीकृष्ण अशा अद्वैत घडवून आणणाऱ्या आलिंगनाला भ्याले. **मोहे भूलला**—प्रेमानें वेडा झाला. **आलंगिला**—इ० आलिंगल्या ठिकाणीं

तसाच थोडा वेळ राहिला. **बिहाला**- भ्याला. दोघांतल्या खऱ्या प्रेमाची माधुरी चाखायची असल, तर तेथें द्वैताचा आश्रय केलाच पाहिजे, या सिद्धांताला दृष्टांत देतात. **ओ ४२४**—" उसाच्या रसाची ढेप झाली तरी त्यात क्षाररूपी हीण मिसळावाच लागतो. नाहींतर अद्वैतसुखाची मूळची गोडी नासून जाईल." गुळाच्या ढेपीचा गोडी वाढवावयाची झाल्यास, त्यांत जसा क्षाररूपी हीण मिसळावा लागतो, त्याप्रमाणें ऐक्याचा, अद्वैताचा खरा आनंद उपभोगायचा असेल, तर तेथे द्वैतरूपी हीण मिसळावाच पाहिजे. नाहींतर मूळची गोडीच नष्ट होईल. कारण सगळेच अद्वैत झालें, तर कोणी कोणाची गोडी चाखायची ? गुळांत जर क्षार मिसळला नाहीं, तर त्याच्या गोडींत लज्जत येणार नाहीं, त्याप्रमाणें द्वैतानें, भिन्नभावानेंच प्रेमाची खरी गोडी चाखतां येते. **डाल**—ढेप. **किडाल**-हिणकट (वि). **लवण**-क्षार. **रसाल**-गोडी. **थितें**-मूळची. ज्ञानेश्वरकालीं गूळ राधताना यात क्षार टाकण्याची पद्धति होती असें दिसतें. सारांश खरें ऐक्यसुख भोगायला द्वैताचा आश्रय घेणें भाग आहे. **ओ ४२५**— श्रीकृष्ण म्हणतात, " मूळचेच आम्हीं नरनारायण असल्यामुळें, माझ्यात व याच्यांत (अर्जुनात) वेगळेपणा नाहींच. पण आता माझ्याठिकाणीं आलेलं हें प्रेमाचं भरतं, माझ्या ठिकाणींच जिरून जाऊं दे." अर्जुन नर तर मी नारायण असल्यामुळें, आम्हीं दोघांचें ऐक्य सिद्धच आहे. आतां आणखी आलिंगन देऊन कांहीं आमचे ऐक्य सिद्ध करण्याचें कारण नाहीं. पण कांहीं असलें, तरी अर्जुनाला आलिंगन देण्याची माझ्या मनानें जी उचल खाल्ली आहे, ती आतां जागच्याजागींच जिरविली, दाबली, पाहिजे. **वेग**—आलिंगन देऊन एकरूप होण्याचा माझा आवेग. **सीनें**-वगळें. **ओ.४२६**-' अशा बुद्धीनें श्रीकृष्ण अर्जुनाला म्हणाले, " हे वीरश्रेष्ठा! तुझा तो प्रश्न तरी काय आहे ?" आतापर्यंत आलिंगन देण्याच्या भरात अर्जुनानें ओ. ४१० मध्यें विचारलेला प्रश्न, श्रीकृष्ण विसरूनच गेले होते. आतां त्याना त्याची आठवण होऊन, अर्जुनाला ते पुनः त्याबद्दल विचारित आहेत. श्रीकृष्णार्जुनांच्या प्रश्नाचा, मध्यंतरी त्यांच्या आलिंगनाचा व त्या प्रश्नाच्या त्यामुळें घडलेल्या विस्मरणाचा असें सर्वच प्रसंग येथे ज्ञानेश्वरांनीं मोठ्या जिव्हाळ्यानें, चित्रिले आहेत. अर्जुनासारख्या ज्ञानी भक्तांचे व भगवंताचे परस्पर संबंध वर्णन करतांना,

ज्ञानेश्वरांनीं कदाचित भगवंतावरील आपली भक्ति अर्जुनाच्या रूपानेंच व्यक्त करण्याची संधि येथे साधून घेतली असावी. **ओ. ४२७**– पण अर्जुनाची देखील तीच अवस्था झाली होती. " इकडे अर्जुन जो श्रीकृष्णांत अगदीं रममाण झाला होता तो पुनः आपल्या भानावर येऊन आपल्या प्रश्नमालिकेचें उत्तर ऐकण्यास तयार झाला. " श्रीकृष्णाच्या ध्यानांत गढून गेल्यामुळें, अर्जुनाला देखील आपल्या प्रश्नांचें विस्मरणच झालें होतें. श्रीकृष्णांनी स्मरण करून देतांच तोहीं त्यांचीं उत्तरें ऐकण्यास आतुर झाला. **विरत**— रममाण झालेला. **परतौनि माधौता**— पुनरपि भानावर येऊन. **आइकों धांवला**– आपल्या प्रश्नांचीं उत्तरें ऐकण्यास, किंवा आपण विचारलेल्या प्रश्नांचं झालं तरी काय हें ऐकण्यास आतुर झाला.

**ओ. ४२८** -" तेंव्हा सद्गदित वाणीनें अर्जुन म्हणाला," महाराज ! आपलें उपाधिरहित असें स्वरूप सांगा. " **निरुपाधिक**– उपाधिरहित, शुद्ध. **ओ. ४२९** - अर्जुनाच्या या बोलण्यावर ते शार्ङ्गधर श्रीकृष्ण, त्याचेंच विवेचन करण्यासाठीं उपाधींच्या दोन प्रकारांचे वर्णन करतात. **शार्ङ्गी**—शृंग धारण करणारा श्रीकृष्ण. **तेंचि इ**. अर्जुनानें विचारलेलें शुद्ध स्वरूप सांगण्याच्या दृष्टीनें. **दोहिं भागीं**– दोन प्रकारांनीं यावर कोणाला जी शंका येण्याचा संभव आहे, तिचा उल्लेख करतात. **ओ. ४३०** --" आपलें उपाधिरहित स्वरूप सांगा असें विचारलें असतां, श्रीकृष्ण प्रथम उपाधींचेंच कां वर्णन करतात अशी शंका जर कोणाला येईल. " श्रीकृष्णाला अर्जुनानें आपल्या उपाधिरहित शुद्ध स्वरूपाचें विवरण विचारलें असतां, तें करण्याचें सोडून श्रीकृष्ण उलट उपाधींचेंच प्रथम वर्णन कां करूं इच्छितात, अशी शंका कोणी जर उपस्थित करील, तर त्याला पुढील ओवींपासून दृष्टांतांनीं उत्तर देतात. वाचकांच्या किंवा श्रोत्यांच्या अशा शंका अगोदरच अपेक्षून त्यांना श्रीकृष्णांच्या अधिकारवाणीनें उत्तर देण्याचें धोरण ज्ञानेश्वरांनीं प्रस्तुत अध्यायांत मागें दोन तीन ठिकाणीं स्वीकारलें आहे. **ओ. ४३१**— " तर ताकाचा भाग निराळा काढणें, म्हणजेच लोणी काढणें होय, किंवा चोख सोन्याची शुद्धि म्हणजे त्यांतील हिणकस तोडणें होय. " शुद्ध ताक पाहिजे असेल, तर त्यांतील

लोणी एकीकडे काढावें लागतें, किंवा शुद्ध सोनें अपेक्षायचें असेल, तर त्यांतील हिणकस भाग बाजूला काढावा लागतो. त्याप्रमाणें आपलें निरुपाधिक स्वरूप पहावयाचें असेल, तर त्यांतील 'उपाधि' निराळी काढली पाहिजे, म्हणजे परमेश्वराच्या स्वरूपाला अशुद्धता आणणाऱ्या उपाधींचेंच वर्णन प्रथम करणें अवश्य आहे. जग, संसार, अशा उपाधीपासून परब्रह्मस्वरूप निराळें काढलें पाहिजे. **चोखाचिये** – चोख सोन्याची **कीड**–हीण. आणखी दृष्टांत योजतात.

**ओ. ४३२**—" पाण्यावरचें शेवाळ हातानें एकीकडे सारल्यावर मूळचें स्वच्छ पाणी खालीं असतेंच. तसेंच ढग नाहींसे झाल्यावर आकाश मूळचें स्वच्छ असतेंच." त्याप्रमाणें भगवंताचें म्हणणें असें कीं, मूळच्या निर्मल व शुद्ध परब्रह्मावर जगाच्या उपाधीचें आलेलें आवरण एकीकडे सारलें, म्हणजे मूळचें शुद्ध परब्रह्म दिसण्यास अडचण पडत नाहीं. यासाठीं ही उपाधि दूर करून शुद्ध परब्रह्म पाहण्यासाठी उपाधीचा विचार अगोदर करणें भाग पडतें **बाबुलें**–शेवाळ. **आइतें**–मूळचें. तसेंच ढग नाहींसे झाल्यावर नेहमींच असणारें शुद्ध आकाश स्पष्ट दिसूं लागतें. **ओ. ४३३**—' धान्याच्या दाण्यावरील कोंड्याचें आच्छादन काढून टाकून तो त्यापासून वेगळा केलेला दाणा हातीं घेण्यास काय हरकत आहे ?' त्याप्रमाणें परब्रह्मावरील जगाची उपाधि बाजूला काढून टाकून शुद्ध परब्रह्मस्वरूप पाहायला काय हरकत आहे ? अशी ही उपाधि बाजूला काढण्यासाठींच तिचें विवेचन प्रथम करणं अवश्य आहे असा भाव. **गुंडाळा**–अच्छादन. **सांडुनु**-सांडून, एकीकडे काढून **कणु**--धान्याचा दाणा. **विरंगुळा**-हरकत, अडचण **ओ. ४३४**-" त्याप्रमाणें परब्रह्मावर आरोपित केलेल्या अशा उपाधीचा तसा विचार करतां, जेथे शेवट झाला आहे, तेंच परब्रह्माचें निरुपाधिक स्वरूप होय, हें कोणाला न विचारतां निश्चित समजावें." परब्रह्मावर आरोपित केलली जगाची उपाधि एकीकडे काढली कीं, राहील तें शुद्ध परब्रह्मच होय. हा सिद्धांत भगवंतांनीं वरील निरनिराळ्या दृष्टांतांनीं सिद्ध करून दाखविला आहे **विचारितां**–विचार करतां. **कोण्हाहि**—या बाबतींत खात्री करण्यासाठीं आणखी कोणाचें मत घेण्याचें कारण नाहीं. कारण हा सिद्धांत स्पष्टच आहे **ओ. ४३५**-" ज्याप्रमाणें

एखादी नवोढा स्त्री आपल्या पतीचें नांव न सांगण्यानेंच त्याचें नांव सांगत असते व अशारितीनें ज्या पतीच्या नावाची चर्चा करतां येत नाहीं, तेंच आपल्या स्तब्धपणानेंच ती स्पष्ट करते." येथे ज्ञानेश्वरांनीं शब्दातीत अशा परब्रह्माचें स्वरूप सांगतांना नित्याच्या कौटुंबिक जीवनांतील एक काव्यमय दृष्टांत घेतला आहे. नवीनच लग्न झालेली मुलगी आपल्या पतीचें नांव घेण्यास लाजते व असें पाहून तिच्या मैत्रिणी 'हें तुझ्या पतीचें नांव कां' असें म्हणून अनेक नांवें तिच्यापुढें म्हणतात. पण ती मुलगी बाकीच्या सर्व नांवांना 'हे नव्हे' असा नकार देऊन आपल्या पतीच्या नेमक्या नांवाच्या वेळीं मात्र मुखस्तंभ बनते. या तिच्या विशिष्ट नामोच्चाराच्या वेळच्या मूकतेमुळेंच तेंच नांव तिच्या पतीचें असलें पाहिजे, अशी खूणगांठ तिच्या मैत्रिणी बांधतात अशा या गप्प राहण्यानेंच जसें ती नवोढा मुलगी आपल्या पतीचें नांव नेमकें स्पष्ट करते, तद्वत् परब्रह्माच्या स्वरूपाचा प्रकार आहे. कारण परब्रह्माचें नांव पतिनामाप्रमाणेंच चर्चेच्या पलीकडचें असल्यामुळें, जगांतल्या प्रत्येक उपाधीचा उच्चार करून, ती परब्रह्माला लागत नाही, असा प्रत्येक वेळीं निरास केल्यानंतर शेवटीं हा निरास करण्याचा क्रम जेथे थांबतो, जेथें सर्व उपाधींची यादी संपून वक्त्याची वाणी कुंठित होते, तेंच परब्रह्माचें निरुपाधिक स्वरुप समजावयाचें आहे. "यतोवाचो निवर्तंत अप्राप्य मनसा सह" तेंच परब्रह्मस्वरुप होय. **न सांघणें वरि**— न सांगण्यानें. येथे 'वरि' हा तृतीयेचा प्रत्यय आहे. **रूप करी**-सांगते. **बोलु निमालेपणें**- मूकतेनें. **अचर्चातें** -ज्याची चर्चा, चिकित्सा करतां येत नाहीं अशा पतीच्या नांवास. **ओ. ४३६**—"दुसरें असें कीं, ज्याचें (परब्रह्माचें) वर्णन करतांच येत नाहीं, त्याचें वर्णन हें असेंच (वरच्याप्रमाणें) करावयाचें आहे. म्हणुनच लक्ष्मीपति श्रीकृष्णांनीं (निरुपाधिक परब्रह्माचें स्वरूप सांगतांना) प्रथम उपाधीचा उल्लेख केला." परब्रह्माचें स्वरूप स्पष्ट शब्दांत निश्चितपणें सांगतां येत नाहीं. मग तशा वर्णनाचा प्रयत्न करतांना 'तें असे आहे कां, तें तसें आहे कां' असेंच उपाधियुक्त प्रश्न विचारले जातात व त्यांना 'ते असें-नाहीं, ते तसे नाहीं,' अशींच शेवटीं उत्तरें मिळून, सर्व उपाधींचा शेवट झाल्यामुळें, संपल्यामुळें, उपाधिरहित परब्रह्मच मग बाकी राहते. म्हणून उपाधींची नामावळी जपल्याशिवाय परब्रह्मस्वरूपाच्या वर्णनाच्या

प्रयत्नास हात घालतांच येत नाहीं, परब्रह्माचें अगर आत्म्याचें स्वरूप कसें आहे असें विचारलें असतां, वेदांनींदेखील ' नेति नेतीत्यात्मा ' असेंच दिलेलें उत्तर प्रसिद्ध आहे. आणखी दृष्टांत देतात. **ओ. ४३७-** " शुध्द प्रतिपदेची चंद्राची कोर नेमकी दाखविण्यासाठीं, एकाद्या झाडाची फांदी दाखवावी लागते. त्याचप्रमाणें येथे ही उपाधीची भाषा ( वापरलेली ) आहे." शुद्ध प्रतिपदेला चंद्राची कोर अस्पष्ट असते. ती आकाशांत नेमकी कोठे आहे हें दाखविण्यासाठीं, एकाद्या झाडाच्या फांदीचा आधार घ्यावा लागतो. अमक्या फांदीस लागून चंद्र आहे, असें म्हणून निर्देश करण्याची चाल आहे. येथे चंद्र दाखविण्यास जसा फांदीचा आधार घ्यावा लागतो, तसाच परब्रह्माचें निरुपाधिक स्वरूप सांगण्यासाठीं उपाधीचा आश्रय करावा लागला आहे. येथे शाखा ही उपाधि व चंद्र ही उपहित वस्तु. अशा या प्रकारास ' शाखाचंद्रन्याय ' अशी वेदांतांतील परिभाषा आहे. **निरुता-** नेमकी. **औपाधिका बोली-**उपाधिसंबंधीची भाषा. यापुढें भगवान्, जें पुरुषोत्तमस्वरूप विशद करणार आहेत, तें करण्यापूर्वी त्याच्या उपाधि ज्या क्षर व अक्षर हे पुरुष, त्यांचें विवेचन त्यांना अगोदर कां करावें लागणार आहे, यासंबंधीचा प्रस्ताव आतापर्यंत केला. ' पुरुषोत्तमयोग ' हा या अध्यायाचा मुख्य विषय. पण तें शुध्द स्वरूप विशद करण्यापूर्वी, आपणास क्षर व अक्षर यांचा विचार कां करावा लागत आहे, याचें कारण वर आतापर्यंतच्या विवेचनांत भगवंतांनीं दिलें आहे. पुरुषोत्तमस्वरूप हें ज्यांच्यापासून अगदीं भिन्न आहे, पुरुषोत्तम ज्यांच्या अतीत आहे, त्या क्षर व अक्षर पुरुषांचें प्रथम स्वरूप सांगून या उपाधींपासून सर्वस्वी अलग असणाऱ्या पुरुषोत्तमाचें स्वरूप, भगवान् शेवटीं सांगणार आहेत. याच दृष्टीनें अर्जुनाचा मध्यंतरीचा निरुपाधिक स्वरूपकथनाचा प्रश्न लक्षांत घेऊन, श्रीकृष्ण पुढील १६ व्या श्लोकापासून क्षराक्षरविचार सुरू करीत आहेत.

( **श्लोक १६** ) — " या लोकांत ' क्षर ' आणि ' अक्षर ' हे दोन पुरुष आहेत. क्षर म्हणजे सर्व (नाशवंत) भूतें, व कूटस्थ म्हणजे या सर्व भूतांच्या मुळाशीं असणारें अव्यक्त असें प्रकृतितत्त्व, त्यालाच अक्षर असें म्हणतात." येथे क्षर व अक्षर यांना पुरुष म्हणण्यांत, सांख्यांचीच परिभाषा वापरली आहे. श्रीकृष्ण यानंतर ओ. ४३८ पासून अर्जुनाला उत्तर देण्याचा प्रारंभ करीत आहेत.

**ओ. ४३८**--मग श्रीकृष्ण म्हणतात. " हे सव्यसाची अर्जुना ! या संसाररूपी नगरींची वस्ती सगळी दोन पुरुषाची लहान आहे." या संसाररूपी गावांत दोनच माणसं राहत आहेत. **सवियां**-सगळी, सर्वथा. **टांची**-अल्प, लहान. **ओ. ४३९**-" ज्याप्रमाणें एवढ्या या आकाशांत दिवस व रात्र हीं दोनच नांदतात, त्याप्रमाणें या संसाररूपी राजधानींत हे दोघेच (दोन पुरुष) राहतात." येथेच पुढील ओंवीत पुरुषोत्तमाचा तिसऱ्या पुरुषाचा उल्लेख करून ठेवतात. वास्तविक मूळ श्लोकांत कांहीं तो अभिप्रेत नाहीं. **ओ. ४४०** -"आणखी एक तिसरा पुरुष आहे, पण त्याला या दोघांचे नांव देखलि सहन होत नाहीं. कारण जो आला कीं नगरासह त्या दोघांना खाऊन टाकतो, त्यांचा नाश करतो." पुरुषोत्तम हा जो तिसरा पुरुष, त्याचें ज्ञान झालें असतां, सर्व नामरूपात्मक मिथ्या भूतमात्राचा (एका पुरुषाचा) व प्रकृतीचा, मायेचा, अज्ञानाचा (दुसऱ्या पुरुषाचा) निरास होतो. एकमेव पुरुषोत्तमाचें अथवा परमात्म्याचें ज्ञान झालें असतां, अज्ञान व त्यानें उत्पन्न झालेला हा जगदाभास नष्ट होतो, असा भावार्थ. पुरुषोत्तमाच्या ज्ञानाचा उदय झाला असतां, संसार, सर्व प्राणिमात्र, व प्रकृति, (माया) सर्व लय पावतात. **तीजा**-तिसरा. **नांव न साहे**-या तिसऱ्या पुरुषाला, त्या दोघा पुरुषांचें नांव देखलि घेतलेलें खपत नाहीं. पुरुषोत्तम हा ज्ञानमय आहे, तर ते दोन पुरुष (भूतें व प्रकृति) अज्ञानमय आहेत. मग त्यांचें जमावें कसें ? ज्ञानानें अज्ञानाचा नाश होणारच. **गावेंसि**—संसारासह.

**ओ. ४४१**—" पण ती गोष्ट तूर्त राहूं दे. अगोदर जे दोन या संसाररूपी गांवांत राहण्यास आले आहेत, त्यांच्यासंबंधींचें काय तें ऐक." **परियसीं**—ऐक. संसाराच्या गांवांत हे जे दोघे पुरुष, क्षर आणि अक्षर राहण्यास आले आहेत, त्यांच्याबद्दलची गोष्ट ऐक. **ओ ४४२**—" त्यापैकीं एक आंधळा, वेडा व पांगळा असा असून, दुसरा सर्वांगपरिपूर्ण आहे. पण एकाच गांवामुळें (एकाच गांवांत राहिल्यामुळें) दोघांची संगत घडली." या दोन पुरुषांपैकीं एक जो क्षर, तोच जीव असून, त्यालाच गाढ सुषुप्तीमुळें किंवा अज्ञानामुळें, आपल्या मूळ स्वरूपाचा विसर पडतो, व असा विसर त्याला पडला कीं, जगाची उत्पत्ति होऊं लागते. म्हणून या अज्ञानदशेंतील जीवरूपी ला येथ आंधळा, वेडा व पांगळा, अतएव असहाय असें म्हटलें आहे.

दुसरा पुरुष जो अक्षर तीच मूल प्रकृति असून, प्रत्येक पदार्थाचा बीज-भावही तीच होय. ही अवस्था पदार्थांच्या उपाधींच्या नाशानंतर येत असल्यामुळें, व ही एकमेव, एकाजिनशी अशी अवस्था असल्यामुळें, या अवस्थारूपी हा अक्षर पुरुष, सर्वांगांनीं परिपूर्ण असें येथें म्हटलें आहे. कोणत्याही पदार्थांची परिणति अथवा पूर्णता झाल्यानंतर त्या पदार्थाचें जें बीजांत शिरणें, उदाहरणार्थ एकाद्या झाडाची फलांत परिणति होऊन, त्या फलांत पुनः बीजोत्पत्ति होते व या बीजात तें झाड अव्यक्तपणें प्रवेश करतें, असें हें प्रत्येक पदार्थाचें आपल्या बीजांत अव्यक्तपणें असणें, या स्थितीला व येथे अक्षर पुरुष असें नांव दिलें असून, या त्याच्या सर्वसाधारण व जोरदार स्वरूपाला, ' सर्वांगी परिपूर्ण अथवा धडधाकट असें म्हटलें आहे. शिवाय जीवाला अथवा आत्म्या-लाही पुढील उत्पत्तीसाठीं या प्रकृतीचीच अपेक्षा असल्यामुळें, जीवाच्या अपेक्षेनें तिला स्वतंत्र असें कल्पिलें आहे. सांख्यांच्या प्रक्रियेप्रमाणें पुरुषाशीं प्रकृतीचा संयोग घडला कीं, जगदुत्पत्ति होते. पुरुष हा उदासीन असून प्रकृतीच सर्व त्याच्या कडून हा जगाचा खेळ खेळविते. सांख्यांचा हा पुरुष म्हणजेच वेदांत्यांचा ' जीव ' असून, त्यांची ' प्रकृति ' म्हणजेच वेदांत्याची ' माया ' होय. जीवाची व प्रकृतीची गांठ पडली कीं संसार सुरू होतो, म्हणून या संसाररूपी गांवांत या क्षर पुरुषाचा ( जीव, जगत् ) व अक्षर पुरुषाचा ( प्रकृति ) संग घडतो, असें या ओवींत सांगितलें आहे. या अध्यायाच्या प्रारंभीं संसारवृक्षाचें जें वर्णन कर-ण्यांत आलें आहे, त्यांत परब्रह्माला या वृक्षाचें मूळ कल्पिल असून, त्याला मायेचें आळें पडलें कीं, हा वृक्ष वाढतो असें जें सांगितलें आहे, त्याचें रहस्य हेंच कीं, पर-ब्रह्मावर अथवा पुरुषावर मायेचें अथवा प्रकृतीचें आवरण पडलें कीं, जगदुत्पति होते हें समजावें. प्रकृति ही अज्ञानमय असल्यामुळें, जीवावर अथवा पुरुषावर तिचा अंमल बसून या मिथ्या जगाचा विस्तार वाढतो, हेंच पुढील ओंवीत स्पष्ट शद्बांत सांगितलें आहे. **ओ. ४४२**–" त्या पैकीं एकाला क्षर व दुसऱ्याला अक्षर असें म्हणण्यांत येत असून, या दोघांनीच हा संसार व्यापला आहे." **कोंदणें**--भरगच्च भरणें. जीव जगत्, व प्रकृति यांच्या संयोगानेंच हा जो स्थावरजंगम पदा-र्थांचा उत्पत्ति, स्थिती व लय असा सारखा क्रम चालू आहे, त्यालाच संसार असें नांव असून, हा संसार, पुरुष ( जीव ) व प्रकृति (माया) यांच्या

संसर्गानेंच घडून येतो. या संसाराचे हेच दोन प्रधान घटक आहेत. येथे जीव, जगत्=क्षर पुरुष व प्रकृति=अक्षर पुरुष, अशी परिभाषा मांडली आहे. **ओ. ४४४**—' आतां ' क्षर ' तो कोण, व ' अक्षरा ' चें लक्षण काय, याचा सविस्तर अर्थ मी तुला सांगतों. " येथून ओ. ४४५—४६७ पर्यंतच्या तेवसि ओव्यांत ' क्षर ' कशाला म्हणतात तें सांगतात.

**ओ. ४४५**— "तर हे धनुर्धरा अर्जुना ! महत् व अहंकार यांच्यापासून गवताच्या काडीपर्यंत, जें कांहीं लहान व थार, हलणारें व स्थिर, फार काय मन व बुद्धि यांना समजणारें जें जें कांही असेल." सांख्यांच्या प्रक्रियेप्रमाणें, मूळ प्रकृतीपासूनच महत् अथवा बुद्धि, तिच्यापासून अहंकार ( अभिमान ) व त्याच्या पासुनच पुढें एकीकडे सात्विकगुणामुळें पांच बुद्धींद्रियें, पांच कर्मेंद्रियें व मन अशी सेंद्रियसृष्टि व दुसरीकडे तामसगुणामुळें पंचतन्मात्रें (शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध) व त्यापासून पुढें पंच महाभूतें (पृथ्वि, आप, तेज, वायु व आकाश) अशी निरींद्रिय सृष्टि कशी उत्पन्न होते, तें मागें आपण पाहिलेंच. पुन: या संसारवृक्षाला रजोगुणाच्या वाऱ्यानें ज्या मनुष्यशाखा फुटतात, त्यांनाच पुढें सत्वगुणाच्या प्रकर्षानें ब्रह्म-लोक, शिवलोक अशी फळें येतात, तर तमोगुणाच्या वाऱ्यानें पशुपक्ष्यांच्या जीव-जिवाणूंच्या व तृणाच्या ही हलक्या फांद्या कशा फुटतात, याचें वर्णनही यापूर्वी ओ. १६१-१६९ व १९०, २०० या ओंव्यांत येऊन गेलेंच आहे. मनुष्याला त्याच्या सात्विक तपश्चर्येनें ब्रह्मलोक हें अंतिम फल मिळवितां येतें, तर तामसाचरणानें किंवा कुकर्मानें त्याला गवताचाही हलका जन्म मिळतो. म्हणून येथे महदापासून तों खालीं तृणापर्यंत, असा या ओवींत मागील विवेचनाला धरूनच उल्लेख केला आहे. महदापासून तृणापर्यंत गुणानुसार प्रकृतीचा जो सर्व शाखाविस्तार, सर्व स्थावरजंगम, लहान थोर, अशा मनाला व बुद्धीला आकलन होण्यासारख्या सर्व वस्तु, या 'अक्षर' संज्ञेत येतात. हेंच पुढील ओवींत अधिक विस्तारानें सांगितलें आहे. **लागौनि**—पासून. **पांगोरा**— काडी. **वेन्हि**—पर्यंत. **ओ. ४४७**- " जेवढें म्हणून पंचभूतापासून झालेलं, नांव व रूप मिळालेलं व गुणत्रयांच्या टांकसाळींतून बाहेर पडलेलें आहे ( तें सर्व ' अक्षर ' या संज्ञेत येतें ) अहं-कारापासून जी तामस म्हणजे निरींद्रिय सृष्टि निर्माण होते, तीच ही पंचभूतात्मक सृष्टि होय. अशी पंचभूतात्मक निर्जीव सृष्टि, नामरूपात्मक जग, ज्याला ज्याला

म्हणून नांव व आकार प्राप्त झाला आहे अशा सर्व वस्तु, या सर्व त्रिगुणाच्या टांकसाळींतूनच बाहेर पडलेल्या असतात. कारण रजोगुणापासून मनुष्यशाखा, तमोगुणापासून जडपदार्थांच्या शाखा, व सत्वगुणापासून देव, गंधर्व, इंद्र, ब्रह्मा व शिव यांच्या शाखा निघतात, असा हा त्रिगुणांचा प्रभाव आहे. सत्व रज, व तम या गुणानुरूपच जीवाला कमी अधिक योग्यतेचे जन्म प्राप्त होतात, म्हणून या त्रिगुणांना टांकसाळ असें संबोधिलें आहे. **कामठां पडणें**-टांकसाळींतून बाहेर पडणें. या टांकसाळींतून नाणें कसें बाहेर पडतें तें सांगतात. **ओ. ४४८**--या ओवींत भूतांवर नाण्याचें रूपक केलें आहे. " ज्या सोन्यानें भूताकृतीचें नाणें तयार होतें, व ज्या कवड्यांनीं काळाशीं जुगार खेळतां येतो." **भांगारें**—सोन्यानें. पूर्वीं सोन्याचीं नाणीं पाडत असत. भूताकृतीचें नाणें ज्या सोन्याचें झालें आहे, म्हणजे प्राणिमात्र ज्या पांचभौतिक पदार्थांचें झाले आहेत, ते पांचभौतिक पदार्थ, व ज्या प्राणिमात्ररूपी कवड्यांनीं काळाशीं जुगार खेळला जातो, जे पांचभौतिक प्राणिमात्र जीवनांत काळालाही टक्कर देतात. येथे कवड्यांनीं जुगार खेळण्याचें रूपक योजलें आहे. या सर्व प्राणिमात्रांची 'अक्षर' पुरुषांतच गणना होते **'जुं**-जुगार. प्राणिमात्रांचें जीवन हें काळाशीं, मृत्यूशीं जुगार खेळण्यासारखेंच आहे. ज्ञानेश्वरकालीं सोन्याचीं नाणीं पाडण्याच्या टांकसाळीं व कवड्यांनां सोंगट्याच्या पटावर जुगार खेळण्याची पद्धति रूढ होती, असें या रूपकावरून दिसून येतें.

**ओ. ४४९**— " विपरीत ज्ञानानें जें कांहीं जाणलं जाते, व जें प्रतिक्षणीं उत्पन्न होऊन लयाला जातं." ( तें सर्व क्षर पुरुषच होय. ) जग हें विपरीत ज्ञानानेंच खरं भासतं, व जगांतील प्रत्येक वस्तु इतकी क्षणिक आहे कीं, ती केव्हां उत्पन्न झाली व केव्हां नष्ट झाली हेंच समजत नाहीं. म्हणून मिथ्याज्ञानानें खरं वाटणारं जग व त्यांतील प्रत्येक क्षणभंगुर वस्तु, क्षर पुरुषांतच येते. **निमतें**-लयाला जाते. **ओ. ४५०**- या ओवींत जगाचा स्पष्टच उल्लेख केला आहे. " अरे! भ्रांतिरूपी अरण्य निर्माण करून जिथं सृष्टीचा एक भाग पुढें उभा केला जातो, फार काय! ज्याला जग असें नांव आहे." परब्रह्मावर मायेच्या किंवा आभासाच्या उपाधीनें निर्माण होणारा सृष्टीचा जो एक भाग, त्यालाच जग असें म्हणतात. जग हें भ्रांतिपासून अज्ञानापासून उत्पन्न झालेलें असून, अखिल सृष्टीचा

तो एक भाग आहे. ' ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या ' या ज्ञानानं भ्रांतिरूप जगाचा नाश होतो, म्हणून त्याला ' क्षर पुरुषांतच ' सामील केलें आहे. पुढील ओवींत अष्टधा प्रकृतीचें बनलेलें शरीर अथवा क्षेत्र, हें देखील क्षर पुरुषांतच येतें हें सांगतात. **ओ. ४५१**-" जें प्रकृति म्हणून आठ प्रकारांत विभक्त झालेलें सांगितलें, व क्षेत्र म्हणुन ज्याच्या छत्तिस भागांचें विवेचन केलें (तें शरीर अक्षर पुरुषच होय.)" मूळ प्रकृति ही महत्, अहंकार, मन व पांच भूतांची बनली आहे. मागें गीतेच्या सातव्या अध्यायांत, " भूमिरापोऽनलो वायुः खं मनो बुद्धिरेवच। अहंकार इतीयं मे भिन्ना प्रकृतिरष्टधा ॥ ४ ॥" असें अष्टधा प्रकृतीचें वर्नन दिलें असून, पुन: तेराव्या अध्यायांतील, " महाभूतान्यहंकारो बुद्धिरव्यक्तमेवच । इंद्रियाणि दशैकंच पंच चेंद्रिद्रगोचराः ॥ ५ ॥ इच्छा, द्वेष, सुखं दुखं संघातश्चेतना धृतिः । एतत्क्षेत्रं समासेन सविकारमुदाहृतम् ॥ ६ ॥ " या श्लोकांत ५ महाभूतें १ अहंकार, १ बुद्धि, १ अव्यक्त ( प्रकृति ), ५ ज्ञानेंद्रियें, ५ कर्मेंद्रियें, १ मन १० इंद्रियांचें विषय, १ इच्छा, १ सुख, १ द्वेष, १ दुःख, १ चेतना, १ धृति, १ संघात. अशा एकुण ३६ पदार्थाचें ' क्षेत्र ' वर्णन केलें आहे. प्रकृति ही गीतेंत अष्टविध मानली आहे, व ज्ञानेश्वरांनींही ती ७ व्या व पंधराव्या अध्यायांत अष्टधा मानली आहे. पण सृष्टीच्या उत्पत्तीचा क्रम सांगतांना, पंधराव्या अध्यायांत पंचकर्मेंद्रियाव्यातिरिक्त सांख्यांचीं १९ तत्त्वें घेतलीं आहेत, तर तेराव्या अध्यायांत, क्षेत्राचें वर्णन करतांना सांख्यांचीं २४ तत्त्वें, कर्मेंद्रियांचें ५ विषय व ७ विकार असा ३६ तत्त्वांचा मानव देह कल्पिला आहे. पुनः याच ३६ तत्त्वांचा क्षेत्रांत समावेश होतो, असें प्रस्तुत ओवींत पुन: सांगितलें आहे. सारांश अष्टधा प्रकृति व क्षेत्र, ( शरीर ) हीं क्षर ( नाशवंत ) पुरुषच होत. **सतिसें**—छत्तिस.

**ओ. ४५२**— " या मागील गोष्टीं किति म्हणून सांगाव्या ? अरे ! आतांच या अध्यायांत वृक्षाच्या रूपकानें जें तुला सांगितलें. " मागें ७ व्या व तेराव्यां अध्यायांत, जो प्रकृतीचा व क्षेत्रक्षेत्रज्ञांचा विचार सांगितला, तो पुनः किती वेळां सांगायचा ? शिवाय प्रस्तुत अध्यायांत देखील प्रकृतीवर अश्वत्थ वृक्षाचें रूपक करून तेथें सांख्यांच्या २४ तत्त्वांचा उल्लेख करण्यांत आलाच आहे. ( पहा ओ. ९३—१०३ ). हें आठ तत्वांचें किंवा ३६ तत्त्वांचें

शरीर, क्षरपुरुषांत येतें म्हणून येथें सांगितलें. आता यांत असणारें चैतन्यही त्यांत येतें हें सांगतात. **ओ. ४५३**— " ती अष्टधा प्रकृति व ३६ तत्त्वांची साकार क्षेत्रें ( शरीरें ), आपणास राहण्यास योग्य अशी नगरेंच आहेत, असें मानून चैतन्यच त्या शरीरानुसार बनलें आहे. " वर सांगितलेल्या तत्त्वांची बनलेली प्रकृति व क्षेत्र हीं सर्व आपलीं नगरेंच आहेत असें मानून अज्ञानानें, चैतन्य ( आत्मा ) त्या व्यक्त शरीरांच्या अनुरोधानें वागूं लागतें. तें शरीर आपणच आहों असें त्याला वाटूं लागतें. तात्पर्य शरीर म्हणजेच आपण असे वाटणारा अज्ञानदशेंतला आत्मा, म्हणजे क्षर पुरुषाचें आणखी एक स्वरूप होय, असें स्पष्ट करण्याचा येथे आशय आहे. **आपणपेयां पूरें**— आपणास राहण्यास नगरेंच जणु. यालाच दृष्टांत देतात. **ओ. ४५४**—" ज्याप्रमाणें सिंह विहिरींत पाहतो, व तेथे पडलेलें आपलें प्रतिबिंब पाहून संतापतो व संतापून मोठ्या आवेशानें तेथे उडी घालतो. " सिंहाला विहिरींत पडलेलें आपलें प्रतिबिंब पाहून, दुसराच सिंह तेथे असल्याचें भासतें, त्यावर चाल करण्याच्या उद्देशानें मोठ्या आवेशानें तो विहिरींत उडी घेतो. वास्तविक तेथें दुसरा सिंह नसून तें त्याचेंच प्रतिबिंब असतें. अज्ञानानें अथवा भ्रांतीनें त्याला दुसऱ्या सिंहाचे अस्तित्व भासतें. चैतन्याला किंवा आत्म्याला देखील असेंच ते व्यक्त शरीर खरें भासतें, व आपणास राहण्यास तें नगराप्रमाणें योग्य आहे, असें कल्पून तो तेथे राहतो. शरीर खरें आहे असें मानून त्याच्या अनुरोधानें आत्म्यानें वागणें, हें त्याचें अज्ञान किंवा आभास होय. सिंहानें आपल्या प्रतिबिंबाच्या ठिकाणीं दुसरा सिंह कल्पिणें हें जसें अज्ञानमूलक, तसेंच चैतन्यानें ( आत्मानें ) प्रकृति किंवा साकार शरीर खरें मानणें हें अज्ञानमूलक होय. हाच सिंहाचा दृष्टांत ज्ञानेश्वरांनीं मागें ९ व्या अध्यायांत, मूर्ख लोक परमात्म्यानेंच मानव शरीराचा आश्रय केला आहे, असें मानतात " अशा संदर्भात दिला आहे. पहा- " अथवा निधान हें प्रकटलें । ह्मणौनि खदिरांगार खोले भरिले । कां साउली न पांता घातलें । कुहां सिंहें " ॥ १४८ ॥. **कुहां**-विहिरींत. **खोभें**- क्षोभे, संतापे. **समारंभें**- आवेशानें, गर्वानें. **घलीं**— घालून घेतो. **ओ. ४५५**— " किंवा मूळ पाण्यांतच असणाऱ्या आकाशाचेंच पुनः पाण्यांत जसें प्रतिबिंब

दिसतें, तसें मूळचें अद्वैत असणारें चैतन्य जगाच्या रूपानें अनेकत्व धारण करतें. " पृथ्वी, आप, तेज, वायु व आकाश, या पंचमहाभूतां पैकीं प्रत्येकांत इतरांचा थोडा अंश आहे, या पंचीकरणाच्या तत्त्वास अनुसरून पाण्यांत आकाशाचा अंश आहेच. अशा रितीनें मूळ पाण्यांत असणारें आकाश जेव्हां तळ्यातल्या किंवा समुद्राच्या पाण्यांत प्रतिबिंबित होतें, तेव्हां मूळ पाण्याशीं अद्वैतत्वानें असणारें आकाश, पुनः द्वैतत्वानें भासतें. तसेंच येथे प्रकृतिचें मूळ असणारें चैतन्य किंवा परब्रह्म, हें आपणापासूनच अज्ञानानें निर्माण झालेल्या प्रकृति अथवा क्षेत्ररूपी व्यक्त शरीरांना खरीं कल्पून, तदनुसार वाग लागलें कीं, त्याच्या मूळच्या एकत्वाला अनेकत्व आल्याशिवाय राहत नाहीं. मायेच्या उपाधीनें एकमेव चैतन्य जगदाकार होतांना तें बहुधा होतें, अनेकत्व पावतें **सलिलि असतचि असे**—पाण्यांत आकाश अंश रूपानें असतेंच होतांने अद्वैत असून देखील. **द्वैते घेपे**- द्वैताकडून घेरलें जातें. **ओ. ४५६**— " या प्रमाणें हे अर्जुना ! साकार शरीर हें आपली राहण्याची नगरीच कल्पून, आत्म तथे विस्मृतीची झोंप घेतो. " आत्म्याला ( चैतन्याला ) आपल्या मूळ अद्वैत स्वरूपाची विस्मृति झाली व व्यक्त सृष्टि ही आपल्या राहण्याची शहरंच आहे असें तो मानूं लागला कीं, मग जगदुत्पत्ति होते. आत्म्याला स्वस्वरूपाचा विस पडणं हें संसाराचें मूळ आहे याबद्दल उल्लेख, मागें ओ. ७८ व ८६ मध्यें येऊन गेलाच आहे. **विस्मृतिची नीद**- स्वस्वरूपाचें, स्वतःच्या एकत्वाचें, विस्म रण हीच झोंप. येथे 'पुरुष' याची व्युत्पत्ति देण्याचा प्रयत्न केला आहे. 'पुरि शेते इति पुरुषः' अशी पुरुषाची व्युत्पत्ति आहे. येथे आत्मा हा साकार जगाल पुर समजून त्यांत विस्मरणाची झोंप घेतो, त्याअर्थी तोही पुरुष झाला असें सूचित केलें आहे. स्वतःचें विस्मरण पडलेला आत्मा क्षर पुरुषच होय. पण आत्म्याचं हें निजणें स्वप्नांतल्या अंथरुणावर म्हणजे आभासात्मक आहे, हें पुढील ओवींत स्पष्ट करतात. **ओ. ४५७**- " मग स्वप्नांत एकाद्यानें शय्यागृह पहावें व त्यानें तेथे निजावें, त्याप्रमाणें आत्म्याला त्या ( जगरूपी अथवा शरीररूपी नगरांत शयन घडतें. " आत्म्याचें, चैतन्याचें हें व्यक्त शरीरांत राहणें, स्वप्नांत तथे राहण्याप्रमाणें आभासात्मक आहे. त्याला आपल्या खऱ्या स्वरूपाचा विसर पडल्याच्या स्थितींतला हा प्रकार आहे, म्हणून तो खरा नव्हे. त्याल

आपल्या एकत्वाची व जगांतील व्यक्त पदार्थांच्या मिथ्यात्वाची जाणीव झाली कीं, त्यानें या अनेक नगरांत केलेल्या शयनाचा शेवट होऊन, या नामरूपात्मक दृश्य जगताचाही शेवट होतो. **सेजारु**- शय्यागृह. आत्म्याची स्वविस्मरणाची अवस्था पुढील ओवींत वर्णन केली आहे **ओ ४५८**— " मग त्या निद्रेच्या भरांत मी सुखी मी दुःखी असें म्हणत तो घोरत पडतो, व 'मी, माझें' यांच्या चिंतेनें मोठ्यानें झोपेंत बरळूं लागतो. " आत्म्याला आपल्या केवल व एकमेव स्थितीचें विस्मरण पडून तो ज्यावेळीं जगांतलि प्रत्येक दृश्य पदार्थ खरा मानून त्यांत आपलेपणानें राहूं लागतो, त्यावेळीं जगांतलि प्रत्येक वस्तूबद्दल त्याला ममत्व, स्वार्थ उत्पन्न होतो, व मग आमकी वस्तु मिळाली म्हणजे सुख, व अमकी मिळाली नाहीं म्हणजे दुःख, अशा अवस्था त्याला भोगाव्या लागतात. याप्रमाणें आपण पाहतो तें सर्व खरेंच व आपल्या भोवतींच्या वस्तु आपल्या सुखदुःखा- कारितांच आहेत, अशा गाढ अज्ञानांत तो असतांनाच, त्याच्या ठिकाणीं मीपणाची, आपण कोणीतरी असल्याची, व 'हें माझें' अशा ममत्वाची जाणीव उत्पन्न होऊन तो ती व्यक्त करूं लागतो. हे त्याचें म्हणणें वास्तविक झोपेंत बरळल्याप्रमाणें असतें, कारण आत्मा हा अज्ञानदशेंत, स्वतःच्या विस्मृतींत असतांना ही ममत्वाची खोटी जाणीव त्याला झालेला असते. आपल्या खऱ्या एकमेव स्थितीचा त्याच्या ठिकाणीं उदय होतांच अथवा आत्मज्ञान प्रगट होतांच, ही त्याची ममत्वाची जाणीव अथवा सुखदुःखाची कल्पना, त्याच्या विस्मृतिरूप अज्ञानाबरोबरच नष्ट होणार आहे. **अहंममाचिचेन**--मी, माझें या चिंतेनें. **असणाए**--झोपेंत बरळतो. **सादु**- शब्द. ' अहं, ' ' मम ' असे शब्द. आत्म्याला ' ममत्व ' उत्पन्न झालें कीं, तो ' हा माझा ' हें माझें ' असा स्वार्थ कसा दाखवितो, तें सांगतात. **ओ. ४५९**- " हा माझा बाप, ही आई, मी गोरा, मी कमी, मी संपन्न, व हा पुत्र ही पत्नी माझीच ना ?" ( असें तो बरळूं लागतो. ) आत्म्याला स्वस्वरूपाचा विसर पडला असतां, जगांतले आप्तसंबंध, काळा, गोरा हीं स्वरूपें व गरीब श्रीमंत या अवस्था वास्तविक मिथ्या, क्षणभंगुर व विनाशी असतांना, त्या त्याला खऱ्या वाटून तो तेथें ममत्व दाखवूं लागतो. जगांतले हे सर्व 'माझें तुझें ' चे प्रकार अज्ञानाचे आहेत, याचें त्या आत्म्याला विस्मरण पडतें. **पुरता**- संपन्न. खरें ज्ञान तर निराळेंच आहे. तें " का तव कांता कस्ते पुत्रः

संसारोऽयमतीव विचित्रः । कस्त्वं भो वा कुत आयातस्तत्वं चिंतय तदिदं भ्रातः ''—चर्पटपंजरी–श्रीशंकराचार्य, या श्लोकांत सांगितल्याप्रमाणें सर्व संसार मिथ्या असें मानणारेंच आहे. पण आत्मा ज्यावेळीं अज्ञानदशेंत असतो, त्यावेळीं त्याच्या ठिकाणीं नामरूपात्मक जग वगैरेची आपाके दिसून येते. या अज्ञामांत असतांना त्याची मजल आणखी कोठपर्यंत जाते ते सांगतात. ओ. ४६०— ' याप्रमाणें स्वप्नाला मिठी मारल्यामुळें, संसाराच्या स्वर्गाच्या रानांत जो सैरावैरा धांवतो, त्या चैतन्याचें हें अर्जुना! नांव क्षर पुरुष हें आहे." आत्मा अज्ञान दशेंत असतांना अथवा आपल्या स्वरूपाचें त्याला विस्मरण झालें असतांना, तो या संसारांत अधिकच गुरफटून जातो, मरणोत्तरही आपणास स्वर्गासारखे सुखोपभोगाचे लोक मिळावे म्हणून अनेक यज्ञांचेही तो खटाटोप करूं लागतो. पण हा इहलोकींचा संसार जसा मिथ्या आहे, तसाच शंभर यज्ञानीं मिळणारा पारलौकिक स्वर्गही मोक्षसुखाच्या अपेक्षेनें क्षणिक व अस्थिर आहे, हें त्याला अज्ञानामुळें कळत नाहीं. अनेक यज्ञांच्या पुण्यानें स्वर्ग मिळतो हें खरें. पण तें पुण्य क्षीण होतांच पुनः त्या प्राण्यांना मृत्युलोकांतच पडावें लागतें ( क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशंति ) या न्यायानें, स्वर्गसुख देखील मिथ्या व नाशवंत असेंच आहे. आत्मा आपल्या अज्ञानदशेंतच अशा ऐहिक अथवा पारलौकिक सुखाच्या पाठीमागें लागतो, व म्हणुनच अशा अज्ञानदशेंतल्या आत्म्याला ' क्षर पुरुष ' असें नांव ठेवलें आहे. **वैयानें स्वप्ना**–स्वप्नाकडून, अज्ञानाकडून मिठी मारल्यानें, अज्ञानानें पछाडल्यामुळें. **भवस्वर्गाचिया राना**— संसार व स्वर्ग यांच्या रानांत धांवतो. मनुष्य आतुरतेनें शिकारीच्या पाठीमागें जसा जंगलांत इतस्ततः धावतो, तसा हा अज्ञानी आत्मा, संसारसुख व स्वर्गसुख यांच्यासाठीं धावपळ करतो यानंतर ४६१–४६७. ओव्यांत, ' क्षरा ' ला आणखी कोणतीं नांवें आहेत, तीं सांगतात.

**ओ. ४६१**—" आतां ' क्षेत्रज्ञ ' या नावांनें ज्या दशेला संबोधितात तिलाच जगांत ' जीव ' असें म्हणतात. " क्षेत्रज्ञ, जीव, पुरुष आत्मा, ही एकाच वस्तूचीं नांवें आहेत. **ओ. ४६२**—' आणि आपल्या स्वरूपाच्या विस्मृतीनें जो सर्व भूतांत संचार करतो, त्या आत्म्यालाहीं ' क्षर पुरुष ' या नांवानेंच संबोधतात परमात्म्याला स्वतःच्या एकत्वाची विस्मृति

पडून तो ज्यावेळीं प्रतिबिंबरूपानें आत्मा म्हणून प्रत्येक वस्तूंत राहूं लागतो, त्यावेळींच नामरूपात्मक जगाचा उदय होतो. अशा प्रत्येक वस्तूंत संचार करणाऱ्या व अज्ञानांत गुरफटलेल्या आत्म्याला ' क्षर ' पुरुष असें म्हणतात. आत्मा हा वास्तविक अक्षर, अविनाशी आहे. पण तात्पुरत्या अज्ञानानें तो विनाशी जगाचा आश्रय करतो, म्हणून त्या नाशवंत वस्तूंच्या संसर्गानें त्यालाही क्षर म्हणण्याची पाळी येते. **ओ. ४६३—** येथेही पुनः ' पुरुष ' या शब्दाची व्युत्पत्ति देण्याचा आणखी प्रयत्न केला आहे. " जो सर्व वस्तूंमध्यें भरून राहिलेला असतो, म्हणून त्याच्यावर पुरुषतेचा आरोप आला आहे शिवाय देहरूपीं नगरांत तो निजतो, म्हणूनही त्याला ' पुरुष ' हें नांव प्राप्त झालें आहे. " येथे पुरुष या शब्दावर थोडी कोटी केली आहे. **वस्तुस्थिती पुरता**—जो सर्व वस्तूंना पुरून उरला आहे. सर्वांना व्यापून राहिला आहे, म्हणून त्याला ' पुरुष म्हणतात. शिवाय स्वतःच्या विस्मरणानें जो शरीररूपीं नगरात निजतो, ( पुरि शेते ) म्हणूनही यौगिक अर्थानें त्याला पुरुष म्हणतात. जो आत्मा सर्व वस्तू पुरता आहे, प्रत्येक स्थावरजंगम वस्तूंत व्यापलेला आहे, व जो प्रत्येक प्राणिमात्राच्या शरीरात वास करतो. आत्म्याला आपल्या खऱ्या स्थितीच विस्मरण थोडा वेळ झाल्यामुळेच, तो प्रत्येकाच्या शरीरांत अशी झोंप घेतो. त्याचें हें प्राणिमात्राच्या शरीरात राहणें आभासात्मक आहे, याचें विवेचन अनेक वेळां वर आलेंच आहे. **ओ. ४६४**- " आणि क्षरपणाचा हा याप्रमाणें नसता जो आळ त्याच्यावर आला, तो त्या उपाधीने तो युक्त झाला म्हणून. " खरं पाहिलं तर आत्मा कांहीं क्षर किंवा नाशवंत नाहीं पण तो क्षर आहे, असा जो खोटा प्रवाद त्याच्यावर आला, तो या शरीराच्या, जगाच्या उपाधीनें तो युक्त होतो म्हणूनच. आत्मा आपल्या अज्ञानदशेंत शरीराचा आश्रय करून राहतो, म्हणून त्या विनाशी शरीराच्या अथवा जगाच्या संसर्गानें त्याच्यावर हा खोटा प्रवाद आला आहे. **नाथिला**-नसता, मिथ्या **आलु**-आरोप **ऐसेनि**- याप्रमाणें, क्षर अशी संज्ञा प्राप्त होण्यानें **उपाधी**- उपाधीनें, जगानें, संसारानें. **आतला**-- युक्त. यालाच दृष्टांत देतात. **ओ. ४६५**-- " ज्याप्रमाणें खळखळणाऱ्या ओढ्यात प्रतिबिंबित झालेला चंद्रही वर उसळलेला दिसतो,

त्याप्रमाणें, विकारयुक्त उपाधीनींही आत्मा विकारयुक्तच आहे असा भासतो.' ओढ्यांतल्या खळखळणाऱ्या पाण्यांत प्रतिबिंबित झालेला चंद्रही तसाच खळखळून वर उधळल्याप्रमाणे भासतो. वास्तविक चंद्र वर आकाशांत आहे तशा अविकृत स्वरूपांत प्रकाशत असतो. त्याप्रमाणें आत्मा देखील विकार पावणाऱ्या बदलत्या स्वरूपाच्या जगाचा अथवा विनाशी स्वरूपाच्या शरीराचा आश्रय केल्यामुळें, त्याला देखील विकार म्हणजे उत्पत्ति, स्थिति व लय, ही बदलती स्थिति स्वीकारावी लागते. आत्मा देखील मूळचा अविकारी, अविनाशी, ज्याच्यांत कोणताही कधीं बदल होणार नाहीं असाच आहे. पण बदलत्या, नाशवंत वस्तूंच्या संसर्गानें तोही नाशवंत आहे, असा त्याच्यावर आरोप आला आहे. **खलाल** — खळखळ वाहणारा ओढा. **उदल्ले** — उधळते, उसळते. **चंद्रिका** — चंद्रबिंब. **विकारां औपाधिकां** — जगाच्या विकारी, बदलत्या स्वरूपामुळें. **ओ. ४६६**— "किंवा तो खळखळणारा ओढा अंमळ आटल्यावर तेथे पडलेलें चंद्राचें प्रतिबिंबही त्याबरोबरच लुप्त होतें. त्या प्रमाणें उपाधीचा (जगाचा) नाश झाल्यानंतर तो आत्माही दिसत नाहीं, व अशा रितीनें तो आत्मा उपाधियुक्त आहे असें भासूं लागतें." ओढा खळाळतो तोंपर्यंत चंद्रबिंब त्यांत दिसतें. ओढा आटल्यावर तें नाहींसें होतें. यावरून ओढ्यामुळेंच चंद्र आहे, असें अज्ञानी लोक ज्याप्रमाणें म्हणतात, त्याप्रमाणें, शरीर आहे तोंपर्यंत त्यांत राहणारा आत्मा दिसतो, व शरीर नाशानंतर तो दिसत नाहीं असें पाहून, अज्ञ लोक शरीरामुळेंच आत्मा आहे असें मानतात वास्तविक ओढा आटला तरी चंद्र आकाशांत प्रकाशतच असतो, तद्वत् शरीर पडलें तरी आत्मा अविनाशित्वानें नांदतच असतो. **मोटका**- अंमळ. **सोसे**-शोषे. **उपाधिनाशीं**- जगाच्या अथवा शरीराच्या नाशाबरोबरच. **औपाधिकु फुरे**- तो उपाधियुक्तच दिसतो. आत्मा हा शरीराच्या उपाधीनेंच युक्त आहे, अशी समजूत अज्ञ लोक करून घेतात **ओ. ४६७**-" याप्रमाणें उपाधीच्या योगानें याला (आत्म्याला) क्षणिकत्व प्राप्त होतें व अशा फुटकेपणामुळें, याला 'क्षर' असें नांव मिळतें."

आत्मा क्षणभंगुर, नाशवंत अशा शरीराचा अथवा जगाचा आश्रय करतो म्हणून त्यांच्या फुटकेपणामुळें, त्यांच्या अशा मोडक्या स्वरूपामुळें, त्यालाही ( आत्म्यालाही ) 'क्षर पुरुष,' नाशवंत पुरुष, असें नांव मिळतें. क्षणिक वस्तूंच्या संसर्गानें अविनाशी अशा आत्म्यालाही विनाशी असें नांव पडलें. **खोकरपणें**—मोडकपणामुळें, विनाशी स्वरूपामुळें. पुढील ओवींत 'क्षर पुरुष' वर्णनाचा उपसंहार करून, पुढील 'अक्षर' पुरुषाच्या विवेचनाला सुरवात करतात.

**ओ. ४६८**—"याप्रमाणें सर्व जीवचैतन्य हें क्षर पुरुष असें समजावें. यापुढें आतां अक्षर पुरुषाचें वर्णन करूं" ओ.४६९-४९१ या २३ ओव्यांत अक्षर पुरुषांचे विवेचन केले आहे. **ओ. ४६९**-"तर हे धनंजया! अक्षर म्हणून जो दुसरा पुरुष आहे, तो सर्व पर्वतांत मेरु ज्याप्रमाणें मध्यस्थ आहे, त्याप्रमाणें ( वर पुरुषोत्तम, परब्रह्म व खालीं क्षर पुरुष याच्या मध्यें ) मध्यस्थ आहे." मेरुपर्वत स्वर्ग, मृत्यु, पाताल या तीन्ही लोकीं अखंड आहे. पण मृत्युलोकांत त्याचा मधलाच भाग जो आपणास दिसतो, तेथे इतर पर्वतांचा तळभाग सुरू होतो. म्हणून इतर पर्वतांच्या अपेक्षेनें मेरूला मध्यस्थ म्हटलें आहे. या मेरुप्रमाणेंच 'अक्षर पुरुष' ( अथवा कूटस्थ प्रकृति, ) हा, वर संसारवृक्षाचें मूळ जें परब्रह्म व खालीं त्याच्या ज्या भूतसृष्टिच्या शाखा अथवा क्षर पुरुष, यांच्या मध्यभागीं आहे. शिवाय परब्रह्मापासून अक्षर पुरुष अथवा प्रकृति उत्पन्न झाली, व या अक्षरापासुनच क्षर पुरुष ( भूतसृष्टि ) उत्पन्न झाली असल्यानें, संसारवृक्षाच्या वाढीच्या क्रमानें देखील या 'अक्षर पुरुषाला' मध्यस्थ म्हटलें आहे. अक्षराचे अथवा प्रकृतीचें स्वरूपही असेंच मध्यस्थाला शोभेसेंच आहे. कारण परब्रह्म ज्ञानमय तसा हा ( अक्षर पुरुष ) नाहीं, व इकडे क्षर पुरुष जसा विपरीत ज्ञानमय आहे, तसाही हा नाहीं. म्हणून अज्ञानमय असा हा 'अक्षर पुरुष' मध्यस्थांतच गणला गेला आहे. 'तिये अज्ञानदशे केवळे। अक्षर नाव।' असा सिद्धांत पुढें ओ. ४७५ मध्यें मांडलाच आहे. **ओ. ४७०**--"कारण तो ( मेरु ) पृथ्वि, पाताळ व स्वर्ग या तिन्हीं लोकांत मुळींच विभागला जात नाहीं, तसाच जो ( अक्षर पुरुष ) ज्ञान व अज्ञान या भागांत मुळींच पडत नाहीं." मेरु पर्वत तिन्ही लोकांत

अखंड आहे. त्याचा मध्यभाग तेवढा पृथ्वीवर आपणास दिसतो. स्वर्गातला व पातळांतला भाग दिसत नाहीं. त्याप्रमाणें हा अक्षर पुरुष देखील वरच्या परब्रह्माच्या ज्ञानापासून व खालच्या क्षर पुरुषाच्या विपरीत ज्ञानापासून, अहं मम या बुद्धीपासून अलिप्त आहे. मधली अज्ञानदशाच ज्याच्या वाटणीस आली आहे. **ज्ञानाज्ञानांगि पडे ना जा**—ज्ञान व अन्यथा ज्ञान यांत जो पडत नाहीं. तर जो ज्ञानशून्य अशा मधल्या स्थितींत आहे. 'ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या जीवो ब्रह्मैव नापरः' हें ज्ञान होय. तर नामरूपात्मक जग खरं, देह तोच आत्मा, हें माझं, इत्यादि प्रकार, विपरीत ज्ञान होय. या दोनी अवस्थाहून ज्ञानशून्यतेची जी तिसरी अवस्था, तिच्यांतच अक्षर पुरुष ( प्रकृति ) पडतो. **ओ. ४७१**— " यथार्थज्ञानानें ऐक्यही पावायचं नाहीं, व अन्यथा ज्ञानानें ( विपरीत ज्ञानानें ) द्वैतही पावायच नाहीं, असें आंगचें जे ओतप्रोत अज्ञान, तेंच अक्षराचें स्वरूप होय." परब्रह्माच्या यथार्थ ज्ञानानें ऐक्य पावणें किंवा त्याच्या विपरीत ज्ञानानें द्वैत पावणें, या दोनी अवस्थांहून निराळी अशी जी अज्ञान स्थिति अथवा उदासीनता, तेंच अक्षर पुरूषाचें अथवा कूटस्थ प्रकृतीचें स्वरूप होय. **देहिं**—अक्षराच्या अंगचें. **निखळ नेणणें**—ओतप्रोत अज्ञान. यावर दृष्टांत देतात. **ओ. ४७२**–" धुरळेपणा गेला आहे, पण ज्याचे घटमांडादिक पदार्थ झालेले नाहींत, अशा मातीच्या ओल्या गोळ्याप्रमाणें ज्याची ( ज्या अक्षर पुरुषाची ) मधली स्थिति असते." भिजविलेल्या मातीचा गोळा धड कोरडा धुरळा नसतो व त्याचे घागर मडकी इ० पदार्थही केलेले नसतात, अशा मधल्या स्थितींत तो असतो, तशीच मधली अवस्था अक्षर पुरुषाची असते. **ओ. ४७३**—' किंवा समुद्र आटल्यावर तेथे लाटाही नसतात व पाणीही नसतें, त्याप्रमाणें आकाररहित अशी जी स्थिति ( तीच अक्षर पुरुषाची स्थिति होय)." समुद्रांत किंवा सरोवरांत पाणीच नसल्यावर, तळ उघडा पडलेलें जें त्याचें मैदान त्याला काय आकार असणार ? अशा आकाररहित मूळ स्थितीलाच अक्षर पुरुष म्हणतात. **ओ. ४७४** - " हे पार्था ! जागृतावस्था गेली आहे, पण अजून स्वप्नदशेचा कांहींच प्रारंभ झालेला नाहीं. अशा मधल्या निद्रावस्थेप्रमाणें अक्षर पुरुषाचें स्वरूप, समजण्यास अवघड असें समज." जागेपण व स्वप्नावस्था

या दोहोंमधलि जी निद्रावस्था, ही ओळखायला मोठीं संकटाचीच असल्या-मुळें, अशा संमिश्र निद्रावस्थेला ओळखणें हें एक कोडच, असें मुद्दाम म्हटलें आहे. **निद्र**- निद्रप्रमाणें. **सांकड निद्रा लिजे**- एक कोडेंच असें समज. **ओ. ४७५**-या ओवींत वरील दृष्टांतावरून सिद्धांत मांडला आहे. "जगाचा आभास नाहींसा होणें, व आत्मज्ञानाचा तर उदय नाहीं, अशी जी मधली केवल अज्ञानदशा, तिलाच 'अक्षर' असें म्हणतात." ही विपरीत ज्ञान व आत्मज्ञान या-मधील अवस्था आहे. विपरीत ज्ञानानें उदय पावलेलें जग, त्या विपरीत ज्ञानाच्या लोपाबरोबरच लुप्त झालें. पण अजून आत्मबोध व्हायचा आहे, यामधील जी ज्ञानशून्य स्थिति, तीच 'अक्षर पुरुषा' ची स्थिति होय. **ओ. ४७६**— "सर्व कलांनीं सोडलेलें चंद्राचें स्वरूप अमावास्येला जसें दिसतें, तसेंच अक्ष-राचें स्वरूप समज." आमावस्येला चंद्राच्या १६ कलांनीं त्याला सोडलेलें असतें. त्यामुळें चंद्र जरी त्यादिवशीं दिसला नाहीं, तरी तो आकाशात नाहीं, असें म्हणवत नाहीं. अशीच स्थिति अव्यक्त प्रकृतीची असतें. तींच अक्षर होय. **ओ. ४७७**— "किंवा जीवाच्या पाठीमागें ज्या उपाधी लागलेल्या असतात त्या लुप्त झाल्यानंतर जीव ज्या अवस्थेंत प्रवेश करतो, ( ती अवस्था म्हणजे अक्षर होय. ) झाड फलांत परिणत होऊन शेवटीं त्याच्या बीजांत प्रवेश करतें, त्याप्रमाणें, त्या बीजांचा अंतर्भाग जर सूक्ष्मदर्शक यंत्रानें पाहिला, तर त्यांत त्याच लहान झाडाची आकृति दिसेल. बीजांत जशी ही सुप्त वृक्षोत्पादक शक्ति असते, तशीच अक्षरांत ( प्रकृतींत ) ही जीवोत्पादक अशी अव्यक्त शक्ति असते. कोणत्याही पदार्थाची बीजावस्था ही त्या पदार्थांच्या परिणतावस्थेनंतरच येते. झाडाचीच गोष्ट पाहिली, तर झाडाची वाढ पूर्ण होऊन त्याला फळें येतात व त्यांतच त्या झाडाचें बीज तयार झाल्यानंतर त्या झाडाच्या पूर्वींच्या पानें, शाखा, इ. उपाधी लुप्त होतात. हीच त्याची बीजावस्था होय. **सर्वोपाधिविनाशें**— बीजदशेला येण्यापूर्वींच्या सर्व उपाधी. अशा बीजदशेनंतर पुनः वृक्षाची त्यांतून उत्पत्ति होऊं लागतें. प्राणि-मात्राचेंही असेंच आहे.

**ओ. ४७८**-"ज्य च्यावर उपाधींचा पगडा बसला आहे असें आत्मतत्त्व, जेथे उपाधीसह विराम पावतें त्या स्थानाला अव्यक्त असें म्हणतात." आत्मा व शरीर

मिळून प्राणी बनलेला असतो. या प्राण्याचा आत्मा व शरीर, त्याच्या बीजांत सुप्त असतेंच. बीजांतील या सुप्त उत्पादनशक्तीसच अव्यक्त प्रकृति असें म्हटलें आहे. **थाकौनि ठाके**- थांबून राहतें **अव्यक्त**- प्रकृति. परब्रह्माला देखील अव्यक्त म्हणतात. पण परब्रह्म व प्रकृति यामध्यें निर्गुणसगुणाचा भेद आहे. या ओवीनंतर दिलेली माडगांवकर व साखरेप्रतींतील ओवी, मागें आलीच आहे. पहा ओ. ८८. **ओ. ४७९**- " ज्याचा वेदांतांत ' बीजभाव ' अशा शद्बानें डौल मिरविला आहे, तेंच त्या अक्षर पुरुषाचें स्थान होय " परब्रह्माला आपल्या मूळच्या निर्गुण निराकार स्वरूपाचा मायेमुळें जो विसर पडतो, तोच संसारवृक्षाचा वर घट्ट झालेला गड्डा होय. वेदांतशास्त्रांत यालाच ' बीजभाव' असें म्हणतात. परब्रह्मावर मायेचा अंमल सुरू झाला कीं, ब्रह्माला आपल्या स्वरूपाचा विसर पडतो व हा विसर म्हणजेच संसाररूपी वृक्षाचें बी होय. जोपर्यंत आपल्या स्वरूपाचा विसर पडण्याइतपतच ब्रह्माची मजल गेलेली असते, तोंपर्यंत संसाररूपी झाड बीजाच्या स्वरूपांत असतें. हाच त्याचा ' बीजभाव ' होय. पहा मागें ओ. ८७. **आहो**—प्रतिष्ठा. **ओ. ४८०**—" ज्यापासून विपरीत ज्ञान उत्पन्न होऊन जागृति व स्वप्न या रूपांनीं प्रसार पावतें, व नानाप्रकारच्या बुद्धीच्या रानांत शिरतें. " ' अक्षराची ' मध्यस्थ स्थिति वर वर्णन केलीच आहे. ही अवस्था अज्ञानाची व निद्रेची असल्यामुळें, ती ज्ञान अथवा जागृति व विपरितज्ञान अथवा स्वप्न याच्यामधली आहे. या अवस्थेपासून एक जागृति तरी होईल किंवा स्वप्न तरी पडेल. अक्षरापासूनच खाली क्षर सृष्टि, विपरीत ज्ञानानेंच निर्माण होते. अशा विपरितज्ञानानें बुद्धीला नानाप्रकारचे संकल्प सुचतात, बुद्धि अनेक संकल्पांच्या आडरानांत शिरते. **जथौनि**—ज्या अक्षरापासून **ओ. ४८१**- " हे किरीटि ! जेथून जीवात्मा विश्वाची मांडणी करीत स्वतः उठतो, ती जीवत्वाची व विश्वत्वाची मिठी ( ऐक्य ) म्हणजेच अक्षर पुरुष होय. " जेथून जीवात्म्याला मी व माझें, किंवा जीवत्वाची व विश्वत्वाची अशी दोन प्रकारची बुद्धि होते, तीच अक्षर पुरुषाची स्थिति होय. **उठी**-उठतो. **मीठी**-ऐक्य प्रकृतीच जीवात्म्यापासून अगर पुरुषापासून जग उत्पन्न करते. पण अशी जगदुत्पत्ति होतांना, प्रथम ' महत् ' ( व्यवसायात्मक बुद्धि ) व तिच्यानंतर

त्रिगुणात्मक अहंकार उत्पन्न होतो. अव्यक्त प्रकृतीमध्यें प्रथम व्यवसायात्मक बुद्धि उत्पन्न झाली, तरीं ती अद्याप एकजिनसीच असते. हा 'तिचा एकजिनसीपणा जाऊन तिला पृथक्पणा आल्याशिवाय प्रकृतीचे अनेक पदार्थ उत्पन्न होत नाहींत. बुद्धीपासून पुढें उत्पन्न होणाऱ्या पृथक्पणाच्या गुणालाच 'अहंकार' असें म्हणतात. या अहंकारापासून अथवा मी मीपणापासून भिन्न भिन्न पदार्थांची प्रतीति होते. हा अहंकार उत्पन्न होण्याच्या वेळची प्रकृति म्हणजेच येथे अक्षरपुरुष असें म्हटलें आहे. ओ. ४८२-"दुसरा जो क्षर पुरुष तो जगांत देह धारण करून ज्या जागृति व स्वप्नावस्था यांचा उपभोग घेतो, त्या दोनी अवस्था ज्याच्यापासून ऊत्पन्न झाल्या, ( तो अक्षर पुरुष होय )." अक्षरपुरुष मध्यस्थ असून, निद्रावस्था अथवा ज्ञानशून्यता हें त्याचें स्वरूप वर वर्णन केलें आहेच. जीवात्म्याला निद्रावस्थेपासून एक जागृति तरी होईल, किंवा स्वप्नावस्था तरी घडेल. या दोनी अवस्थांचा उगम निद्रावस्थेपासूनच आहे, किंवा ज्ञानशून्यतेपासून एक ज्ञानावस्था किंवा विपरीत ज्ञानावस्था संभवते. म्हणून निद्रावस्थेचें अथवा अज्ञानाचें प्रतीक असा जो अक्षर पुरुष ( प्रकृति ), तोच जागृति व स्वप्नावस्था यांना उत्पन्न करतो, असें येथें सांगितलें आहे, **वियाला**— उत्पन्न करतो. ओ. ४८३ — " किंवा ज्या अवस्थेला अज्ञानाची गाढ निद्रा असें म्हणतात व जिच्यांत ब्रह्मप्राप्तीचीच तेवढी उणीव असते. " या अज्ञानाच्या गाढ निद्रावस्थेंत, ज्ञानाच्या जागृतीनें मिळणारी ब्रह्मप्राप्तिच तेवढी नाहीं. बाकी उत्कटतेच्या बाबतींत ही अज्ञानावस्था व ज्ञानावस्था सारखीच. फक्त ज्ञानावस्थेंतल्या जागृतींत ब्रह्मप्राप्ति होते, तेवढीच या अज्ञानाच्या गाढावस्थेंत मिळत नाहीं. हाच दोहींतला फरक, ओ. ४८४- " खरोखर हे वीरा ! या गाढ निद्रावस्थेंतून पुढे स्वप्न व जागृति. या अवस्था जर निर्माण झाल्या नसत्या, तर याच अवस्थेला ( निद्रावस्थेला ) ब्रह्मभाव असें खास म्हणतां आलें असतें." गाढ निद्रावस्था किंवा गाढ अज्ञान ही कांहीं जीवात्म्याची अंतिम स्थिति नव्हे. हिच्यांतूनच पुढें जीवात्म्याला जागृति (ज्ञान) अथवा स्वप्न ( विपरीतज्ञान ) या अवस्था प्राप्त होतात. म्हणजे अज्ञानाची गाढ निद्रा कांहीं तशीच टिकत नाहीं. उलट ज्ञानानें, जागृतीनें मिळणारा ब्रह्मभाव अथवा ब्रह्मैक्य ही अंतिम स्थिति असून, हिच्या पुढें आणखी कस-

लाच बदल संभवत नाहीं. गाढ निद्रावस्थेंत ( अज्ञानदशेंत ) असा जागृति स्वप्नाचा बदल होण्याचा हा गुण नसता तर तिचा व ज्ञानदशेंतील ब्रह्मैक्याचा सारखाच गाढपणा पाहून या गाढनिद्रावस्थेलाच ब्रह्मैक्य असें म्हणतां आलें असतें. पण तशी स्थिति नाहीं हें पुढील ओवींत दर्शवितात.

**ओ. ४८५**— "पण ज्या गाढनिद्रारूपी आकाशांत प्रकृतिपुरुषरूपी ढग आल्यामुळें, क्षेत्रक्षेत्रज्ञांचा स्वप्नाभास निर्माण केला जातो." गाढ अज्ञानांत झालेल्या प्रकृतिपुरुषसंयोगांतून पुढें स्वप्नावस्था अथवा विपरीत ज्ञान निर्माण होऊन पुढें शरीर व जीव यांची उत्पत्ति होते. गाढ निद्रावस्थेला ब्रह्मभाव म्हणतां आला असता. पण त्या अवस्थेंतच प्रकृतिपुरुषाचा संयोग घडून विपरीत ज्ञानानें जेथें स्थावरजंगमात्मक जग निर्माण होतें, तेथें ती स्थिति कांहीं ब्रह्मैक्यासारखी अंतिम अशी म्हणतां यावयाची नाहीं. अज्ञानावस्थेंतूनच पुढें विपरीत ज्ञान निर्माण होऊन जीवशरीरात्मक सृष्टि निर्माण होते. असा ज्या अज्ञानदशेंत बदल घडतो, ती कितीही गाढ असली तरी ब्रह्मैक्याच्या निर्विकार व निरुपाधिक गाढावस्थेशीं तिची तुलनाच होणार नाहीं. **क्षेत्र**— शरीर. **क्षेत्रज्ञ**—आत्मा, जीव. **ओ ४८६** – "हें असो ! पण खालीं फांद्या असणाऱ्या संसाररूपी वृक्षाला या अक्षराचेंच मूळ आहे." मागें 'उर्ध्वमूलं अधः शाखं' असे जें अश्वत्थ वृक्षाचें वर्णन केलें, त्या संसाररूपी वृक्षाचें मूळ प्रकृतीच आहे याचें विवेचन मागे केलेंच असून, ही प्रकृतीच अक्षर पुरुष होय हें येथें सांगितलें आहे. परब्रह्माला मायेचें आळ पडलें कीं, त्याला स्वस्वरूपाचा विसर पडतो. परब्रह्माला आपल्या खऱ्या स्वरूपाचें अज्ञान उत्पन्न करणारी माया अथवा प्रकृति, हीच या संसारतरूचें मूळ होय. ( पहा. ओ. ८६ ). प्रकृतीच्या मुळापासूनच हा संसारतरु उगम पावतो. आतां या अक्षराला ( प्रकृतीला ) पुरुष असे कां म्हणतात तें सांगतात. **ओ. ४८७**- "याला पुरुष असें कां म्हणायचें ? तर हा मायारूपी नगरात गाढ निद्रा घेतो म्हणून." 'पुरि शेते इति पुरुषः' ही पुरुष शब्दाची व्युत्पत्ति, या अक्षराला प्रकृतीलाही लक्षणेनें लागूं केली आहे. ही अक्षर प्रकृति देखील मायारूपी नगरींत गाढ निजते, म्हणून हिला पुरुष अशी संज्ञा दिली आहे. प्रकृतीचें किंवा अक्षराचें स्वरूप याप्रमाणें गाढ अज्ञानमय आहे असें सांगण्याचा भावार्थ. **पहुडिजे**-निजतो.

**ओ. ४८८**-- " आणि विपरीत ज्ञानाचा एक प्रकार असें जें विकारांचें **येणें,** जाणें, त्याची जिच्यांत ओळखही नसते, ती गाढ निद्रा म्हणजेच **हा अक्षर** पुरुष होय. " ज्ञानानें प्रबोध होऊन ब्रह्मैक्य प्राप्त होतें, तर **विपरीत** ज्ञानानें स्वप्नावस्था प्राप्त होऊन, नामरूपात्मक जगाची उत्पत्ति होते. याच अवस्थेंत अनेक विकार उत्पन्न होऊन लय पावतात. पदार्थांना उत्पत्ति, स्थिति व लय हे विकार याच दशेंत प्राप्त होतात तो प्रकार अज्ञानांत अथवा गाढ सुषुप्तींत नसतो. सुषुप्ति ही जागृति व स्वप्न यांमधील अवस्था असल्यानें, येथें कसल्याच विकारांचा संभव नसतो. **वारी**- येणें जाणें. **नेणिजे**- जाणीव नसतें. **ओ. ४८९**- याला अक्षर ( नाशरहित ) कां म्हणतात, त्याचें कारण देतात. " म्हणून ज्याला स्वाभाविक असा नाश नाहींच, व तो सुद्धां ज्ञानाशिवाय दुसऱ्या कशानेंही होत नाहीं. " हा अक्षर पुरुष ज्ञानाशिवाय दुसऱ्या कशानेही नाश पावत नाहीं पावला तर तो ज्ञानानेंच नाश पावतो. **हा**— नाश. **उणें**— वांचून. हा अक्षर पुरुष म्हणजेच सांख्यांची प्रकृति होय. सांख्यांच्या मताप्रमाणें प्रकृति व पुरुष हे दोघेही अक्षर आहेत. पण खरें पहावयास गेलें, तर ज्ञानाने जिचा नाश होतो तिला अक्षर कसें म्हणायचें ? वेदांताच्या दृष्टीनें, प्रकृति ( माया ) व पुरुष ( जीव ) यांच्या पलीकडचा परमात्मा, तेवढाच अक्षर ( नाशरहित ) आहे गीतेला व ज्ञानेश्वरांना वेदांताचें मत मान्य असलें, तरी प्रकृतीला अक्षर म्हणतांना सांख्यांचीच परिभाषा त्यांनीं कायम ठेविली आहे. प्रकृति ही अज्ञानमय आहे हिच्यापासुनच त्रिगुणात्मक जग निर्माण होतें. मागें " प्रकृतिरूपी संसारवृक्ष आत्मज्ञानाच्या तरवारीनें तोडून टाक " असें जें सांगितलें, तें याच दृष्टीनें होय. ( पहा ओ. २२६ ) प्रकृति अथवा संसार खरा आहे हें अज्ञान, ' ब्रह्मच तेवढें सत्य आहे ' या ज्ञानानें नष्ट होतें, असा अर्थ. **म्हणौनियां**— या अक्षर पुरुषाच्या गाढ निद्रावस्थेंत कोणताच विकार उत्पन्न होत नाहीं. प्रकृतीची ही अविकृत स्थिति पाहुनच तिला अक्षर ( नाशरहित ) म्हटलें आहे. **ओ. ४९०**- " म्हणून हा अक्षर आहे, या वेदांतांतील सिद्धांताची प्रसिद्धि देशीभाषेंत केली आहे. " वेदांताचाच सिद्धांत आपण मराठी

भाषेंत मांडला असा ज्ञानेश्वरांचा आशय. **डौरु**-प्रसिद्धि. **देशी**-देशीभाषेंत, मराठी भाषेत.

**ओ. ४९१**--" याप्रमाणें मायेचा संसर्ग असणें या लक्षणावरून व जीव हें ज्याचें कार्य आहे त्यावरून, त्या चैतन्यालाच अक्षर पुरुष असें समज." सारांश जें चैतन्य मायेच्या उपाधीनें जीवात्म्याचें स्वरूप धारण करतें, त्यालाच अक्षर पुरुष म्हणतात. चैतन्याशिवाय जगांत दुसरें कांहीं नाहीं. म्हणून या अक्षर पुरुषाला सुद्धां चैतन्य म्हटलें आहे. पण हें चैतन्य परमात्म्यासारखें निरुपाधिक नसून, मायेच्या अथवा अज्ञानाच्या उपाधीनें वेढलेलं आहे. **जीवकार्य कारणें**— जीव हेंच ज्याचें कार्य आहे त्यामुळें. जें चैतन्य जीवात्म्यांत पर्यवसित होतें. **मायासंगु चि लक्षणें**— मायेशीं संसर्ग असणें या लक्षणानें. **चैतन्य**— परमात्मा. एवं मायोपाधियुक्त परमात्म्यालाच येथें अक्षर पुरुष म्हटलें आहे. पुढील ओवीपासून ' उत्तम पुरुष च ' विषय सुरू होतो. **ओ. ४९२-** " आतां विपरीत ज्ञानामुळें, जीवदशा व विश्वाकार दशा उत्पन्न होऊन ज्या गाढ अज्ञानतत्त्वांत लुप्त होतात. " परब्रह्माला विपरीत ज्ञान झालें म्हणजे जगाची उत्पत्ति होते. पण परब्रह्माची जगदुत्पत्तीच्या वेळची स्थिति स्वप्नाची असते. गाढ अज्ञानांत किंवा निद्रेंत सर्वच विपरीत ज्ञान व स्वप्नावस्था लोपून जाते. गाढनिद्रेंत जागृति ( ज्ञान ) ही नाहीं व स्वप्नही ( विपरीत ज्ञान ) नाहीं. ती एक अज्ञानांत रंगलेली अवस्था आहे, हें पुष्कळवेळां मागें सांगण्यांतच आलेंच आहे. **ओ. ४९३**—" ते ( गाढ ) अज्ञान, ज्ञानांत बुडून गेल्यानतर व ज्ञान देखील ब्रह्मप्राप्तीला आपण साधनभूत होऊन आपण ( ज्ञान ) नाहींसें झाल्यावर, ज्याप्रमाणें अग्नि लाकूड जाळून, स्वतः नाहींसा होतो. " ज्ञानानें अज्ञानाला गिळल्यानंतर ज्ञानानें आपणही नाहींसें होणें, हीच परमात्म्याची अवस्था होय **कीर्तिमुख**-देवालयाच्या दारावर त्यांतील देवतेनें मारलेल्या राक्षसाचे शिर कोरलले असते. त्याचें दर्शन घेतल्याशिवाय देवदर्शन करतां येत नाहीं. पण देवळांत गेल्यावर किर्तिमुखाची प्रतिष्ठा कोणी राखीत नाहीं हाच न्याय लक्षांत घेऊन साधनभूत वस्तूची मागून किंमत न ठेवणें या अर्थी कीर्तिमुखत्व करणें अशी म्हण रूढ झाली. येथे **कीर्तिमुखत्व करणें**= ब्रह्मप्राप्तीला साधनभूत होऊन ज्ञानानें आपण

स्वतः नाहींसें होणें. **ओ. ४९४**- " त्याप्रमाणें ज्ञानानें अज्ञान नाहींसें केल्यावर व ब्रह्मप्राप्ति करून देऊन आपणही ब्रह्मस्वरूपीं लय पावल्यावर, तेथें ज्ञात्या-शिवाय जें ज्ञेय उरलें, तोच उत्तमपुरुष होय, " ज्ञात्याचें अज्ञान घालविल्या-नंतर ज्ञाता जसा ब्रह्मैक्य पावतो, तसें तें ज्ञानही ( परब्रह्मज्ञान ) परब्रह्मांत मिळून जातें. या प्रमाणें ज्ञाता, ज्ञान व ज्ञेय या अभिमानत्रिपुटीपैकीं ज्ञाता व ज्ञान ज्यांत सामावतात, तें ज्ञेय म्हणजेच तो उत्तमपुरुष होय. **वस्तु**- परब्रह्म. **जाणणेनविण**- जाणणाऱ्या विरहित.

( **श्लोक १७** )— " या दोहोंहून उत्तम पुरुष तर निराळा आहे, त्याला परमात्मा असें म्हणतात. तोच अविनाशी ईश्वर, त्रैलोक्यांत शिरून त्याचें पोषण करतो. " **ओ. ४९५**-" अरे ! तो उत्तम पुरुष, या दोघांहून अगोदरचा व जो केवळ तिसरा मथितार्थ आहे. " हा उत्तम पुरुष क्षर व अक्षर या दोन पुरुषांच्या म्हणजे पुरुष ( जीव ) व प्रकृति ( माया ) यांच्या अगोदरचा व हा अगदी शेवटचा, तिसरा आश्रय आहे. परमात्म्यापासुनच जीवात्मा व माया ( प्रकृति ) निर्माण झाली असल्यानें, त्या दोघांहून तो अगोदरचा ठरतो. शिवाय प्राणिमात्रांचें तो अंतिम आश्रयस्थान आहे. सर्वांची परिसमाप्ति परब्रह्मांत, उत्तम पुरुषात व्हावयाची असल्यानें, त्याला वरील क्षर, व अक्षर यांच्या अपेक्षेनें तिसरा निष्कर्ष म्हटलें आहे. **निष्कर्षु**- सिद्धांत, मथितार्थ. **ओ ४९६** – " हे अर्जुना ! निद्रा व स्वप्न याहून बोधाची जागृति जशी भिन्न व श्रेष्ठ आहे. " निद्रा व स्वप्न यांमध्यें अनुक्रमें अज्ञान व अन्यथा ज्ञान असतें, तर या जागृतावस्थेंत पूर्ण ज्ञान असतें. म्हणून ही अवस्था त्या दोघांहून जशी भिन्न व श्रेष्ठ आहे, त्याप्रमाणेंच अक्षर व क्षर पुरु-षाहून हा तिसरा पुरुषोत्तम श्रेष्ठ आहे, असें सांगण्याचा आशय. या पुरुषोत्तमांत क्षराचें विपरीत ज्ञानही नाहीं व अक्षराचें अज्ञानही नाहीं. तर तेथें संपूर्ण ज्ञान भरलेलें आहे. **बहु**— श्रेष्ठ. यालाच दृष्टांत देतात.

**ओ. ४९७**— " किंवा सूर्यकिरण व मृगजल आणि सूर्यमंडल यांच्यांत जसें फार अंतर असतें, त्याप्रमाणें हा उत्तम पुरुष ( क्षर व अक्षर पुरुषांहून ) वेगळा आहे. " सूर्यमंडलापासूनच सूर्यकिरणांची उत्पत्ति होऊन, पुढें त्यांच्यापासूनच मृगजळाच्या आभासाची निर्मिति होते.

सूर्यमंडळ याप्रमाणें त्याच्या किरणांच्या ( अज्ञानाच्या ) व त्यापासून उत्पन्न झालेल्या मृगजळाच्या ( विपरीत ज्ञानाच्या ) पासून दूर व वेगळें असतें. त्याचप्रमाणें या परमात्म्यापासून उत्पन्न झालेल्या अक्षर पुरुषांहून ( मायेहून ) व क्षर पुरुषाहून ( जगाहून ) तो स्वतः वेगळा, ज्ञानमय आहे. **अफाटु**-फार अंतर. **ओ. ४९८**-" किंवा काष्ठातच असणारा अग्नि त्या काष्ठाहून जसा वेगळा असतो, तसा हा ( उत्तम पुरुष ) क्षर व अक्षराहून वेगळा आहे." काष्ठाकाष्ठांच्या घर्षणानें उत्पन्न होणारा अग्नि त्या काष्ठांतच अंतर्भूत असतो. पण तो त्या काष्ठाहून अगदीं भिन्न असतो. कारण तो त्यांनाच पुन: जाळायला तयार असतो. तसाच क्षर व अक्षर पुरुषांत अथवा जग व प्रकृतींत अंतर्भूत असणारा हा परमात्मा, त्यांच्याहून वेगळा आहे. कारण याच्या ज्ञानानं त्या क्षराक्षरांचे विपरीत ज्ञान व अज्ञान नाहीसें होतें. पर्यायानें तो या दोघांनाही नष्ट करता. आत्मज्ञानानें जगाचे विपरीत ज्ञान व मायेचें अज्ञान पार निघून जातें. असा भाव काष्ठात अग्नि असतो, याबद्दल प्रमाण. पहा— " शमीमिवाभ्यंतरलीनपावकाम् " । रघुवंश ३ **ओ. ४९९**-" प्रलयकालीं आपली मर्यादा ओलांडून सर्व लहान मोठ्या नद्यांना एक करणारा समुद्राचा जो पूर्णपणा होतो. ' ( तसाच या पुरुषोत्तमाचा पूर्णपणा आहे. ) प्रलय कालीं समुद्राचें पाणी इतकें पसरतें कीं, तेथे समुद्राचा पूर्वीचा किनारा तर लुप्त होतोच, पण सर्व लहान मोठ्या नद्यांचा तेथें पत्ता लागत नाही. सर्वत्र एकच जलमय स्थिति होते. त्याप्रमाणें ब्रह्मैक्याच्या वेळीं ज्ञान, अज्ञान, विपरीत ज्ञान, लहान, थोर इत्यादि सर्व भेद नष्ट होऊन, तेथें पूर्णत्व येतें. ब्रह्मैक्याची ही स्थिति याप्रमाणें एकसध आहे.

**ओ. ५००**-" तद्वत् स्वप्नही नाहीं व निद्राही नाहीं, जागृतीची तर गोष्टच नाहीं, ज्याप्रमाणें प्रलय तेजानें दिवस व रात्र ही लुप्त होऊन जावी. " अशीं अज्ञान, विपरीतज्ञान व ज्ञान हीं सर्वत्र जेथें लुप्त झालीं आहेत, अशी परमात्म्यैक्याची ही केवल स्थिति येथें वर्णन केली आहे. प्रलयकालच्या प्रखर तेजांत दिवस व रात्र यांतील भेद जसा लुप्त होतो, तसा परमात्म्याच्या ऐक्यांत सर्व जागतिक भेद नष्ट होऊन, एकच पूर्णत्वाचा जेथें अनुभव मिळतो ती स्थिति, येथे वर्णन केली आहे. अशी पूर्णत्वाची स्थिति किती भव्य व

कल्पनातीत असते, तें सूचित करण्यासाठीं येथे प्रलयकालच्या समुद्राची व तेजाची, त्याला उपमा दिली आहे. **गालिली** — गळली, लुप्त झाली. **ओ. ५०१—** "मग आपण नाहीं अथवा दुसरेंही नाहीं, असणें अथवा नसणें हेंही जेथें समजत नाहीं, व अनुभवही घाबरून जेथे नष्ट होतो." परब्रह्माची निर्द्वंद्व, केवल स्थितीच येथे वर्णन केली आहे. परब्रह्माच्या ठिकाणी मी, तूं हे भेद, होणे जाणें या स्थिति, या नष्ट होऊन, अनुभव घेणारा व ज्याचा अनुभव घ्यावयाचा तें ( परब्रह्म ) एक होऊन गेल्यानंतर अनुभव घेण्याची क्रियाही जेथ नष्ट होते. सारांश जेथे ज्ञाता, ज्ञेय व ज्ञान ही अभिमान त्रिपुटी नष्ट होऊन केवल ऐक्याचीच स्थिति राहते ती, असेंच कांहींसे परब्रह्माचें वर्णन पुढील ओवींत केलें आहे. **अनुभौ निवुंजे** — अनुभव जेथे घाबरतो. अनुभव घेणेंच जेथ थांबतें. **ओ ५०२** - " असें जें कांहीं आहे, तेंच तो उत्तम पुरुष असें समज. ज्याला इहलोकांत परमात्मा असेंहि म्हणतात." **ऐसेंसें**- वर सांगितल्याप्रमाणें कांहींसें ज्याचें वर्णन करतां येईल असें. परब्रह्माचें वर्णन शद्बांत करतां येत नाहीं, पण करावयाचें झाल्यास वर केल्याप्रमाणें कांहींसा प्रयत्न करता येईल.

**ओ. ५०३—** " पण हें बोलणें ( परमात्म्याचें हें वर केलेलें वर्णन ) परमात्म्यांत न मिळण्यापूर्वीच्या जीवदशेंत, हे पांडुसुता ! असल्यावेळचें आहे. बुडण्याची गोष्ट ज्याप्रमाणें तीरावरून करावयाची असतें त्याप्रमाणें." परमात्मा असा आहे तसा आहे हें वर्णन, त्यांत मिळण्यापूर्वीच्या म्हणजे प्राणी जीवदशेंत निराळा असतां त्यावेळचें आहे. कारण जीव परमात्म्यांत मिळून एक झाल्यावर, तेथें मग वर्णन करणारा निराळा असा राहणार कसा? ' नदींत बुडणें ' हा शब्दप्रयोग नदीच्या तीरावर तो मनुष्य आहे तोपर्यंत बोलता येईल. तो नदींत बुडाल्यानंतर मग ही बुडण्याची भाषा कोण बोलणार? तसाच हा परमात्मवर्णनाचा प्रकार आहे वेदांनीं देखील परब्रह्माचें वर्णन करतांना विवेकाच्या कांठावर उभे राहूनच अलगपणें तें केलें आहे, हें पुढील ओवींत सांगतात. **ओ. ५०४**- " त्याप्रमाणें हे किरीटी ! विचाररूपी काठावर उभे केलेल्या वेदाकडूनच पलीकडच्या व अलीकडच्या ( तीराच्या ) गोष्टी बोलणें घडलें." वेद हे आत्मानात्मविचाराच्या काठावर अलग उभे आहेत. ते

कांहीं परब्रह्मांत मिळून एक झालें नाहींत. त्यांनीं कांहीं परब्रह्मांत बुडी घेत-लेली नाहीं, व त्यांनीं जोपर्यंत अशी बुडी घेतली नाहीं, तोपर्यंतच पर-ब्रह्माच्या अलीकडे अमुक आहे, पलीकडे तमुक आहे, अशी भाषा त्यांना वापरतां आली आहे. त्यांनीं परब्रह्मांत बुडी घेतली असती, तेही जर ब्रह्मैक्य-पावले असते, तर असें वर्णन करावयास ते तरी कुठलें उरले असते? **पारा-वाराचिया**-अलीकडच्या व पलीकडच्या (तीराच्या). यापुढें पुरुषोत्तम म्हणजे मीच असें भगवान् सांगतात.

(**श्लोक १८**)— " ज्या अर्थी मी क्षराच्याही पलीकडचा व अक्षरा-हूनहि उत्तम आहे. त्या अर्थी लोकांमध्यें व वेदामध्यें पुरुषोत्तम या नांवानें प्रसिद्ध आहे. " क्षर म्हणजे नाशवंत जगापासून तर आपण पलीकडच आहोच, पण अक्षर, म्हणजे अव्यय अशा कूटस्थ प्रकृतीहूनही आपण कसे श्रेष्ठ आहों, तेंच या श्लोकांत श्रीकृष्ण विवेचन करतात. **ओ. ५०५**— " म्हणून क्षर व अक्षर हे दोनी पुरुष (अलीकडचे आहेत) असे पाहून ज्या आटोक्याबाहेरच्या आत्मरूपाला 'पर' असें म्हणतात. " वरच्याच ओवींत 'वेद पारावाराच्या गोष्टी करतात' असें म्हटलें आहे. क्षर व अक्षर हे दोनी पुरुष अलीकडचे आहेत. त्यांच्यापलीकडे 'आत्मरूप' परब्रह्म असल्यामुळें, त्याला 'पर' पलीकडचा म्हणतात. 'अनावर' हें विशेषण 'आत्मरूप' याकडे ध्यावयाचें. आमच्या आटोक्याबाहेरच्या अशा आत्मरूपाला. **अनावर**— आटोक्या बाहेरचा. परमात्मा हा पलीकडचा असल्यानें, त्याला अनावर म्हटलें आहे. **ओ. ५०६**— " अर्जुना ! अशाप्रकारें परमात्मा या शब्दानें 'पुरुषोत्तम' सूचित केला जातो असें तूं समज. " **वीं**— हा तृतीयेचा प्रत्यय आहे. 'परमात्मा' हा शब्द अव्यक्त परब्रह्माला लावला जातो, पण त्यानेंच क्षर व अक्षर या दुसऱ्या दोन पुरुषाहून आणखी श्रेष्ठ असणारा पुरुष ध्वनित केला जातो. पुरुषांचीच ही परिभाषा वापरून त्याला पुरुषोत्तम असें म्हटलें आहे. यापुढें ओ. ५०७—५३० पर्यंत पुरुषोत्तमाचेंच वर्णन आलें आहे. हें सर्व वर्णन उपनिषदांतील वर्णनाच्या धर्तीवर असून, अव्यक्त परब्रह्माचेंच आहे.

**ओ. ५०७**—" येरवीं न बोलण्यानेंच ज्याचें वर्णन होतें, न जाणण्यानेंच जें जाणलें जातें व कांहीं नसण्यानेंच ज्याचें अस्तित्व आहे, अशी जी वस्तु

आहे. " पुरुषोत्तमाचें अथवा परब्रह्माचें वर्णन शब्दांनीं करतांच येत नाहीं, वर्णन करतांना वाचा खुंटतेच. म्हणून कांहींच वर्णन न करणें, मूकता स्वीकारणें, हें ज्याचें वर्णन होय. **नेणिवां जाणणें**-कोणत्याही ऐहिक ज्ञानानें अथवा विज्ञानानें जें जाणतां येत नाहीं. म्हणजे ज्ञानाचा अभाव, ज्ञानाची गति कुंठित होणें, हेंच ज्याचें ज्ञान. **न होउनि होणें**—जगांतील कोणत्याही ज्ञात पदार्थांपैकीं कोणताही पदार्थ न होणें, हेंच ज्याचें अस्तित्व. परमात्मा हा जगांतल्या कोणत्याच वस्तूसारखा नाहीं. असें ज्याचें निरुपम अस्तित्व. सारांश जें शब्दातीत, विज्ञानातीत, व दृश्य पदार्थातीत आहे. ज्याचें स्वरूप फक्त प्रतीतीनेंच कळावयाचें आहे, असा हा पुरुषोत्तम आहे. **ओ ५०८**- " जेथें ' सोहं ' असा भावही नाहींसा होतो, जेथें प्रवचनाचीच वाचा स्तब्ध होते, व जेथे द्रष्ट्यासह दृश्य नाहींसें होतें. " **सोहं ते हिं**— ज्या अवस्थेंत ' तो मी आहे. ' असा भेदच उरत नाहीं, अशी जी ब्रह्मैक्याची अवस्था. **सांघणेचि ६०**- ज्याच्यासंबंधीं कसलेंच विवरण करतां न आल्यामुळें, विवेचनाची भाषाच थांबते. वर ' न बोलणेन बोलणें ' असें म्हटलेंच आहे. **दृष्टत्वोसि**- दृष्टा व दृश्य, हे भेदही जेथे नष्ट झाले आहेत. पाहणारा व जे पहावयाचें तें परब्रह्म, हें जेथें एकच आहेत, तेथे कोण कोणाला पाहणार ? अशी ही अभिमानत्रिपुटी नष्ट झालेली, ऐक्याची अवस्था आहे. पण अशी ही परमात्मैक्याची पुरुषोत्तमावस्था आपणास जर कोणत्याच इंद्रियानीं जाणतां येत नाहीं, तर तिचें अस्तित्व तरी खरें कसें मानायचें, हें पटविण्यासाठीं ज्ञानेश्वरमहाराज पुढील दोन ओव्यांत दृष्टांत देतात. **ओ. ५०९**- " आतां सूर्यबिंब व त्याचें पाण्यांत पडणारें प्रतिबिंब, यांच्यामधील प्रभा जरी आपणास कोणत्याही साधनानें प्राप्त झाली नाहीं, तरी तिचें मध्यंतरीं अस्तित्वच नाहीं, असें म्हणतांच यावयाचें नाहीं. " सूर्य व त्याचें प्रतिबिंब पाण्यांत पडलेलें आपण पाहतो. पण त्या दोघांना जोडणारी प्रभा ( प्रकाशकिरण ) आपणास डोळ्यांनीं दिसत नाहीं. पण म्हणून ती नाहीं असें म्हणतां येणार नाहीं, तिचें अस्तित्व जसें अनुभवानें आपणांस गृहीत धरलें पाहिजे, तसें प्राणिमात्रांच्या शरीरांतील आत्मा व परमात्मा ( उत्तम पुरुष ) यांचा कांहींच संबंध नाहीं असें म्हणतां यावयाचें नाहीं. परमात्मा व आत्मा हे बिंबप्रतिबिंबरूपानें

आस्तित्वात असल्यानें, त्यांमधाल संबंध इंद्रियग्राह्य नसले, तरी ते अनुभवानें गृहीत धरलेच पाहिजेत. **लाभा जाप्रचि ना--** आपल्याला जरी प्राप्त झाली नाहीं, आपल्या डोळ्यांना जरी दिसली नाहीं. याळाच, पुनः दुसरा दृष्टांत देतात. **ओ. ५१०—** " किंवा नाक व फूल यांच्या मध्यंतरींची जी वृत्ति ( वासाची भावना ) असते, ती दिसली नाहीं, म्हणून ती नाहींच असें म्हणतां येत नाहीं. " नाकाला फुलाचा वास येतो, पण तो वास आपणास दिसत नाहीं. म्हणून त्या वासाचें अस्तित्वच नाहीं, असें कसें म्हणतां येईल ? तो वास आपणास जसा अनुभवानें समजतो, तसा आत्मा व परमात्मा यांचा संबंध अनुभवानेंच जाणावयाचा आहे. **वृत्ति**– ( वासाची ) भावना. ही अव्यक्तरूपानें तेथे असतेच. **माझारिला ठाईं**– मध्यंतरीं. नाक व फूल यांच्या मध्यंतरीं. यावरून सिद्धांत मांडतात. **ओ. ५११–** " त्याप्रमाणें द्रष्टा व दृश्य हीं नष्ट झाल्यावर मग ' काय पाहायचें ' असें जर कोणी म्हणेल, तर (त्याला उत्तर हेंच कीं), ज्याचें रूप अनुभवानेंच पहा. " द्रष्टा ( आत्मा ) व दृश्य ( परमात्मा ) हे एक झाल्यावर, कोणी कोणाला पाहायचं, व मग पाहायचं तरी काय, अशी जर कोणी शंका घेईल, तर त्याला उत्तर असें कीं, वरील फुलाचा वास जसा अनुभवानें जाणतां येतो, तसा हा आत्मा-परमात्मा यांतील बिंबप्रतिबिंबभाव, अनुभवानेंच जाणून घ्यायचा आहे. पुरुषोत्तमाचेंच आणखी वर्णन करतात. **ओ. ५१२–** " प्रकाशित करण्यास योग्य असणाऱ्या वस्तुशिवाय जो प्रकाशक आहे, सत्ता करण्यास योग्य असणाऱ्या वस्तूशिवाय जो सत्ताधीश आहे, व सर्व आकाश आपणच ज्यानें व्यापून टाकलें आहे. " **प्रकाश्य**– प्रकाशित करण्यास योग्य. **प्रकाश**– प्रकाशित करणारा. **ईशितव्य**– सत्ता चालविण्यास योग्य. **ईश**– सत्ता चालविणारा, सत्ताधीश. **अवकाश**– आकाश, पोकळी. सूर्यासारखा जो एकमेव प्रकाशक व सत्ताधारी असून जेवढी म्हणून पोकळी, किंवा मोकळी जागा आहे, तेवढी ज्यानें वरती करून भरून टाकली आहे. **वसविणें**– व्यापणें. सूर्याला प्रकाशित करण्यास योग्य असें जग तरी आहे. पण पुरुषोत्तमाला तसें कांहीं नसून तो एकमेव आहे. कारण पुरुषोत्तमाच्या यथार्थ ज्ञानानें सर्व प्रकाश्य व ईशितव्य अशा मिथ्या वस्तु लय पावतात. असा

हा पुरुषोत्तम, स्वयंप्रकाशी, सर्वसत्ताधीश व सर्वव्यापक असा आहे. **ओ. ५१३—** " जो स्वतःच्या नादानें ऐकता येण्यासारखा नाद आहे, जो स्वतःच्या गोडीनेंच चाखता येण्यासारखा स्वाद आहे, व जो स्वतःच्या आनंदानेंच उपभोगण्याचा आनंद आहे. " ज्या परमात्म्याचा नाद, गोडी, व आनंद उपभोगण्यास दुसऱ्या कोणत्याही वस्तूची अपेक्षा नाहीं. त्याचा नाद, स्वाद व आनंद, हे त्याचाच अनुभव घेऊन जाणावयाचे आहेत असा अर्थ. परमात्म्याचें हे गुण त्याच्याच प्रतीतिशिवाय समजणार नाहींत. **ओ. ५१४—** " जें म्हणजे सुखांत आणखी सुख मिसळलं, तेजाला आणखी तेज प्राप्त झालं, व शून्यही शून्यांत मिळालं. " उत्तम पुरुष अथवा परमात्मा म्हणजे सर्व सुखाचं निधान, सर्व तेजाची परमावधि, व सर्व पोकळी सामावून घेणारें आकाशच. घटाकाश व मठाकाश हे लुप्त झाल्यावर ज्या प्रमाणें मोठ्या आकाशांत सामावतात, त्याप्रमाणें सर्वांना सामावून घेणारें, हें परमात्मतत्व आहे. तुकारामाचें ' सर्व सुखाचें आगर ' असा हा पुरुषोत्तम आहे. **शून्य**- पोकळी, आकाश तात्पर्य पुरुषोत्तम अथवा परब्रह्म हें, सुखाचें निधान, परमतेजस्वी व सर्वव्यापक असे आहे. **ओ. ५१५**- " तो पुरुषोत्तम म्हणजे पूर्णत्वाचा शेवट असून, विश्रांति व विश्रांतीचें स्थान दोनी जेथे लुप्त झालीं आहेत. " ज्याच्या ठिकाणी पूर्णत्वाचा शेवट झालेला आहे, पूर्णता अगदी शिगेला पोचली आहे, व विश्रांति व विश्रांतीचें स्थान अशी दोनीं ज्याच्यांत एक झालीं आहेत. तात्पर्य जो सर्वपरिपूर्ण व सर्वविश्रामधाम आहे. " ॐ पूर्णमदः पूर्णमिदं पूर्णात्पूर्णमदुच्यते " असें जें उपनिषदांत वर्णन आहे, तें या परब्रह्माचेंच होय. **विश्राम—** विश्रांतिस्थान. **ओ. ५१६—**"जो आकाशालाही व्यापून आणखी उरला आहे, ज्यानें ऱ्हासाला पुरतें ग्रासून टाकलें आहे, व जो बहुतापासून बहुतप्रकारानें दूर आहे. " परमात्मा हा आकाशापेक्षांही व्यापक, नाशालाही गिळून टाकणारा व सर्वापासून अनेक प्रकारानं दूर आहे. सारांश तो सर्वव्यापक अव्यय व दूर आहे. " **बहु—** दूर. परब्रह्म हे ज्ञान्यांना जवळ तर अज्ञानी लोकांना दूर आहे. पहा— तदेजत्तन्नेजत्तद्दूरे तदु अंतिके–ईशावास्योपनिषत्. **बहुतें पाडें—** अनेक प्रकारांनीं. **ओ. ५१७**-" पण शिंपली आपण

स्वतः रुपें नसतांनाही अज्ञांनी लोकांना आपण रूपें असल्याची प्रतीति दाखविते. सूर्याच्या किरणांनीं वाळवंटांत शिंपली, रुप्याप्रमाणें वरवर पाहणाऱ्यांना भासते. पण ती कांहीं खरी रूपें नसते. त्याप्रमाणें परब्रह्मदेखील अज्ञानी लोकांना आपण जग असल्याचा भ्रम उत्पन्न करतें, पण वास्तविक तें कांहीं जग नसतें. शिंपल्यावर जसा रूप्याचा आभास उत्पन्न होतो, तसाच परब्रह्मावर जगाचा आभास अज्ञान्यांना होतो. परमात्म्याच्या ठिकाणीं नानात्व व नामरूपात्मकत्व जें दिसतें ते अज्ञानी लोकांना होय, हें सिद्ध करण्यासाठीं आणखी दृष्टांत देतात. **ओ. ५१८**—" किंवा सोनें आपलें अस्तित्व कायम ठेऊनच अनेक अलंकारांचे आकार धारण करतें. त्याप्रमाणें आपण स्वतः विश्व न होताच जो विश्व धारण करतो." सोनें ज्यावेळीं अनेक अलंकारांचें आकार धारण करतें, त्यावेळीं तें कांहीं ते बहुविध अलंकार होत नाहीं. तें सोनेंच असते, पण अनेक अलंकारांना आश्रय देतें. तद्वत् परब्रह्म देखील आपण स्वतः विश्व न होता, नामरूपात्मक जगाला आश्रयस्थान होतें. **अलंकारदसे**—अलंकारांच्या दशेला, अलंकारांच्या स्थितीला. **ओ. ५१९**— " फार काय! पाणी व लाटा यांच्यांत ज्याप्रमाणें भिन्नपणा नसतो, त्याप्रमाणें, जगाला आपल्या सत्तेनें जो प्रकाशित करतो." पाण्यापासून लाटा उत्पन्न होतात हा केवळ आभास आहे, लाटा या केवळ पाण्याच्या सत्तेनें निर्माण होतात, त्याप्रमाणें जग हें केवळ परब्रह्माचा आभास असून तें त्याच्याच सत्तेनें निर्माण झालें आहे. **सिनानेपण**— वेगळेपण. **सत्ताप्रकाशु**— आपल्या सत्तेनें प्रकाशित करणारा. **ओ. ५२०**- " हे वीरश्रेष्ठा! हा आपल्या संकोचाला अथवा विस्ताराला आपणच कारण होतो. पाण्यांत प्रतिबिंबित झालेला चंद्र जसा मूठभर होतो त्याप्रमाणें." आपण जगाएवढें विस्तृत व्हावयाचें, कां प्राण्याच्या लहान शरिराएवढें व्हावयाचें, हें परमात्माच ठरवितो. सारांश आपणावर व्यष्टिस्वरूपाचा आभास अथवा समष्टिस्वरूपाचा आभास उत्पन्न करायचा, हें त्याच्यावरच अवलंबून आहे. आकाशांतला एवढा मोठा चंद्र पाण्यांत प्रतिबिंबित झाला कीं, जसा मुष्टिग्राह्य भासतो, तसाच पुरुषोत्तमही विश्वरूप अथवा प्राणिरूप भासतो. सारांश जलांत चंद्र मूठभर दिसला, तरी वर आकाशांत तो मोठा आहे, त्याप्रमाणें पुरुषोत्तमानें व्यष्टि अथवा समष्टिरूप धारण केलें, तरी तो त्यांच्याहून केवळ

तरी मोठा आहे, असा भाव **रूप**— कारण. **समूठ**— मूठभर, मुष्टिग्राह्य. **ओ. ५२१** - " त्याप्रमाणें विश्व असलं कीं तो असतो, व विश्वाचा लोप झाला कीं तो कोठे तरी जातो, असें नाहीं. ज्याप्रमाणें रात्रीच्या वेळीं व दिवसाच्या वेळीं सूर्यांत कांहीं फरक पडत नाहीं." जगावर परमात्म्याचें आस्तित्व अवलंबून नाहीं. जग असलें कीं तो आहे, व नसलें कीं तो नाहीं, अशा अन्वयव्यतिरेक पद्धतीनें परमात्म्याचें अस्तित्व सिद्ध करतां येणार नाहीं. विश्व असलें काय किंवा नसलें काय, तो निर्विकारपणें कायम आहे. सूर्यांत रात्रीं व दिवसा जसा फरक पडत नाहीं, तसा परमात्म्यांत कसलाच फरक पडत नाहीं. **ओ. ५२२**-"त्याप्रमाणें जो कोणामुळें कसल्याही तऱ्हेनें खर्ची पडत नाहीं, व ज्याचं सांकडं ज्याचं त्यालाच असतं." परब्रह्म दुसऱ्या कोणत्याही वस्तूमुळें कमी अधिक होत नाहीं. तें अव्यय असून स्वतःची स्वतःलाच अडचण उत्पन्न करतें. आपण संकोच पावावयाचें असल्यास आपणच तें तसें करूं शकतें. दुसऱ्याची त्याला किमपीहि अपेक्षा नाहीं. तात्पर्य तें अव्यय व स्वतंत्र आहे असा भाव. **वेंचि न पडे**-ज्यांत कांहीं कमतर होत नाहीं. **सांकडे**-संकट, संकोच. **ओ. ५२३**— " हे धनंजया ! जो आपणच आपणाला प्रकाशित करतो, फार काय सांगावें, ज्याच्या ठिकाणीं द्वैत नाहींच." अशाप्रकारें पुरुषोत्तम हा स्वंयप्रकाशी असून एकमेव आहे. त्याला जाणायचं असेल, तर त्याचंच ज्ञान करून घेतलं पाहिजे, इतर दुसऱ्या साधनांनीं त्याचें ज्ञान होणार नाहीं. कारण तो आपणच आपणाला प्रकाशित करणारा आहे. **ओ. ५२४**— " अरे ! तो मी निरुपाधिक व क्षर व अक्षर पुरुषाहून श्रेष्ठ असा एकमेव आहे, म्हणून वेद व लोक मला ' पुरुषोत्तम ' असें म्हणतात." **निरुपाधिक**— उपाधिरहित. जगाच्या उपाधीपासून वेगळा.

( **श्लोक १९** )—" याप्रमाणें मी पुरुषोत्तम हें मोहवश न होतां जो जाणतो, तो सर्वज्ञ होत्साता सर्वभावानें हे भारता ! मलाच भजतो." **ओ. ५२५**—" पण हें असो ! ज्यांच्या अंतःकरणांत ज्ञानरवीचा उदय झाला आहे, तोच हे धनंजया ! पुरुषोत्तम अशा मला जाणतो. **ज्ञानमित्रें पाहालेयां**—ज्ञानरूपी सूर्यानें प्रभात केली असतां. ज्ञानरूपें उजवला असतां.

**ज्ञान**—' ब्रह्मसत्यं, जगन्मिथ्या जीवो ब्रह्मैव नापरः ' या ज्ञानाचा ज्याच्यांत उदय झाला, त्यालाच पुरुषोत्तमाचें स्वरूप समजेल. **ओ. ५२६**—"ज्याप्रमाणें जागे झाल्यावर स्वप्न नाहींसें होतें, त्याप्रमाणें ज्ञानाचा उदय झाल्यावर भासमान होणारें त्रिभुवन व्यर्थ होतें." परब्रह्म तेवढेच सत्य आहे हें ज्ञान बाणल्यावर, सर्व जग मिथ्या आहे हें उमगतें. **फुरतें**— स्फुरणारें, भासमान होणारें. **वाउगें**- फोल, मिथ्या. **ओ ५२७**—"किंवा माळ हातांत घेतली म्हणजे सर्पाभासाचा त्रास चुकतो. त्याप्रमाणें माझ्या (पुरुषोत्तमाच्या) ज्ञानामुळें जो विपरीतज्ञानाचा अंगीकार करीत नाहीं." लांबून माळ सापासारखी दिसते. पण ती हातांतच घेतल्यावर मग सर्व भ्रम नष्ट होऊन तो त्रास जसा चुकतो, तसेंच पुरुषोत्तमाच्या स्वरूपाचें यथार्थ ज्ञान ज्याला झालें आहे, तो मिथ्या जग खरें मानीत नाहीं. **कांटाळा**- त्रास. **टवाल**- मिथ्या जग. **नांगवणें**- न सांपडणें. **ओ. ५२८**- "अलंकार हें सोनेंच आहे हें जो जाणतो, तो त्याचें अलंकारत्व व्यर्थ मानतो. त्याप्रमाणें ज्यानें मला (पुरुषोत्तमाला) जाणलें, त्यानें सर्व भेद टाकलाच." अलंकारांत सर्व सोनेंच भरलें आहे. हें उमगल्यावर, मग अमका अलंकार तमका अलंकार हीं नावें व्यर्थ होत. त्याप्रमाणें ज्याला आत्मापरमात्म्याच्या ऐक्याचें ज्ञान झालें, त्याच्यांतली, हा माझा, हा परका ही भेदबुद्धि नष्ट होते. **वाळणें**—टाकणें. **ओ. ५२९**- "मग मीच सच्चिदानंद व स्वतःसिद्ध आहे व आपणा स्वतः सकट कोठेच भेद- नाही असें समजून जो मला परमात्म्याला जाणतो." परब्रह्माचें स्वरुप सत् चित् व आनंदमय आहे. सर्वत्र सच्चिदानंदस्वरूप परब्रह्म भरलें आहे, व परमात्मा हा स्वतःसिद्ध, स्वतंत्र आहे, भेद असा कोठेच नाहीं, अशी वृत्ति ज्याची बाणली आहे, त्याला परमात्म्याचें खरें ज्ञान झालें. **भेदु नेणौनि**-भेद नाहीं असें समजून. **आपणेनसिं**- आपणासकट, आपण धरून. **ओ. ५३०**- "त्याचप्रमाणें ज्याअर्थी त्याला कांहीं द्वैत उरलेंच नाहीं, त्याअर्थी त्यानें सर्व जाणलें, हें म्हणणेंच कमी, अल्प आहे." त्याला जर द्वैत उरलें नाहीं, त्याचें जर परब्रह्माशीं ऐक्य झालें, तर त्याला जाणायला उरलें तरी कोण? आणि तेथे जाणायला जर कोणीच उरलें नाहीं, तर मग त्यानें सर्व जाणलें हें म्हणणें कमीपणाचें नाहीं काय? जेथे जाणणाराच जर परब्रह्मांत ऐक्य पावला,

तर परब्रह्माला जाणायला पुनः तेथे कोण उरणार ? म्हणून वरील ओवींत ' जाणे ' असें जें म्हटलें आहे तें व्यर्थ आहे.

**ओ. ५३१**—या ओवीपासून ५३६ ओवीपर्यंत, ज्ञानी भक्तच आपली भक्ति करण्यास योग्य आहे, असें भगवान् सांगतात. " म्हणून हे अर्जुना ! माझ्या भक्तिला तोच योग्य आहे. आकाशाला आलिंगन द्यायला जसं आकाशच योग्य त्याप्रमाणें. " भगवंतांचें म्हणणें असें कीं, आपल्यासारख्या सर्वव्यापकांची भक्ति करण्यास भक्तही तसाच व्यापक अंतःकरणाचा, ब्रह्मैक्य पावलेला, समदृष्टि झालेलाच पाहिजे. आकाशाला आलिंगन देण्यास तसें विस्तृत आकाशच असावें लागतें लहानानें मोठ्याला कसं आलिंगन द्यायचं ? या दृष्टांतावरून येथे ब्रह्मांत मिळून जाण्याची आत्मनिवेदनाची भक्तीच सांगितली आहे. नवविधाभक्तीपैकीं ही शेवटची आहे. **ओ. ५३२**—क्षीरसागराला क्षीरसागराचे गुण अंगीं असणाऱ्यानेंच मेजवानी करावी, किंवा ज्याप्रमाणें अमृत होऊनच अमृतांत मिसळावें लागतें. " ज्याच्यांत मिसळावयाचें आहे, तेंच झाल्याशिवाय योग्य मिलाफ होणार नाहीं. क्षीरसमुद्रांत मिसळायचें झाल्यास क्षीरसागराचें दुग्धत्व व अथांगत्व अंगीं आणायला पाहिजे. त्याप्रमाणें पुरुषोत्तमाची भक्ति करावयाची, तर भक्तानें आपणही तसंच झालं पाहिजे. **परगुणें**-- मेजवानी.

**ओ. ५३३**-" साडेपंधरा दराच्या चोख सोन्यांत मिसळायचें असल्यास ज्याप्रमाणें तसेंच साडे पंधरा दराचें चोख सोनेंच पाहिजे, त्याप्रमाणें भक्त मीच झाल्यानें माझी भक्ति होऊं शकेल. " चोख सोन्यांत आणखी सोनें मिसळायचें असल्यास, तसेंच चोख सोनें पाहिजे, ( तेथे अशुद्ध, किटाळ असलेलं सोनं जसं उपयोगी नाहीं. ) म्हणजे योग्य मिळणी होते, तद्वत्, भगवान् म्हणतात कीं, " भक्त माझ्याशी एकरूप झाला तरच माझी आत्मनिवेदनपर भक्ति होऊं शकेल. " **साडपन्हर**- साडे पंधरा रुपये तोळ्याचें चोख सोनें. ज्ञानेश्वरकालीं चोख सोन्याचा साडेपंधरा व सोळा असा दर होता. पहा- " कां मीनलेनि कीडालें । वानिभेदासि ए सोलें । "- ज्ञानेश्वरी १५।३०९. **ओ. ५३४**- " हे पहा ! कीं, गंगा जर समुद्राहून वेगळी असती, तर ती

दरसाल पुनः पुनः त्याला मिळण्यास कां आली असती ? म्हणून भक्त जर मी ( पुरुषोत्तम ) झाला नाहीं, तर तेथें मिलाफ होईल काय ?" गंगा ज्याअर्थी समुद्रांला जाऊन दरसाल मिळते, एकदा मिळून पुन: मिळण्यास येते, त्या अर्थी ती समुद्राशीं एकरूपच झालेली आहे, त्याप्रमाणें भक्तानें मीच झाल्याखेरील त्याचें माझें मीलन होणार नाहीं, असा भगवंतांचा आशय. **कैसेन फिरे माघौति**- पुन: कां आली असती ? समुद्राला गंगा दर वर्षी मिळते, तशी ती कां मिळाली असती ? ती त्याच्याशीं एकरूप आहे म्हणुनच. **भक्ति**- (तृ) भक्तानें. **ओ. ५३५**- " याप्रमाणें सर्व प्रकारें लाटा जशा समुद्राशीं एकरूप असतात, तशी माझी ज्यानें भक्ति केली असें पहा. " समुद्राच्या लाटा त्याच्याशीं जशा एकरूप झालेल्या असतात, तसा भक्तही भगवंताशीं एकरूपच झालेला असला पाहिजे. असा भगवंताशीं ऐक्य पावलेला भक्त भागवंताचें अथवा परब्रह्माचें ऐक्यज्ञान झालेलाच असणार. अशी ही ज्ञानीभक्ताची भूमिका विशद केली आहे. **ऐसेया लागि**-अशारितीनें, माझ्याशीं एकरूप होऊन. **ओ. ५३६**- " सूर्य आणि त्याची प्रभा यांच्यात ज्या प्रेमामुळें ऐक्य असतं, तसाच प्रकार त्याच्या ( त्या ज्ञानी भक्ताच्या ) भक्तीचा मानतां येतो. " सूर्याची प्रभा जशी त्याला कधीहीं सोडून जात नाही, त्याच्याशी नित्य एकरूप असते, त्याप्रमाणें भक्तानें देखील पुरुषोत्तमाशी अथवा भगवंताशीं अशाच अनन्यभक्तीनें ऐक्य पावलें पाहिजे, असा भगवंतांच्या म्हण्याचा आशय आहे. **जेणें लोभें**- ज्या प्रेमानें. **मानुं लाभे**- मानतां येतो. यानंतर या अध्यायाच्या शेवटच्या श्लोकांत आतांपर्यंत केलेल्या क्षराक्षर पुरुषाच्या व पुरुषोत्तमाच्या स्वरूपाच्या ज्ञानाची फलश्रुति देण्यांत आली आहे.

( **श्लोक २०** )- " हे निष्पाप भारता ! असें हें अत्यंत गुह्यशास्त्र मी तुला सांगितलें, हें जाणल्यानें मनुष्य बुद्धिवान् व कृतकृत्य होतो. " बुद्धिमान् होणें हीच या पुरुषोत्तम स्वरूपाच्या ज्ञानाची फलश्रुति आहे. **ओ. ५३७**— " याप्रमाणें गीतेच्या विवेचनाला आरंभ केल्यापासून, सर्वशास्त्रांचें सारच व दशोपनिषद्रूपी दहा पाकळ्यांच्या कमलाचा सुवासच. " ( आम्हीं एकीकडे काढला आहे. ) हें पुरुषोत्तमज्ञान म्हणजे आजपर्यंतच्या विवेचनाचें

सारच असून, सर्व शास्त्रांच्या अभ्यासानेंही हेंच प्राप्त होतें. दशोपनिषदांतील वेदांतविचाराचा मथितार्थही हाच आहे. **सर्वशास्त्रैकलभ्य**- सर्व शास्त्रांच्या अभ्यासानें मिळणारें. **उपनिषदां दशदलाचें**-उपनिषद्रुपी दहा पाकळ्यांच्या कमलाचा ( सुगंध ). ईश, केन, कठ, प्रश्न, मुंड, मांडुक्य, तित्तिर, ऐतरेय, छांदोग्य व बृहदारण्यक अशीं दहा उपनिषदें आहेत. या उपनिषद्विचारांतील वेदांतशास्त्राचा गाभा म्हणजेच हें पुरुषोत्तमयोगज्ञान होय, असें येथें सूचित केलें आहे. **सौरभ्य**— सुवास.

**ओ. ५३८**- " हें ( पुरुषोत्तमयोगाचें ज्ञान ) व्यासांच्या बुद्धिरूप हातानें आम्ही वेदाचें नवनीत मंथन करून आयतें काढलेलें सार आहे. " व्यासांनीं ब्रह्माचें म्हणजे उपनिषदांचें मंथन करून जें हें पुरुषोत्तमज्ञानरूपीं लोणी काढलें, त्यांतूनच आम्ही हें आयतं सार काढलं आहे, असं ज्ञानेश्वर सांगतात. व्यासांनीं दशोपनिषदांचें मंथन करून भगवद्गीतेच्या द्वारां जें हें पुरुषोत्तमाचें स्वरूप वर्णन केलं, त्याचाच सारांश येथें आयताच मराठींतून आपण देत आहों, असा ज्ञानेश्वरांचा भावार्थ. **ब्रह्माचेनि नवनीतें**- उपनिषदांच्या लोण्यांतून. **व्यासप्रज्ञेचेनि हातें**--व्यासांची बुद्धि, तीच लोणी काढणारा हात. वेदांची व्यवस्था लावली म्हणूनच व्यास हें नांव त्यांना पडलें, हें प्रसिद्धच आहे. **मथुनि**- मंथन करून, घुसळून. यानंतर श्रीमद्भगवद्गीतेची महति, तिच्यावर केलेल्या लक्ष्मीच्या रूपकानें वर्णन करतात. **ओ. ५३९**— " जी ज्ञानामृतानें भरलेली गंगा, जी आनंदरूपी चंद्राची सतरावी कला, व जी विचाररूपी क्षीरसमुद्रांतून निघालेली नवी लक्ष्मीच जणु. " ( अशी ही गीता ) **ज्ञानामृताची इ०**- आपल्या निर्मल ज्ञानानें सर्वांना पावन करणारी, गीता ही एक भागीरथीच आहे. **आनंदचंद्रिची इ०**- ब्रह्मानंदरूपी चंद्राची गीता ही सतरावी कला होय. आकाशांतील चंद्राला १६ च कला असतात. पण या ब्रह्मानंदरूपी चंद्राला १७ म्हणजे १ कला अधिकच आहे, अशी कल्पना आहे. कौमुदीहूनही ज्या ब्रह्मानंदाचा आनंद अधिक आहे, असें या कलाधिक्यानें सूचित केलें आहे. असा ब्रह्मानंद ज्या गीतेंतील तत्त्वज्ञानानें मिळतो, तिलाच या आनंदचंद्राची १७ वी कला असें सार्थतेनें म्हटलें आहे. **विचारक्षीरार्णवींची इ०**— विचाररूपीं क्षीरसमुद्रांतून निघालेली नवी लक्ष्मी म्हणजेच

ही गीता. मूळ लक्ष्मी देवदानवांनीं केलेल्या समुद्रमथनांतून निघाली. भगवद्गीत ही आत्मानात्मविचाराच्या क्षीरसमुद्रांतून निघालेली दुसरी लक्ष्मीच जए पूर्वी एकदा समुद्रमंथन होऊन लक्ष्मीचा अवतार झाला. आता विचार समुद्राचें पुनरपि मंथन होऊन, गीतारूपी नवीन लक्ष्मीचा अवतार झाल आहे. **ओ. ५४०**— " म्हणून आपल्या पदरूपी वर्णानें व अर्थरू जीवप्राणानें, माझ्याशिवाय दुसऱ्या कोणाशीं एकरूप होणें ती जाणत नाहीं. भगवान् म्हणतात कीं, मूळ लक्ष्मीनें जशी त्यांनाच माळ घातली, तशीच ह गीतारूपी नवी लक्ष्मी देखील पद ( चरण ), वर्ण ( अंगकांति ), जीव प्राण हे सर्वस्वी मलाच वाहून माझीच होईल. पद, वर्ण, हे शद्व श्लिष्ट असू ते एकदा गीतेकडे व पुन: लक्ष्मीकडे लावावयाचे आहेत **हो॰ नेणें**– ह लक्ष्मी माझ्याशिवाय ( पुरुषोत्तमाशिवाय ) दुसरं कांहीं होणं जाणत नाहं ती माझ्याशीच शद्वश: व अर्थश: एकरूप होणार. गीतेवर केलेलं, समुद्र मंथनांतून निघालेल्या लक्ष्मीचें हें रूपक, आणखी पुढें चालूं करतात. **ओ ५४१**– " क्षर व अक्षर हे पुरुष तिच्या ( गीतारूपी लक्ष्मीच्या ) पुढें झाले पण ते निवळ पुरुष आहेत म्हणून तिनें बाजूला सारले. मग मला पुरु श्रेष्ठालाच तिनें आपलें सर्वस्व दिलें." विचारसागरांतून ही गीतालक्ष्मी जेव्ह बाहेर पडली, तेव्हां क्षर व अक्षर हे दोन पुरुष तिला वरण्यासाठीं सामो आले. समुद्रमंथनांतून निघालेल्या लक्ष्मीला वरण्यास जसे अनेक देवदानव पु झाले, त्याप्रमाणेंच या क्षराक्षरांनीं आतां केलें. पण ते नुसते पुरुष आहेत अ पाहून, तिनें माझ्यासारख्या पुरुषश्रेष्ठाला वरलें, असा भगवंतांचा युक्तिवा तात्पर्य गीतेंत क्षराक्षरविचार प्रथम आला असला, तरी मागून केलेल्या पुर षोत्तमयोगाचेंच महत्व तेथें विशेष आहे. **पुरुषत्वें वाळिले**–नुसते साधे पुर म्हणून बाजूला सारले. त्यांचा तिनें स्वीकार केला नाही. **ओ. ५४२**–"म्हण जी गीता तूं नुक्तीच ऐकलीस, ती माझ्यामुळेंच पतिव्रता झाली आहे." पूर्वीच देवदानवांच्या समुद्रमंथनांतून निघालेल्या लक्ष्मीनें मलाच ( विष्णूलाच, परम त्म्यालाच ) वरलें व आता या विचारार्णवांतून निघालेल्या गीतारू लक्ष्मीनेंही मलाच ( पुरुषोत्तमालाच ) वरलें आहे. म्हणून ही गीतारूपी लक्ष माझ्यामुळेंच पतिव्रता या पदाला पात्र झाली आहे." माझें आणि गीतेचें ना

अभिन्न आहे असा भाव. येथे गीतेवर केलेलें लक्ष्मीचें हें रूपक, केवळ १५ व्या अध्यायालाच अनुलक्षून नसून सर्व भगवद्गीतेलाच लागू आहे, हें लक्षांत ठेवलें पाहिजे. पण अशा प्रकारचें गीतामहात्म्यवर्णन प्रस्तुत १५ व्या अध्यायाच्या उपसंहारांतच कां आलें, याचें कारण एवढेंच दिसतें कीं, भगवद्गीतेंतील ज्ञानाच्या विवेचनाची परिसमाप्ति 'पुरुषोत्तमयोगानें' १५ व्या अध्यायांतच झाल्यानें, प्रतिपाद्य विषयांच्या दृष्टीनें १५ वा अध्याय हा भगवद्गीतेचा शेवटच म्हणावयास हरकत नाहीं, व अशा या विषयदृष्ट्या शेवटचा म्हणून गणलेल्या अध्यायांत मग सर्वच गीताग्रंथाची महति गाण्याची संधि, ज्ञानेश्वरांनीं साधून घेतली असावी.

**ओ. ५४३—** "खरोखर हें ( गीताशास्त्र ) शब्दानें सांगावयाचें शास्त्र नसून, संसार जिंकायचें हें शस्त्र आहे. हीं अक्षरें ( गीतेचे श्लोक ) म्हणजे आत्म्याचा साक्षात् अवतार घडविणारा मंत्रच होय." गीतेंतील आत्मज्ञान हें शब्दानें सांगून समजण्यासारखं नाहीं, तें स्वतःच्या अनुभवानेंच जाणलं पाहिजे. शिवाय गीतेच्या आत्मसाक्षात्कार घडविणाऱ्या तत्त्वज्ञानानें संसार मिथ्या आहे हें पटल्यामुळें, संसार जिंकण्याचें, संसाराच्या फेऱ्यांतून सुटण्याचं तें एक शस्त्रच आहे, असें ठरतें. यज्ञांत एकाद्या देवतेला आवाहन करतांना मंत्र म्हटला कीं, ती विशिष्ट देवता जशी साक्षात् अवतरते, त्याप्रमाणें या गीतेंतील अक्षरें म्हणजे परमात्म्याला आवाहन करून त्याचा साक्षात् अवतार घडविणारे मंत्रच आहेत. वैदिक मंत्रांत जसें हें देवतेला प्रत्यक्ष आणण्याचें सामर्थ्य आहे, तसेंच गीतेच्या शब्दांतही साक्षात् परमात्म्याचें दर्शन घडविण्याचें सामर्थ्य आहे, असा भाव. ज्या गीतेंत पुरुषोत्तमाचा योग घडविला जातो, तिचें सामर्थ्य काय वर्णन करावें ! **जिणतें—** जिंकणारें.

**ओ. ५४४—** "पण अर्जुना ! तुला हें शास्त्र सांगितलें, त्याची अशी गोष्ट झाली कीं, तूं आज माझ्यापासून माझं गुप्त धन हिरावून घेतलंस." भगवान् म्हणतात, हें गीताशास्त्र माझ्याजवळ गुप्त ठेव्याप्रमाणें होतें, तें आतांपर्यंत कोणालाही माहित नव्हतें. पण तूं तें आज आत्मसात् केलेंस. माझ्यापासून नेलेस. आपण एकादी गुप्त गोष्ट दुसऱ्यास सांगितली असतां, आपल्याजवळचा आपला ठेवा नाहींसा झाल्याबद्दल जी थोडी हुरहूर आपणास लागते, तशाच प्रकारची हुरहूर श्रीकृष्णांना लागलेली आहे. अर्जुनाला हे शास्त्र

सांगतांना आनंदाची तशीच थोडी असंतोषाची संमिश्र भावना, श्रीकृष्ण अनुभवीत आहेत. **गोप्य धन**— गुप्त ठेवण्यास योग्य असें ( गीताशास्त्र ) **काढिलें**— दूर केलें. **ओ. ५४५**-- " चैतन्यशंभु असा जो मी ( श्रीकृष्ण ), त्या माझ्या डोक्यांत ( गीतारूपी ) जो ठेवा होता, तो काढणारा तूं आस्थेचा सांठा असा गौतम ऋषि झालास. " येथे एका पौराणिक आख्यायिकेचें रूपक केलें आहे. शंकराच्या जटेंतील गंगा जशी गौतमानें काढून आणली, तशीच चैतन्यरूपी शंकर असे जे श्रीकृष्ण, त्यांच्या डोक्यांतील गीतारूपी गंगा, अर्जुनरूपीं गौतमानें मोठ्या आस्थेनें काढून घेतली. " 'माझ्याजवळील गीताशास्त्र तूं मोठ्या आस्थेनें आपलेसें' केलेंस असा श्रीकृष्णांचा भाव. **चैतन्यशंभुचां**— परमात्मारूपीं शंकर, अशा श्रीकृष्णांच्या. **गौतमु**— गंगा ही शंकरांच्या जटेंत नित्य असल्यानें पार्वतीला तिचा हेवा वाटला व तिला शंकरांच्या जटेपासून दूर करण्याबद्दल तिनें गणपतीला सांगितलें. गणपतीनें कांहीं ब्राह्मणांच्या संमतीनें एक युक्ति योजली. मायेची एक गाय करून त्यांनीं गौतम ऋषीकडे त्यांना त्रास देण्यास पाठविली, व गौतमऋषीनीं तिचा त्रास चुकविण्यासाठीं तिच्यावर एक दर्भ टाकतांच ती मृत झाली. या गोहत्येच्या पापापासून मुक्त होण्यासाठीं, गणपतीच्या सांगण्यावरून गौतमांनीं शंकरांच्या जटेंतील गंगेची मागणी करून तीं मिळविली. अशा रितीनें शंकरापासून गंगेस दूर करण्यास गौतम कारणीभूत झाला. गौतमानें आणलेल्या या गंगेसच गोदावरी म्हणतात. श्रीकृष्णांचें म्हणणें असे कीं, गौतम जसा शंकरांच्या जटेपासून गंगेला एकीकडे काढण्यास कारण झाला, तसा अर्जुनही आपल्यापासून आपलें गीताशास्त्र वेगळें करण्यास कारण झाला आहे. **निक्षेपु**—ठेवा ( गीतारूपी गुप्त धन ) **आस्थानिधि**— आस्थेचा सांठा. अर्जुनाला येथे आस्थेचा सांठा म्हटलें आहे. कारण त्यानें अतीव आस्थेनें गीताशास्त्र ऐकलें. पुढील दोन ओव्यांत आपणाकडून अर्जुनानें गीताशास्त्र मोठ्या कौशल्यानें व सहज आत्मसात् केलें, हें दोन दृष्टांतांनीं सुचवितात. **ओ. ५४६**—" आपल्या स्वच्छपणानें आपल्या समोरील वस्तूची परीक्षा करणाऱ्या आरशाचीच पद्धति हे धनंजया ! तूं माझ्या बाबतींत स्वीकारलीस. " श्रीकृष्णांचें म्हणणें असें कीं, आरसा जसा आपल्या

स्वच्छ अशा पृष्ठभागावर समोरील वस्तूचें हुबेहूब प्रतिबिंब पाडून घेऊन तिची परीक्षा करतो, त्याप्रमाणें अर्जुनानेंही आपल्या अंत:करणांत आपल्या ( श्रीकृष्णांच्या ) गीताशास्त्राचें प्रतिबिंब हृदयांत पाडून घेऊन आपल्या ज्ञानाची जणु झडतीच घेतली. अर्जुनाच्या मनांत श्रीकृष्णांचें गीताशास्त्र जसेंच्या तसें बिंबल्यामुळें, श्रीकृष्णाच्या ज्ञानाचा अर्जुनानें जणु पडताळाच घेतला. श्रीकृष्णाचें गीताशास्त्र अर्जुनाच्या हृदयांत जसेंच्या तसें ठसलें असा भाव. **चोखटिवां**— स्वच्छपणानें. **ओ. ५४७**— " किंवा समुद्र जसा चंद्रनारागणांसहित सर्व आकाश आपल्यांत प्रतिबिंबित करून घेतो, तसेंच तूं गीतेसह मला आपल्या अंत:करणांत सामावून घेतलें. आहेस. " अर्जुनानें श्रीकृष्णांना त्यांच्या गीताशास्त्रासहित किती साकल्यानें आत्मसात् केलें, श्रीकृष्णाशीं व त्यांच्या गीतेशीं त्याचें किती उत्कटतेनें मनोमीलन झालें, तें वरील नभ - समुद्राच्या दृष्टांतानें फारच रम्यतेनें सूचित झालें आहे. **सूदलां**— घातलेंस. **ओ. ५४८**— हे उत्तम योध्या! ज्या अर्थी तूं त्रिविध पापापासून मुक्त झाला आहेस, त्याअर्थी गीतेसह माझें तूं आश्रयस्थान झाला आहेस. " श्रीकृष्णांचें म्हणणें असें कीं, अर्जुन गीताश्रवणापूर्वी त्रिविध पापापासून मुक्त होऊन त्याची चित्तशुद्धि झाली होती, म्हणुनच तो गीतेचा उपदेश ग्रहण करण्यास अधिकारी झाला, व श्रीकृष्णाशीं, परब्रह्माशीं त्याचें ऐक्य झालें. चित्तशुद्धीशिवाय असें आत्मज्ञान ठसत नाहीं, असा आशय. **त्रिविध मळकरा**— कायिक, वाचिक व मानसिक पाप. **वसैठा**— आश्रयस्थान, पहा— " किं परमधाम प्रकट । हें विद्यांचें मूलपीठ । शास्त्रजातां वसैठ । अशेषांचा ॥ ३० ॥ "–ज्ञानेश्वरी. अ. १. **ओ. ५४९**— " पण फार काय सांगावें! माझी ज्ञानलता अशी ही गीता जो जाणतो, तो मोहापासून मुक्त होतो. " गीता हें आत्मानात्मविचाराचें विवेचन करणारें शास्त्र असल्यानें, याच्या परिशीलनानें नित्यानित्यवस्तुविवेक अंगीं बाणून, प्राणी सर्व मोहापासून अथवा भ्रममूलक समजुतीपासून मुक्त होतो. गीताशास्त्र ऐकून अर्जुनाला देखील शरीराचें विनाशी स्वरूप व आत्म्याचें अमरत्व कळून चुकलें, म्हणूनच " नष्टो मोहः स्मृतिर्लब्धा ' अशी उक्ति शेवटीं त्याच्या तोंडून बाहेर पडली. **उन्मेखलता**— ज्ञानलता. आत्मज्ञानाचा विस्तार करणारी वल्ली. **ओ ५५०**–

" हे पांडुसुता ! अमृताच्या नदीचें सेवन केल्यावर, ती रोग घालवून योग्य तें अमरपण जशीं देऊन टाकते. " अमृताच्या नदींचें पाणी म्हणजे अमृतच सेवन केल्यावर रोग जाऊन अमरपण मिळण्यास काय उशीर ? **देउनि घालि**- देऊन टाकते. अमरपण देणें हा तिचा धर्मच आहे. **ओ. ५५१**— " त्याप्रमाणें गीता पूर्णपणें समजल्यावर, मोह जातो यांत आश्चर्य तें काय ? पण येथें ( गीता समजल्यावर ) आत्मज्ञानानें आपणालाच गिळलें जातें. " गीतेचें तत्त्वज्ञान अंगीं बाणल्यावर मोह गेला तर त्यांत आश्चर्य नाहीं. पण त्याहूनही विशेष म्हणजे गीता समजल्यावर आत्मज्ञान होऊन, साधक आत्मस्वरूपाशीं ऐक्य पावतो. त्याचें परमात्म्याशीं मीलन घडतें. साधक निराळा असा राहतच नाहीं.

**ओ. ५५२**-" ज्या आत्मज्ञानाच्या ठिकाणीं आपलें जीवित समर्पण करून कर्म ज्ञानाचें उतराई होऊन लयाला जातें." आत्मज्ञानाची पदवी अशी कीं, तेथें कर्माचें कार्य संपून, कर्म ज्ञानांत विलीन होतें. कर्माची परिसमाप्ति ज्ञानांतच होते. ज्ञानानंतर कर्माचें कर्मत्व म्हणजे त्यांतलि फलाशा नष्ट होते. ज्ञानानंतर कर्म, हें निष्कामकर्म होतें. **जीविता पाईं**- आपलें जीवित खर्ची घालून. **उतराई**— ज्ञानाला उपकारबद्ध होऊन. **ओ. ५५३**— " हे वीरविलासा अर्जुना ! हरवलेली वस्तु दाखवून दिली म्हणजे, जिनसाचा माग काढणं जसं संपतं, तद्वत् ज्ञानानें कर्मरूपी मंदिराला कळस चढतो. " वस्तु सांपडली कीं, ती हुडकणं थांबतं, त्याप्रमाणें परब्रह्माचें ज्ञान झालं कीं, कर्ममार्गाची इतिश्री होते. आत्मज्ञान हिच कर्ममार्गाची फलश्रुति होय. **वळघे**- चढे. ओ. ५५३ व ५५४ या ओव्यांत मूळ श्लोकांतील 'कृतकृत्यश्च' या पदाचें स्पष्टीकरण केलें आहे. **ओ. ५५४**- " म्हणून ज्ञानी पुरुषाचं कर्म करणं थांबतं" असं अनाथांचा सखा ( श्रीकृष्ण ) म्हणाला. " ज्ञानी पुरुषांना कर्म करण्याची जरूरी नाहीं. कारण आत्मज्ञानामुळें त्यांची फलाशा नष्ट झालेली असते. ज्ञानी पुरुषाची शरीरपोषणार्थ कर्में चालली, तरी चित्तशुद्धीसाठीं त्यानें कर्म करणें आवश्यक नाहीं. **करुं सरलें**- करणें संपलें. **ओ. ५५५**-" श्रीकृष्णाच्या मुखांतून पडणाऱ्या अमृतानें अर्जुनरूपी पात्र जों भरून ओसंडतं आहे, तों इकडं व्यासकृपेनं तें संजयाला प्राप्त होत होतं. " श्रीकृष्णमुखांतून बाहेर पडणाऱ्या गीतामृतानं अर्जुनाचं

हृदय इतकं भरलं कीं, तें अमृत बाहेर ओसंडून वाहूं लागलं, व हें अशारीतीनें वासिंडून वाहलेलं गीतामृत व्यासांच्या द्वारा संजयाला प्राप्त झालं. संजयानें तेंच गीतामृत धृतराष्ट्राला पाजलं. तात्पर्य श्रीकृष्णापासून अर्जुन, व्यास, संजय अशा क्रमानें गीता धृतराष्ट्रापर्यंत आली. **ओ. ५५६–** " त्यानें ( संजयानें ) धृतराष्ट्राला ( तें कृष्णवदनामृत ) पिण्यासाठीं दिलें. म्हणून त्याला ( धृतराष्ट्राला ) त्याचा अंतकाल जड गेला नाहीं." धृतराष्ट्रानं श्रीमद्भगवद्गीता श्रवण केली व तिच्यांतील आत्मज्ञान त्याच्या कानावरून गेलें, म्हणून धृतराष्ट्राला शेंवटीं मोक्ष मिळाला. " अंतकाले च मामेव स्मरन्मुक्त्वा कलेवरम् ।" अशीच त्याची स्थिति झाली. **भारी–** जड. पहा– ' पडतां जड भारी । दासें आठवावा हरी ।– तुकाराम. **जीवितांतु–** अंतकाल. **ओ. ५५७–** " यद्यपि ( धृतराष्ट्रासारख्या ) अनधिकारी माणसाला गीताश्रवण कष्टानें घडलं, तरी शेवटीं त्याला श्रेष्ठ पंक्ति लाभली. " संजयाच्या मुखानं गीतेचं श्रवण करतांना धृतराष्ट्राला अडचण भासली, त्याला त्रास वाटला. कारण तें श्रवण करण्याची त्याची पात्रता नव्हती. तथापि अशा आत्मज्ञानश्रवणास अपात्र असणाऱ्या माणसानें मोठ्या कष्टानें गीता ऐकली, तरी शेवटीं ती त्याला श्रेष्ठ पंक्तिस बसाविण्यास कारण झाली. मोक्षाला गेलेल्या लोकांच्या मालिकेंत धृतराष्ट्राला शेवटीं स्थान मिळालें. **अवसरिं–** अडचणींनें. **सेखि–** शेवटीं, अंतकालीं. **उजिरी पांति–** श्रेष्ठ पंक्ति. कष्टानें पुण्य घडलें, तरी अंतीं तें फलदायी होतें असा भाव. यालाच दृष्टांत देतात. **ओ. ५५८–** " द्राक्षीच्या वेलाला दूध घालतांना तें फुकट गेलं असं वाटतं. पण शेवटीं फलपाकाच्या वेळीं तें दुप्पट झालेलं जसं दिसतं. " द्राक्षाच्या वेलाला दुधाचें खत घालतात, तें दूध कोणाला प्रथम व्यर्थ गेलें असें वाटतें. पण तो द्राक्षाचा वेल त्यामुळें फोफावून शेवटीं ज्यावेळीं त्याला द्राक्षाचें अनेक घोंस लागतात, त्यावेळीं त्या दुधाचा दुप्पट मोबदला आल्याप्रमाणें वाटतें. **फलपाकिं दुणावले–** फलपाकानें दुप्पट झालें. **ओ. ५५९–** " त्याचप्रमाणें हरीच्या मुखांतून आलेलीं अक्षरें संजयानें ( धृतराष्ट्राला ) मोठ्या आदरानें सांगितलीं. त्यामुळें तो आंधळा ( धृतराष्ट्र ) कालांतरानें सुखी

झाला. " दुधाच्या खतानें कालांतरानें जसा त्या वेलीला द्राक्षांचा बहर येतो, तसाच धृतराष्ट्र गीताश्रवणानंतर कांहीं कालानें मोक्ष मिळून सुखी झाला. **हरिवक्त्रींचीं**-श्रीकृष्णमुखांतलि. **आखरें**- अक्षरें, गीताक्षरें. **अव-सरें**- कांहीं कालानें. **सुखिया**- सुखी. यापुढें ज्ञानेश्वर नेहमीप्रमाणें प्रस्तुत ग्रंथलेखनप्रसंगींची आपली विनयाची भूमिका स्पष्ट करतात. **ओ. ५६०-** " तींच ( हरिवक्त्रीची अक्षरें ) माझ्या ओबडधोबड ज्ञानाप्रमाणें, मराठी शद्बांत मी समजलीं न समजलीं तशीं सांगितलीं. " ज्ञानेश्वर आपल्या ज्ञानाला ओबडधोबड असे विनयानें म्हणतात. पण वास्तविक तें किती सूक्ष्म आहे, हें आपण पाहिलेंच. शिवाय श्रीकृष्णांची ही भगवद्गीता आपणास समजली तशी आपण सांगितली, असें म्हणण्यांतही ज्ञानेश्वरांचा विनयच आहे. गीतेचा कांहीं भाग त्यांना समजला व कांहीं भाग त्यांना समजण्यापलीकडचा होता असें निदान त्यांच्या या विस्तृत व सोदाहरण विवेचनावरून वाटत नाहीं. **विन्यासें** पदरचनेनें, भाषेनें. **ठसे ठोमसें उन्मेखें**— मोठ्याधाक्या ज्ञानानें. ज्ञानेश्वर यापुढें आपल्या रसिक श्रोत्यांना अनुलक्षून दृष्टांत देतात. **ओ. ५६१—** " सेवंतीचें बाह्य स्वरूप पाहतां, अरासिक माणसाला त्यांत कांहीं विशेष वाटत नाहीं. पण ज्यानीं तिचा सुगंध लुटला ते भोंगेच ( तिचें महत्व ) जाणतात. " वर वर पाहणाऱ्यांना आपला ग्रंथ जरी ओबडधोबड म्हणून आवडला नाहीं, तरी त्याच्या अंतरंगाचें सौंदर्य समजणाऱ्या रसिक वाचकांना व श्रोत्यांना तो खास आवडेल, असा विश्वास ज्ञानेश्वरांनीं येथें सूचित केला आहे. सेवंतीचें खरें भोक्ते जसे भृंग, तसे आपल्या ग्रंथाचें खरे भोक्ते रसिक श्रोते, असें रसिकांना येथें त्यांनीं आवाहन केलें आहे. पण ग्रंथांतल्या न्यूनतेची जबाबदारी ज्ञानेश्वर नेहमीच आपल्यावर घेतात.

**ओ. ५६२**--" त्याप्रमाणें माझ्या रचनतील परिपूर्ण असा सिद्धांत आपण स्वीकारावा व जें जें उणें असेल, तें तें मजकडे यावें. कारण न समजणें हा बालकाचा सहज धर्मच आहे. " ज्ञानेश्वर आपल्याकडे बालकाची भूमिका घेऊन असें सांगतात कीं, आपल्या ग्रंथांत जें अचूक, दोषरहित असे सिद्धांत असतील, ते रसिकांनीं घ्यावे, व जें जें म्हणून आपल्या ग्रंथांत न्यून असेल त्याची जबाबदारी आपल्यावर टाकावी. कारण ज्ञानी श्रोत्यांच्या

अपेक्षेनें आपल्यासारख्या लहानाचा न समजणें हा धर्मच आहे. ज्ञानेश्वरांनीं असाच विनय पहिल्या अध्यायांतही व्यक्त केला आहे. पहा– " तऱ्ही न्यून तें पुरतें । अधिक ही सरतें । करूनि घेयावें हें तुमतें । विनविलें मिया ॥ ८० ॥– प्रथमाध्याय-ज्ञानेश्वरी. **प्रमेय**-सिद्धांत. **रूप**-स्वभाव.
**ओ. ५६३**—" पण ( आपलं बालक ) अज्ञानी असलं, तरी त्याला पाहून आईबापांचा आनंद कोठेंच मावत नाहींसा होऊन, त्याचं ते कौतुक करतात. " आईबाप आपल्या मुलाच्या बोबड्या शद्बांचं कौतुक करतात. अधिकारी श्रोत्यांनींही तशाच वात्सल्याच्या दृष्टीनें आपल्या रचनेकडे पहावं, अशी ज्ञानेश्वर येथेही अपेक्षा करतात. पहा.– " जैसा स्वभावो मायेबापांचा । अपत्य बोले जऱ्हीं बोबडिया वाचा । तऱ्हीं अधिकाधिक तेयांचा । संतोखु चि आथि " ॥ ६४ ॥- प्रथमाध्याय- ज्ञानेश्वरी. याशिवाय संतश्रोत्यांना मोठेपणा देऊन त्यांच्या सहानुभूतीची ते अपेक्षा करतातच. **ओ. ५६४**- " त्याप्रमाणें तुम्हीं संत (श्रोते) माझें माहेर घर असून, तुमची गांठ पडली कीं, मी असाच लडिवाळपणा करतो. हा लडिवाळपणाच या ग्रंथाच्यां रूपानें तुम्ही मानून घ्यावा. " आपले श्रोते हे माहेरच्या माणसांप्रमाणेंच जिव्हाळयाचें असून, आपली ग्रंथरचना नेहमींच तें कोडकौतुकानें ऐकतात, अशी कृतज्ञता ज्ञानेश्वरांनीं व्यक्त केली आहे. पहा– " आतां देइजे अवधान । तुम्ही बोलविलां मी बोलैन । जैसें चेष्टे सुत्राधीन । दारुयंत्र ॥ ८१ ॥ प्रथमाध्याय—ज्ञानेश्वरी. **लाडेंजे**-लाडावतो. **व्याजें**-निमित्तानें. शेवटीं निवृत्तिनांथांच्या ठिकाणीं आपलीं ही वाङ्मयसेवा रुजु होवो अशी इच्छा ज्ञानेश्वर प्रकट करतात.

**ओ. ५६५**- " आतां विश्वात्मक असे जे माझे गुरु निवृत्तिनाथ, ते ही माझी वाक्यरूपी पूजा ऐकोत ( घेवोत ). " आपण केलेलें गीताव्याख्यान आपल्या गुरूनीं ऐकलें म्हणजे आपण कृतार्थ झालो, अशा शद्बांत ज्ञानेश्वरांनी शेवटीं आपल्या गुरूंना नमनच केलें आहे. वास्तविक निवृत्तिनाथ ज्ञानेश्वरांच्या श्रोतृवृंदांत होतेच. पण गुरु या नात्यानें येथें त्यांचा स्वतंत्र उल्लेख त्यांनीं केला आहे. **विश्वात्मक**- परमात्मस्वरूप. ' विश्वचि माझें घर ' अशी वृत्ति झालेले. **वाक्यपूजा**- गीताप्रवचनांनें घडलेली वाङ्मयपूजा.

# कठिण शब्दांचा कोश

अ

**अगारें**- अंकुर.
**अग्रवर्णे**- टोकाचीं पानें.
**अधि**- खालीं.
**अनावर**- आटोक्याबाहेर.
**अपंगणें**- स्वीकारणें,
**अफाटु** -- फार अंतर.
**अबोट**— अखंडित लेप.
**अभिचार**- जारणमारण,
**अर्घ्य**- देवावर सोडण्यासाठीं गंध, पुष्प व अक्षता यांसह ओंजळींत घेतलेलें पाणी.
**अवधी**- मर्यादा.
**अवसारिं**-- अडचणीनें.
**अवेंगपणें**- यथासांग.
**अव्यभिचार**- एकनिष्ठा.
**अंशुमाली**- सूर्य.
**असारणें**- पसरणें.
**असिलेपण**- अस्तित्व.
**असोसें**— पुष्कळ, फार.
**अहर्निशीं** — अहोरात्र.

आ

**आइती**— लांब.
**आकर्णणें**— ऐकणें.
**आगळिक**— अधिक.
**आगारी**— अंकुर, शेंडा.
**आगिठी**— आगटी.
**आंगवसा** सालींतून.
**आंगिक**— आंगच्या.
**आटणें**— निकाल करणें.
**आटुळणें**— घट्ट होणें.
**आडफाटणें**- आडव्या फुटणें.
**आडवें**- अरण्यें.
**आणियांचें**- अग्रांचें.
**आतणें**— व्यापणें
**आतुडणें**— सांपडणें, प्राप्त होणें.
**आथिला**- संपन्न.
**आन्दोलणें** — कंपित होणें.
**आपजणें**- उत्पन्न होणें.
**आपणपें**- आपणापासून
**आपैतें**- वश
**आर**- अंकुर.
**आरवस**— अंकुर.
**आलु**— आळ, आरोप.
**आलुकी**- खोटी.
**आवडणें**- वाटणें.
**आह्राचवह्राच** —वरवर.

उ

**उखा**- प्रातःकाल.
**उखि**- मिथ्या, खोटा.

उखिविखि— तर्कवितर्क.
उजिरी— विस्तार, उदय.
उजू— सरळ.
उंचपडे— थोड्या उंचावर
उंचावणें—उंच होणें.
उठणें—चालून जाणें.
उद्भिज—भूमीपासून उत्पन्न झालेले.
उन्मेख- ज्ञान.
उपरातिं- उफराटी
उपलविणें—सविस्तर सांगणें.
उबगणें—कंटाळणें.
उमटणें- भासमान होणें.
उमपा—अमूप, असंख्य.
उमासिजणें- सांगतां येणे.
उमाळे—अंकुर.
उलंडणें - उलथणे.
उससणें—प्रकट होणें.

ऋ

ऋखें - तारकापुंज.

ए

एकवद - एकदम.
एकलौतें - एकुलतें एक.
एकसरा- एकदम.

ओ

ओगरणें- वाढणें,
ओझीलपणें— भारानें.
ओपासिरा- उजळा, झकाकी.
ओवांडणें- उलटणें.
ओसणणें- झोपेंत बरळणें.

क

कंद- नाभिस्थान.
कडवसां-अंधारांत.
कल्प—ब्रह्मदेवाचा दिवस.
काटाळा- त्रास.
काश्मिर- स्फटिक.
कावरुखें- झाडावरचें बांडगूळ.
कावरें- भ्रमात्मक.
कारगाणी- गोष्ट.
कीडाल- हिणकस धातु.
कीरु- निश्चितपणानें.
कीर्तिमुख - देवाच्या दारावर त्यांतील देवतेनें मारलेल्या राक्षसाचें कोरलेलें तोंड
कुंजरी - हत्तीण.
कुंथाकुंथी- खटपट.
कुरोंडी- ओवाळणी.
कुसरी कौशल्यानें.
कुहां- विहरींत.
कोडें- आवडीनें.
कोंदाकोंदी- दाटीनें.
कोंदणें - भरणें.
कोंभेजणें - अंकुरित होणें.

ख

खनुवाले- कठिण.

खलाल – खळखळ वाहणारा ओढा.
खवळणें – उत्तेजित होणें.
खाखरैजणें – उत्पन्न होणें.
खाड – तरवार.
खांबे – अंकुर.
खालावणें – खाली जाणें.
खेंव – आलिंगन.
खोखरपणें – मोडकेपणामुळें.
खोटी – गोळा.

ग

गंवसिणें – आच्छादणें.
गाढिका – दृढता.
गावारे – अज्ञानी लोक.
गुंपणें – गुंतणें.

घ

घणावणें—दृढ होणें.
घुमणें– शब्द करणें.
घेडी– घडी.

च

चउर– चतुर.
चांदिणा—चांदण्यांत.
चेवविणें—जागे करणें.
चेवो– जागृति.
चोखटिवा– स्वच्छपणानें.
चोखडु—शुद्ध.
चौपासि—चार बाजूस.
चौफळणें—चौरंग करणें.

ज

जगडंबर—विश्वविस्तार
जारज—गर्भाशयापासुन झालेले.
जिंकणे—प्रगति करणें.
जिणते – जिंकणारें.
जीवें – मन लावून.
जुं – जुगार.
जुंबाडे – समुदाय.

झ

झनें – कदाचित्.
झडाझडाट – सोसाट्याचा वारा.
झडाडणें – झडझड आवाजानें वाहणें
झडिति – लवकर.

ट

टकें – टोकें, अग्रभाग.
टवाळ – खोटें.
टांची – अल्प.

ठ

ठसेठोमसें – मोठ्याधाट्या.

ड

डगरु – प्रसिद्धि.
डांमा – काळ्या.
डाल – ढेप.
डालुका – डाहाळ्या.
डालें – डाहाळ्या.
डाहारणें – प्रसिद्धिस येणें.
डिंब – आकृति, मूर्ति.

डिरु — अंकुर.
डोणी — नाव.

ढ

ढालेढालें — हळूहळू.

त

तपन — सूर्य.
तळबुडे — खालचे बुंधे.
तांडी — समुदाय.
तिवना — तीन पानी.
तुरंबणें — हुंगणें.
तोयबगें — पाण्याच्या संसर्गानें.
त्रिशुद्धि — खरोखर.

थ

थावणें — बळावणें, स्थिरावणें.
थितें — मूळची.
थिलर— डबकें.
थेकुलें— कमी, अल्प.
थोरवणें— मोठी पानें.
थोरांडे— मोठें.

द

दरकुटा— दरी.
दले— म्यान.
दांग— अरण्य.
दीपन— तीव्र भूक.
दुकलु— दुष्काळ.
दूसरा— दुपदरी हार.
देव्हडी— मोठी.
दोखें— कारणें.

दृराति—सुवास.

ध

धांधा— धंदा.
धुमाडु— धुमाळी.

न

नांगवणें— न सांपडणें.
नाडळणें— न स्पर्शणें.
नातुडणें— न सांपडणें.
नाथिला —नसता, मिथ्या.
नावेक— क्षणभर.
निकवड्या - निष्कांचन.
निखल— शुद्ध.
निदसुरे- झोपेंतले.
निधि- अतीशय वेगानें भ्रमण.
निमणें- नाश पावणें.
निर्वाह- स्थिति.
निरवाधि- अमर्याद.
निर्वाळणें-स्वच्छ करणें.
निरुतें— निश्चित.
निवाडु— निर्णय.
निसणें— घासणें.
निष्ठंकणें- आरोप करणें.
निक्षेपु— ठेवा.
नीकी- चांगली,
नुधवणें- न उचलणें.
नुरोधणें— निषेध करणें.
नुपविजणें— प्रासले न जाणें.

